A NEW APPROACH TO THE DRAVIDIAN PROBLEM

# मऱ्हाटी संस्कृति

## कांहीं समस्या


लेखक

शं. बा. जोशी






आन्तर भारती प्रकाशन

किंमत पांच रुपये

आन्तर भारती प्रकाशन

: १ :

प्र का श क

स. ज. भा ग व त

१२, टिळक रोड, पुणे २.

★

प्रथम आवृत्ति : ११००

२४ डिसेंबर १९५२



★

मुद्रक

श्री रंग व रे र क र

साधना प्रेस, मुंबई ११

डॉ. शंकरराव जोगळेकर एफ्. आर्. सी. एस्. ( इंग्लंड )

व सौ माणिकबाई जोगळेकर

आणि

प्रा. धनंजयराव गाडगीळ एम्. ए., एम्. लिट्. ( कॅंटब्र )

व सौ. प्रमिलाबाई गाडगीळ

यांस—

# लेखक परिचय

आन्तर भारती प्रकाशनाच्या पहिल्या पुस्तकाचे लेखक श्री शंकर बाळदीक्षित जोशी हे कर्नाटकातील एक नाणावलेले संशोधक आहेत. त्यांचा जन्म १८९६ साली गुर्लहोसूर येथें झाला. विद्वत्ता ही विद्यालयीन शिक्षणावर अवलंबून नसते हें श्री जोशी याच्या चरित्रावरून सहज समजण्या-सारखें आहे; कारण त्याचें शिक्षण कन्नड थर्ड इयर ट्रेन्ड पर्यंतच झालें असून त्यानीं इंग्रजीचें अध्ययन आपलें आपणच केलें आहे. पण त्याचा अधिकार आज एवढा मोठा आहे की त्याची कित्येक पुस्तकें मुंबई, कर्नाटक, मद्रास आदि विद्यापीठानीं आपल्या उच्च परीक्षासाठीं पाठ्यपुस्तकें म्हणून निवडलीं आहेत. श्री जोशी चिकोडी येथील प्राथमिक शाळेंत शिक्षक असताना १९२१ साली असहकारितेची चळवळ झाली व त्यावेळीं त्यानीं आपली नोकरी सोडली. पुढें ते धारवाडच्या राष्ट्रीय शाळेत अध्यापन करूं लागले. 'कर्मवीर' 'जय कर्नाटक' आदि प्रसिद्ध कन्नड नियतकालिकांच्या संपादकीय विभागात काहीं दिवस काम केल्यावर त्यानीं धारवाडच्या विद्यारण्य हायस्कूलात (पूर्वीचे व्हिक्टोरिया हायस्कूल) पंधरा वर्षे कन्नड भाषेचे शिक्षक म्हणून काम केलें. कन्नड भाषा, देश व समाज याविषयीं दीर्घकाल परिश्रमाने संशोधन करून १९३३ ते १९४९ या अवधींत चौदा पंधरा संशोधनात्मक प्रबंध त्यांनीं प्रसिद्ध केले आहेत.

## लेखकाचे कांहीं प्रमुख प्रबंध

कण्मरेयाद कन्नड—(दृष्टीआड झालेला कर्नाटक) १९३३

महाराष्ट्रद मूल—(महाराष्ट्राचें मूळ) १९३४

हट्टिकाररु अथवा कर्णाटद वीरक्षत्रियरु-(कर्नाटकाचे वीरक्षत्रिय) १९३७

कन्नडद नेले—(कर्नाटकाचा पाया) १९३९

कन्नाड कते—(कन्नड देशाची कथा) १९४७

यक्षप्रश्ने— (यक्ष-प्रश्न) १९४८

समाजदर्शन—१९४९

# निवेदन

धारवाड येथील प्रख्यात कन्नड संशोधक श्री. शं. बा. जोशी यांचें हें पुस्तक आन्तर भारतीचे पहिलें प्रकाशन म्हणून महाराष्ट्रीय वाचकांच्या हातीं देतांना मला फार आनंद होत आहे. महाराष्ट्र आणि कर्नाटक यांचे भाषिक व सास्कृतिक संबंध इतके संमिश्र आहेत कीं या दोनहि भाषातील विद्वानांनीं आणि संशोधकानी परस्परभाषाचा अभ्यास केल्याशिवाय कोणताच प्रश्न निर्णायकरीत्या सुटेल असें मला वाटत नाहीं. एका अर्थानें कर्नाटक व महाराष्ट्र यातील संबंध उलगडावयाचा म्हणजे आर्य–द्राविड संबंधाचाच उलगडा करण्यासारखें आहे. द्राविड संस्कृतीचें मूलस्वरूप काय, तिचा आर्यांच्यावर कोणता परिणाम झाला व आर्य द्राविडामध्यें झालेली देवघेव कोणत्या स्वरूपाची होती हा साराच विषय अद्यापि अनिर्णीत स्थितींत आहे. संशोधकामध्यें विविध तर्क चालू आहेत. ‘मोहेंजोदारो’च्या संस्कृतीचे स्वरूप अद्यापि निश्चित झालें नाहीं. त्यामुळें या क्षेत्रातील कोणाच्याहि लेखनाला संपूर्ण मान्यता मिळणें स्वभावतःच कठिण आहे. श्री. शं. बा. जोशी यानीं आर्य–द्रविड समस्येचा उलगडा करण्यासाठी कित्येक वर्षं चिंतन चालविलें आहे. त्याच्या-जवळ अशा संशोधनाला लागणारी प्रतिभाशक्ति फार मोठ्या प्रमाणांत आहे. बारीक बारीक पुराव्याचे दुवे गोळा करण्यासाठी त्यानीं वर्षानुवर्षें कष्ट घेतले आहेत. प्रस्तुत ग्रंथात त्याच्या दीडदोन तपाचें फलित सामावलेलें असल्यामुळें सामाजिक संशोधनाची आवड असलेल्या अभ्यासु वाचकाना हा ग्रंथ अतिशय मनोरंजक आणि विचारप्रेरक भासल्याशिवाय राहाणार नाहीं.

पू. साने गुरुजी याच्या आन्तर भारतीच्या कार्याला प्रारम करताना अशा तऱ्हेचा मौलिक ग्रंथ प्रकाशित करण्याची संधि मिळाल्यामुळें मला फार समाधान वाटत आहे. भारतातील भिन्नभिन्न भाषा–विभागांत जें पांडित्य वा लालित्य निर्माण झालेले आहे त्याचा परस्पराना परिचय करून देणे हें आन्तर भारतीचें मुख्य प्रयोजन आहे. परस्पर परिचयाचा हा प्रारंभ आपल्या निकटवर्ती भाषा–बंधूपासून व्हाव।यात विशेष औचित्य आहे. आन्तर भारती संस्थेला कोणत्याहि विशिष्ट मताचा प्रचार करण्याची इच्छा नाहीं. खुद्द

कर्नाटकांतहि श्री. शं. बा. जोशी यांच्या संशोधनांतील कित्येक बाबतींत मतभेद बाळगणारी विद्वान मंडळी आहेत. महाराष्ट्रांतहि या विषयाचे अभ्यासक बरेच आहेत. त्या सर्वांना श्री. शं. बा. जोशी यांचीं सारींच विधाने मान्य होतील असें मानता येणार नाहीं. तथापि असल्या विषयांत मतभिन्नता असली म्हणून भिन्नभिन्न अभ्यासकांचें महत्त्व कमी होत नाहीं. उलट, आदराने व सहृदयतेने भिन्न मतांचाहि अभ्यास करण्याची प्रवृत्ति वाढली पाहिजे. सत्याची प्राप्ति व्हावयाची असेल तर सहिष्णुतेची जोपासना झाली पाहिजे. निर्भयतेनें सत्य-संशोधन चालू राहावें असें वाटत असेल तर अप्रिय अथवा पूर्वग्रहाना धक्का देणाऱ्या विचारांचेंहि कौतुकानें स्वागत करण्याची शक्ति समाजांत वाढविली पाहिजे. आन्तरभारतीच्या कल्पनेमध्ये ही सहिष्णुता प्रधान मानलेली आहे. त्या वृत्तीनेंच ह्या ग्रंथाचें मी मनःपूर्वक स्वागत करीत आहें. महाराष्ट्रीय वाचकहि या स्वागतात मोकळ्या मनानें सहभागी होतील यात मला शंका नाहीं.

**स. ज. भागवत**
संचालक, आन्तर भारती

# अनुक्रम





# योगायोग

सुमारें अठरा वर्षें झालीं; पुण्याच्या केसरींत एका चर्चेचा गोषवारा दिला होता. भा. इ. संशोधक मंडळात झालेली ती एक खासगी चर्चा होती. माझे मित्र श्री ग. ह. खरे यानीं तो योग जमवून आणला होता. त्या चर्चेंत श्री द. वि. आपटे यांजसारख्या कानडी जाणणाऱ्या विद्वानानीं, 'या दिशेनें मराठीचे बरेच प्रश्न सुटणें शक्य आहे,' असें आपलें मत व्यक्त केलें; कांहींना माझ्या विचारात काहींच तथ्य वाटलें नाहीं.

महाराष्ट्रांतील विचारवंतांच्या प्रतिक्रिया जाणण्याकरिता केसरींतील हा लेख काहींना पाठविला. प्रो. वा. म. जोशी यानीं आपण या विषयाचे तज्ज्ञ नसल्याचें कळविलें; पण "आपलें कात्रण येण्यापूर्वींच केसरींतील हा भाग निराळा काढून जपून ठेवला आहे. आपल्यात स्वतंत्रपणें विचार करणारे फारच थोडे आहेत, या दृष्टीनें आपला लेख मला उद्‌बोधक वाटला," असेंहि त्यानीं पुढें लिहिलें होतें. श्री. वाग्भट नारायण देशपांडे, प्रो. कुलकर्णी, प्रो. बनहट्टी, श्री. ना. गो. चापेकर यानीं आपले बरेच अनुकूल अभिप्राय कळविले; महामहोपाध्याय श्री. काणे व श्री. या. मा. काळे यानीं आपलें प्रतिकूल मत असल्याचें लिहिलें. त्या सुमारास प्रसिद्ध झालेल्या महाराष्ट्र शब्द कोशाच्या प्रस्तावनेंत ( भाग ३ ) केसरीतील या लेखाचा उल्लेख केला आहे.

पुढें आचार्य स. ज. भागवताच्या परिचयाचा योग लाभला तो न लाभता तर, माझे विचार इतक्या विस्तारानें महाराष्ट्रापुढें माडणें मला शक्य झालेंच नसतें. त्यांच्या प्रेमाच्या आग्रहामुळें पुण्याच्या नवभारत मासिकातून याविषयीं लिहिण्याचें धाडस मीं केलें. जिज्ञासेनें कांहीं वाचन करीत असता, मनांत कांहीं शंका वारंवार डोकावूं लागल्या. स्वतःच्या समाधानाकरितां शंकानिरसनासाठीं केलेला हा थोडाफार प्रयत्न आहे. या प्रकारच्या अभ्यासाला आवश्यक अशी पढीक विद्वत्ता मजजवळ नाहीं. शास्त्रीय पद्धतीची माहिती नाहीं. स्वतःपुरत्या जरूरीच्या ग्रथसंग्रहाची तर राहोच पण सार्वजनिक ग्रंथालयाची अनुकूलतासुद्धा मोठ्या मुष्किलीची. अशा अननुकूल परिस्थितींतील अदीक्षिताच्या प्रयत्नांत पदोपदीं उणीवा न दिसल्या तरच आश्चर्य !

श्री धनंजयराव गाडगीळ यांची आपल्या सांस्कृतिक इतिहासाविषयींची आस्था, त्याची मूलगामी तैलबुद्धि व सूक्ष्म विचारपद्धति महाराष्ट्राच्या पूर्ण परिचयाची आहे. फेरतपासणीकरितां, माझे विचार मी बऱ्याच वेळा त्याच्यापुढें मांडीत असे. त्याच्या टीकेचा व सूचनाचा फायदा पुष्कळच झाला आहे.

यापूर्वी त्यानींहि माझे विचार एकवार टाचणरूपानें तरी लिहून काढण्यास सांगितलें होतें. तशी दोन तीन टाचणें लिहून मीं त्यांजकडे दिलीं. त्यातील 'अडका' हे एक टाचण साहित्यपत्रिकेंत बऱ्याच दिवसानंतर प्रसिद्ध झाले. पण त्यावर एकानीं कडाडून टीका केली. 'अडका' (सुपारी) एकेकाळी कवडीप्रमाणें 'किंचित् व्यावहारिक द्रव्य' म्हणून वापरलें जात होतें, हें माझें म्हणणें साफ खोटे आहे असे त्यानी प्रतिपादिलें. त्यावेळी महानुभाव साहित्य पुरेसे उपलब्ध नव्हते. अलीकडे प्रा. तुळपुळे यानी महानुभावकालीन सामाजिक स्थितीविषयी काही लेख परिश्रम-पूर्वक लिहून 'नवभारतात' प्रसिद्ध केले आहेत. त्यात सुपारी ही त्यावेळी नाण्याप्रमाणे उपयोगात होती, असे साधार नमूद केले आहे. अशा रीतीने मराठी व कानडी भाषेंतील कांहीं आधारावरून केलेल्या माझ्या तर्काला दुसरा पुरावा मिळून तो खरा ठरला.

पण तेव्हा माझीं टाचणें प्रसिद्ध होण्याचे तसेच राहून गेलें. आचार्य भागवताच्या प्रेरणेशिवाय माझे सर्व विचार मनातल्या मनातच विरून गेले असते.

ही माझी टिपणें पुस्तकरूपानें छापली जातील अशी कल्पनाहि नव्हती; यामुळें काही ठिकाणी द्विरुक्ति-दोष राहून गेला आहे. यातील काही लेख नवभारतात यापूर्वी आले आहेत, मुंबईच्या धनुर्धारीच्या दिवाळी अंकांत एक प्रसिद्ध झाला आहे. त्या टिपणात काहीं थोडी नवीन भर घालून त्याचें संकलन आज पुस्तकरूपाने प्रसिद्ध होत आहे.

मोत्याकरिता सागराच्या तळाशी बुडी घेणाऱ्या पाणबुड्याची आठवण मला वारंवार होत असते. सागराच्या पोटात शिरून हाती लागतील त्या शिंपा वगैरे घेऊन तो वर येतो, आपल्या दृष्टीने त्याची चाळणी करून बरे वाटलेले मोतीं लोकापुढें मांडतो. ते सर्व तितकेच पाणीदार व बहुमोल असणें

असंभवनीय आहे. तरी पण रत्नपारख्यानी त्यात एखादा तरी दाणा मोलाचा आहे असें ठरविलें तर त्यात त्याच्या सर्व श्रमाचें चीज होणार असतें. त्यात कांहींच हातीं न लागण्याची भीतिहि पण थोडी थोडकी नाहीं. हा सर्व योगायोग आहे. प्रयत्न करणें आपलें कर्तव्य. योग्यता ठरविणें सत्यान्वेषी परीक्षकाचें कार्य.

एका अखिल भारतीय समस्येची चर्चा करणाऱ्या या पुस्तकाला पू. साने गुरुजींच्या 'आन्तर भारती प्रकाशनात' स्थान मिळाल्याबद्दल समाधान वाटतें. पूर्वसूरींच्या परिश्रमाचें साहाय्य मिळालें नसतें तर मी कांहींच लिहूं शकलों नसतो. हस्तलिखित तयार करण्याचे कामीं तरुण मित्र श्री माधवराव पंचनदीकर B A., श्री वसंतराव निगवेकर B Sc व श्री मा. द. खाडिलकर यांनीं मदत केली. श्री श्रीपादराव जोशी यानीं भाषाशुद्धीच्या दृष्टीनें काहीं सूचना केल्या. डॉ. रा. ना. दाडेकर यानीं वेळात वेळ काढून हस्तलिखित एकवार वाचून काढले व काहीं बहुमोल सूचना केल्या. श्री वसंत बापट यांनीं मनावर घेतलें नसतें तर शैलींतील बोजडपणा कमी झाला नसता. प्रा. वि. म. बेडेकर यानीं 'नवभारतात' लिहिण्यास उत्तेजन दिले. साधना प्रेसने छपाईच्या कामीं घेतलेले श्रम मीच जाणूं शकतों. योजनेमध्यें अहं-कर्तृत्वाचा अनुभव येतो; योगायोगांत 'मी' चें निमित्तमात्रत्व कळून येतें.

साधनकेरे,<br>धारवाड

शंकर बाळदीक्षित जोशी

# पीठिका

मऱ्हाटी संस्कृतीचा सांगोपांग व आमूलाग्र अभ्यास आजहि पुरा झालेला नाहीं. पुष्कळ विद्वानांनीं परिश्रमपूर्वक संशोधन केलें असलें तरी बरेचसे प्रश्न अजूनहि अनिर्णीत आहेत. या प्रबंधात त्यापैकीं काही प्रश्नांची चर्चा केलेली आहे; तीहि निर्णयात्मक बुद्धीनें नव्हे. अनिर्णीत समस्याविषयी अधिक संशोधन व्हावें या हेतूनें काही विचार ग्रथित केले आहेत एवढेंच.

प्रबंधाच्या नावात 'मराठी' या संज्ञेऐवजी 'मऱ्हाटी' अशी संज्ञा साक्षेपाने वापरली आहे. याचे कारण असें आहे कीं यातील समस्यांची चर्चा बहुशः 'मऱ्हाटी'चें 'मराठी' असें रूप होण्यापूर्वीच्या काळाच्या म्हणजेच, हळेबीडु देवगिरी यादवांच्या काळाच्या संदर्भानें केलेली आहे. मुसलमानी संघर्षापासून आजतागायतच्या प्रश्नांचा अंतर्भाव 'मराठी'मध्यें होतो. अर्थात् हें केवळ विवेचनाच्या सोयीसाठी.

## समस्या

मऱ्हाटी संस्कृतीच्या अभ्यासात अनेक प्रश्नांचा उलगडा आज झालेला नाहीं. या देशाचें नाव, येथील शेकडो ग्रामनामें, येथील भिन्न भिन्न जन व त्यांचे वांशिक संबंध, त्यांच्या भाषेची जडण घडण, त्यांचीं दैवतें व चालीरीती असे नानाविध प्रश्न आहेत. पण वास्तविक हीं सर्व एकाच समस्येचीं उपांगें आहेत. ही समस्या मऱ्हाटी संस्कृतीपुरतीच मर्यादित नसून तिची व्याप्ति भारतीय संस्कृतीच्या अतिप्राचीन थरापर्यंत पोंचणारी आहे. ही समस्या 'द्राविड प्रभाव' म्हणून विद्वानांत ओळखली जाते. भारतीय संस्कृति–संगम म्हणजे आर्य व द्रविड यांच्यातील देवाणघेवाण हें सर्वमान्य आहे. पण हे द्रविड म्हणजे कोण व वेदकालीं यांना काय नांव होतें, यांचा व आर्यांचा संबंध कशा प्रकारचा होता यासंबंधीं निश्चित विवेचन क्वचितच केलेले आढळतें. या प्रबंधांत या दृष्टीनें स्थूल विचार केलेला असून काहीं संभाव्य उत्तरें सूचित केलेलीं आहेत.

## दिशाभूल

आर्यावर्तातील प्रत्येक भाषेंत या ना त्या प्रमाणात द्राविड अंश आहेच असें सर्व संशोधकाना आढळलें आहे. प्रातांप्रांतातील ग्रामनामावरहि द्राविडाचा प्रभाव आहे असें निदर्शनास आले आहे. आज, कानडी, तेलगु, तमिळ आदि जनांना सरसकट द्रविड ही संज्ञा दिली जाते; आणि द्रविड संस्कृतीची व्याप्ति तमिळ देशापुरतीच मर्यादित मानली जाते. साहजिकच आर्यावर्ताच्या उत्तर सीमेकडील ग्रामनामावर एकाद्या द्रविडवर्गीय भाषेचा प्रभाव आहे असें दर्शविल्यास अनेक विद्वानाना तें मान्य होत नाही. एक तर द्रविडदेशाची मर्यादा दक्षिणेपुरती असा त्याचा ग्रह असतो आणि दुसरें म्हणजे द्रविड हे असंस्कृत अतएव आर्यांपेक्षा हीन अशीहि त्याची भावना असते. हे पूर्वग्रह संशोधनाला बाधक ठरले आहेत. मोहेंजोदारो व हरप्पाच्या उत्खननानंतर बरोबर विरुद्धहि प्रतिक्रिया झाली आणि संस्कृतीतील सारें सुवर्ण द्रविडापासून घेतलेलें आहे असाहि अत्याग्रह कोणी धरला. या उभयविध भ्रमाचा निरास होईल त्यावेळीं एतत्संबंधी प्रश्नावर अधिक प्रकाश पडेल.

वेदकाळापूर्वी द्रविडाची श्रेष्ठ दर्जाची नागर संस्कृति अस्तित्वात असेल तर तत्कालीन साहित्यहि का उपलब्ध होऊं नये अशी शंका पुष्कळाना येते. तत्कालीन लिखित साहित्य आज उपलब्ध नाही हे खरें. क्षणभर असें समजूं या कीं त्यावेळी साहित्याची निर्मिति झाली नाहीं. पण एवढ्यानें त्यांच्या नागरिक गुणाना किंवा संस्कृतीला बाध येतो असें मानण्याचें कारण नाही. या उलट आर्यांचें प्राचीन साहित्य भरपूर उपलब्ध असलें तरी नगरसंस्कृतीशीं त्याची तोंडओळखहि नव्हती असे संशोधकाचें मत आहे. पुर किंवा पूर हे आर्येतरांचें वसतिस्थान. आर्यांच्या विजिगीषु नेत्याला—इद्राला पुरंदर, पुरघ्न, अशीं नावें आहेत. यावरून पूरुजन (यदु–तुर्वसूंचे बाधव) आर्यविरोधी वर्गातील म्हणजे तथाकथित द्राविड वर्गातील असावेत असा तर्क करण्यास जागा आहे.

## यदु–तुर्वसूंचे धागेदोरे

यदु-तुर्वसु हे आर्येतर असावेत किंवा दुसऱ्या शब्दांत पत्तिजन असावेत या तर्कामागे पुढील कारणपरंपरा आहे.

( १ ) प्राचीनकाळीं साहित्यात सार्थ किंवा प्रतीकात्मक नावें पुष्कळानीं योजिलेलीं आहेत. विशेषतः वेद-व्यासानी. वेदातहि अजः ( मेंढपाळ ), शिग्रुः ( अश्वपाल ) वगैरे उदाहरणें आहेत. याच पद्धतीनें यदु-तुर्वसु, पूरु हीं नावें अर्थयुक्त असणें शक्य आहे. या नावाच्या ध्वन्यर्थाचा उपयोग या जनांचें पूर्वोत्तर चरित्र जाणण्यास का करूं नये ?

( २ ) यदु-तुर्वसूचीं नावें ऋग्वेदात पुनःपुन्हा येतात. त्याच्या वंशावळीवरून पाहाता या देशात त्याची वसणूक वेदपूर्वकाळापासून होती असें दिसतें. यामुळे त्याच्या पूर्वजाचा व आर्यांचा संबंध ऋग्वेदकाळापूर्वी म्हणजे मोहेंजोदाराच्या काळात आला असावा असा तर्क करता येतो. यदु-तुवर्सु व आर्य याच्या संघर्षाची तीव्रता कालातरानें कमी होत गेली. ऋग्वेदकाळीं त्यातील एक गट आर्यपक्षीय झालेला आढळतो. हें संस्कृति–संगमाच्या तत्त्वास धरूनच झालें. ऋग्वेदात काहीं यदु-तुर्वश आणि पूरु इंद्राचे मित्र आहेत तर काहीं त्याच्या शत्रूच्या–शंबराच्या पक्षाचे आहेत.

( ३ ) ऋग्वेदात ' मृध्रवाचा ' हें विशेषण आर्यशत्रूंना लावण्यात येतें. एके ठिकाणीं पूरूनाहि तें बहाल केलेले आहे. (VII 18 13). शतपथ ब्राह्मणात (VII 8 1.14) पूरूना असुर, राक्षस असेंहि म्हटलें आहे. ऋग्वेदातील पूरुविषयक एका उल्लेखाच्या विवरणासाठी हे शब्द योजले आहेत हें विशेष.

( ४ ) ऋषि आणि मुनि हे शब्द आपण समानार्थी मानतों. पण संशोधनाची सूक्ष्म दृष्टि ठेवल्यास या दोन शब्दाच्या अर्थात भेद आहे असें दिसेल. वेदात प्रमुख आहेत तीं ऋषींची नावें; मुनीचीं नव्हत. या शब्दांचा अर्थ समान मानल्यानें दोन भिन्न परंपरांचा पूर्वकालीन भेद पुढें मिटून गेला असें म्हणता येईल. मुळात ऋषि व मुनि हे दोन भिन्न वर्ग असावेत. ऋषि सामान्यतः विवाहित गृहस्थाश्रमी असत. यज्ञसंस्थेचे अध्वर्यु गृहसंस्थेस उचलून धरणारे असावेत हें स्वाभाविक आहे. पण मुनि विरागी, संन्यासमार्गी दिसतात. ऋग्वेदात मुनींचा दोनदाच उल्लेख आहे. ते जटाधारी असत. श्रमणाचा उल्लेख वेदात नसला तरी बृहदारण्यात आहे. पुढील काळी श्रमण (संन्यासी) प्रामुख्यानें अवैदिकांतच दिसतात. जैनात संन्यासी मुनींची

परंपरा अखंड चालू आहे. निरीश्वर सांख्याचा कपिलमुनि (सिद्धानां कपिलो मुनिः) योगमार्गी संन्यासी दिसतो. सांख्य व योग या दोन्ही मतांत भिन्नता नाहीं असे गीता सागते. मुळात संन्यासमार्गी यतिपंथ हा वैदिक परंपरेंतील नव्हे असें मानणाऱ्या पक्षास गीतेनें दिलेला हा दुजोरा आहे. सिद्धानां कपिलो मुनिः या गीतेतील वाक्यावरून दुसरीहि एक गोष्ट ध्वनित होते. सिद्ध पंथातील अर्हतास मुनि संज्ञा असावी. सिद्धपंथांत हटयोगी व राजयोगी यांचा समावेश होतो. जैन व बौद्धात अनेक विख्यात सिद्ध झाले आहेत. महाराष्ट्रात ८४ सिद्ध व ६४ योगिनी यांचा पंथ जिवंत होता असे तत्त्वसार वगैरे ग्रंथावरून दिसतें. या वर्गाची वागणूक लोकविलक्षण असे, विक्षिप्त असे हें पुरातन काळापासून प्रसिद्ध आहे. ऐतश मुनीचे प्रलाप ऐतरेय ब्राह्मणात वर्णिलेले आहेत. वज्रयान बौद्ध पंथातून उगम पावलेल्या सिद्धपरंपरेचें लोण महाराष्ट्र–कर्णाटकापर्यंतहि येऊन पोंचलें. या पंथाचे दक्षिणेंतील पर्याय म्हणजे वीरशेव, महानुभाव व वारकरी पंथ होत. वीरशैवाप्रमाणें जैनात पुरातन त्रेसष्ट शलाकापुरुष आहेत. कर्णाट–मऱ्हाटातील तिरसष्टी किंवा तिरसट या रूढ वाक्प्रचाराचा संबंध या विलक्षण त्रेसष्ट मुनीशीं तर नसेल ना ? वेदकालीन मुनींचीं मलिन प्रावणें जैनातील 'मलधारण' रुढीची आठवण करून देतात.

मुनि आणि सिद्ध हे मुळात अवैदिक परंपरेंतील असावे. पुढें ते जैन व बौद्ध पंथांत विशेषेंकरून दिसतात. पण काहीं समन्वयवादी गुणग्राही वैदिक ऋषि संन्यासमार्गासहि, त्यातील ग्राह्य तें स्वीकारून, आत्मसात् करूं लागलेले दिसतात. उदाहरणार्थ याज्ञवल्क्य. आदर्श जीवनाविषयीं कालिदासाचा दंडक 'वार्धके मुनिवृत्तीनां योगेनान्ते तनुत्यजाम्' असा आहे. अंतकाळ समीप आल्यावर संसाराचा मोह सोडून परिव्रज्या घ्यावयाच्या एका परंपरेचाच येथे पडसाद आहे. निदान अंतकाळीं मोक्षासाठीं 'आतुरसन्यास' घेण्याची रूढि स्मार्त परंपरेत साठ सत्तर वर्षांपूर्वीपर्यंत सर्रास चालू होती.

आरंभीं वैदिकांना मुनिपंथ—संन्यासमार्ग तितका मान्य नव्हता. इंद्रानें यतींचा संहार केल्याचें प्रसिद्धच आहे. ययातीचा वडील बंधु 'यति' होता. शंतनूचा थोरला भाऊ देवापि यति बनला. शंतनूचा ज्येष्ठ पुत्र भीष्म,

ब्रह्मचर्याची निष्ठुर प्रतिज्ञा घेतलेला 'देवव्रत' म्हणून प्रसिद्ध झाला. अशा रीतीची ही अवैदिक परंपरा यदूंत होती, हें यदुवंशातील यति, देवापि, देवव्रत वगैरे व्यक्तींच्या उदाहरणावरून आर्येतरातील भीष्मसंन्यासाची रूढि सूचित होते. अजूनहि काही समाजात घरातील ज्येष्ठ पुत्राकडे कुलव्रतें व कुळधर्म पाळण्याची जबाबदारी देण्याची वहिवाट आहे. कर्णाटातील धनगर (कुरुब), कुणबी वगैरे जातींतून घराण्यातील एक व्यक्ति—ज्येष्ठ पुत्र किंवा कोणता तरी एक पुत्र—व्रतस्थ ठेवण्याची, देवाला अर्पण करण्याची रूढि आहे.

(५) महाभारतांतील यदु–तर्वसु ( अंधक-वृष्णि समाज ) हे प्रिलस्कींच्या मताप्रमाणे अवैदिक–द्राविडवर्गीय–आहेत. महाभारतातील यदु–तुर्वसु आणि वेदांतील यदु–तुर्वश हे जर अभिन्न असतील तर वेदातील ह्या समाजाला द्राविडवर्गीय म्हणावें लागतें.

( ६ ) चंद्रवंशीय क्षत्रिय म्हणविणारा यदु-तुर्वसूंचा ऐलवंश एका वर्णाचा व ऋषिसमुदाय आणि मानववश दुसऱ्या वर्णाचा असे पार्जिटर याचेहि मत आहे. हा निर्णय प्राचीन पौराणिक परंपरेचा आमूल अभ्यास करून घेतलेला असला तरी श्री पार्जिटर याचा या ठिकाणी थोडा गोंधळ उडालेला दिसतो. हे दोन्ही वर्ग भिन्नवंशीय आहेत हें पुराणगत पुराव्यावरून स्पष्टच आहे. यदु–तुर्वसु आर्यक्षत्रिय मानले तर ऋषींचा गट आर्येतर ठरेल. पार्जिटरना ही इष्टापत्ति वाटली आणि एका दगडात दोन पक्षी मारण्याचें काम त्यानी साधले. पण त्याचा निर्णय भारतीय परंपरेशी सर्वस्वीं विरोधी आहे. त्याच्या संशोधनातील परिश्रमाबद्दल आदर बाळगूनहि असे म्हटले पाहिजे कीं संशोधकाला आवश्यक असलेली समत्व बुद्धि त्यानी ठेवलेली नाही. ब्राह्मण–ब्राह्मणेतर वादाच्या भोवऱ्यात ते सापडलेले दिसतात. ब्राह्मण तेवढा लुच्चा हें त्याचें मत. ब्राह्मण वर्ग अनार्य व यदु-तुर्वसु आर्य या त्याच्या विधानामुळें ब्रिटिश अमदानींत जातीय द्वेष वाढण्यालाच काय ती मदत झाली असेल; पण ऐतिहासिक सत्य त्यात तिळमात्र नाहीं ब्राह्मण मुळात अनार्य असतील तर त्यांच्या संस्कृत-प्रेमाला, गोत्रपरंपरेला, वैदिक निष्ठेला काही अर्थच राहणार नाहीं. पार्जिटर ज्याना आर्य क्षत्रिय म्हणतात त्या यदु-तुर्वसूंनीं मात्र संस्कृत भाषेची विशेष चिंता न करतां काहीं वेगळ्याच परंपरा संवर्धिल्याचें दिसते. गंगा-यमुनातीरीं यदु-तुर्वसूंच्या

संततीनें जोपासलेल्या प्राकृतात आढळणाऱ्या ऱ्हस्व ए, ऱ्हस्व ओ आदि आर्येतर भाषावर्गीय उच्चारावरून यदु-तुर्वसूंची मायबोली संस्कृत नव्हती असेंच सिद्ध होतें. यदुतुर्वसूंनी संस्कृतचा स्वीकार करण्याचा प्रयत्न केला; पण तो त्याना साधला नाही. त्या प्रयत्नातून प्राकृतचे पर्याय मात्र निर्माण झाले. या व इतर अनेक आधारावरून यदु-तुर्वसु मुळात आर्येतर असावेत व पुढे आर्यीकरणांत ते आरिय बनले असावेत असें म्हणणेंच क्रमप्राप्त आहे.

## एक हानि

आपल्या मनाला एकदा जडलेल्या संवयी पटकन् मोडवत नाहींत. पूर्वग्रह व नाना अभिमान याच्याहि अडचणी असतातच आणि त्यामुळें आपला सांस्कृतिक इतिहास गुंतागुतीचा होऊन आपण सत्यास मात्र मुकतों. उदाहरणार्थ : शातवाहनाचें मुख्य घराणें पैठणास आणि कर्णाटकातील बळ्ळारी जिल्हा त्याची मायभूमि असा निश्चित पुरावा मिळाला आहे; शातवाहनानीं स्वतःस कधींहि आंध्र किंवा आंध्रभृत्य म्हणवून घेतलेलें नाहीं; पण पुराणिकानीं त्याना जोडलेली आध्रभृत्य ही उपाधि अजूनहि आपल्या जिभेला चिकटून आहे. यदु–तुर्वसूविषयीं असाच प्रकार झालेला आहे असें मला वाटतें.

प्राचीन संस्कृतीचें सम्यक् आकलन झाल्याशिवाय आजच्या समस्यांचीं उत्तरें सापडणें शक्य नाहीं. ‘To understand the present age, therefore, it is necessary to go back to a considerably earlier time’ असें सुप्रसिद्ध तत्त्वज्ञ व साहित्यिक बर्ट्रंड रसेल यांनीं म्हटलें आहे तें संपूर्णपणें खरें आहे. भाषा, वेष, चालीरीती, दैवतें या गोष्टी मानवाच्या अव्यक्त मनाचीं व्यक्त प्रतीकें आहेत. त्याचा उलगडा होण्यासाठीं आपल्या संस्कृतीचा तटस्थपणें अभ्यास करणें आवश्यक आहे.



: १ :

# महाराष्ट्राचें मूळ नांव : मऱ्हाट कीं महाराष्ट्र ?

अध्यात्मज्ञानापासून आत्मस्वरूपाची जाणीव होते अशी आजपर्यंतची श्रद्धा आहे. पण ऐतिहासिक ज्ञानामुळें होणारें आत्मस्वरूपज्ञान याहूनहि निश्चित आणि वास्तवरूप आहे असे मला वाटते. अध्यात्मज्ञानापासून होणारें आत्मस्वरूपाचे दर्शन हें अव्यक्त स्वरूपाचें आहे. इतिहासापासून होणारा आत्मस्वरूपाचा साक्षात्कार साकार व सगुणरूप आहे. अध्यात्म व्यष्टिरूप आत्म्याचे दर्शन घडवितें, तर इतिहास समष्टिरूपाचा साक्षात्कार होण्यास साहाय्य करतो.

नामस्मरणापासून आत्मदर्शन होते, असे अध्यात्मातील अनुभूतिमार्गामध्यें ( Mysticism ) सांगितलें जातें. नाम जसें अध्यात्मात महत्त्वाचें आहे, तसें इतिहासात त्या त्या देशाचें ' नाव ' हें सुद्धा तेथील जनाच्या आत्मस्वरूपज्ञानास अत्यंत महत्त्वाचें साधन आहे याकरिताच देशाच्या नावातील रहस्य समजून घेणें फार जरूर आहे. जगातील प्रत्येक राष्ट्राच्या कित्येक ऐतिहासिक कोड्याचा उलगडा त्या त्या राष्ट्राच्या नांवापासून झालेला आपणास दिसून येतो. त्याचप्रमाणें महाराष्ट्राच्या इतिहासातील पुष्कळशा समस्या त्याच्या नावाचे खरे रहस्य विशद झाल्यासच उलगडणार आहेत; पण दुर्दैवानें, अजून महाराष्ट्र किंवा मऱ्हाट याची उपपत्ति चांगली न समजल्यामुळें

महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासातील बऱ्याच गुंतागुंती सोडविणें फार मुष्किलीचें झालें आहे.

## ' महाराष्ट्र ' शब्द प्राचीन कां नसावा ?

आज तरी अशी समजूत आहे कीं, 'महाराष्ट्र' शब्दच मूळ असून 'मऱ्हाट' किंवा 'मरहट्ट' ही पुढें रूढ झालेलीं नावें आहेत. या सार्वत्रिक समजुतीला काहींच आधार नाहीं असें नाहीं; आजच्या बोलीत आणि लेखनात 'मराठा' (देश) व 'मराठी' (भाषा) असे शब्द उपयोजिले जातात; पण, प्राचीन महानुभाव साहित्यात व ज्ञानेश्वरी वगैरे ग्रंथात तरी हा प्रयोग 'मऱ्हाट' किंवा 'मरहट्ट' असाच आढळतो. यामुळें 'मराठ'चें पूर्वरूप 'मऱ्हाट' किंवा 'मरहाट' अथवा 'मरहट्ट' असेंच ठरतें. अशाप्रकारें 'मराठ' पेक्षा 'मऱ्हाट' किंवा 'मरहट्ट' हींच रुपें प्राचीन आणि शुद्ध आहेत हें निर्विवाद आहे. पण 'महाराष्ट्र' हा शब्द यापेक्षाहि अधिक प्राचीन साहित्यात आढळतो. 'मरहट्टे' यांचा उल्लेख अपभ्रंश-काव्यत्रयींत (खिस्तशक नववे शतक) आला आहे. कोऊहल कवि तर (काल सुमारें ८०० इ. स.) आपलें काव्य मरहट्ट देशींतच लिहिल्याचे सांगतो. पण महाराष्ट्राचा उल्लेख तत्पूर्वीच्याहि ग्रंथांत आढळतो. यामुळेंच 'महाराष्ट्र' शब्दापासून 'मरहट्ट' 'मऱ्हाट' हा शब्द निष्पन्न झाला असावा, असें आज गृहीत धरलें जातें.

'महाराष्ट्र' शब्दापासून 'मरहाट' शब्द कसा उत्पन्न झाला असावा याविषयीं प्राकृत व्याकरणकारानीं तर्कानें नियमहि पण सांगून टाकले आहेत. हेमचंद्राच्या प्राकृत व्याकरणात या विषयावर दोन सूत्रे रचलेलीं आढळतील :—

महाराष्ट्रशब्दे आदेकारस्य अद् भवति । मरहट्ठम् । मरहट्ठो ॥ ८-१-६९ महाराष्ट्रे ह-रोः ॥ ८-२-११९ ॥ महाराष्ट्रशब्दे हरोर्व्यत्ययो भवति मरहट्ठम् ॥

या सूत्राधारें मूळ 'महाराष्ट्र' शब्दाचें 'मरहट्ठ' हें रूप कसें बनलें असावें याची कल्पना येणार आहे.

पण 'महाराष्ट्र' शब्द पूर्वीचा व मरहट्ट तदनंतरचा असें मानण्यास मला कांहीं अडचणी दिसतात. त्याचें निराकरण झाल्याशिवाय 'महाराष्ट्र' हें रूप 'मरहाट' पेक्षां प्राचीन असें समजणें सयुक्तिक होणार नाहीं.

'महाराष्ट्र' हा शब्द प्राचीन आहे असें मानण्यानें उत्पन्न होणाऱ्या अडचणी अशा: —

( १ ) प्राचीन काळीं देशाना जीं नांवें मिळालीं तीं तेथील मूळ वसाहत करणाऱ्या जनावरून, याविषयी आज कोणाचें दुमत नाहीं. आधीं जन नंतर जनपद. या उलट देशांना नांवें आधीं, नंतर लोकांना असा क्रम मानणें केव्हाहि समंजसपणाचें होणार नाही. प्राचीन देशाना तर तेथील वसाहत केलेल्या मूळ जनावरूनच नावें मिळालेली आहेत. जगांतील सर्व देशात हाच क्रम आढळतो. 'महाराष्ट्र' हा जर प्राचीन देश असेल, तर या देशाचें मूळ नाव जनवाचकच असलें पाहिजे. पण 'महाराष्ट्र' हा शब्द तर राष्ट्रवाचक आहे हें स्पष्ट आहे. आणि आजपर्यंत—काहीं अपवाद सोडले तर—बऱ्याच विद्वानानीं 'महाराष्ट्र' म्हणजे मोठे राष्ट्र असा अर्थ केलेला आहे.

'महाराष्ट्र' हा शब्द जर देशवाचकच असेल तर, आणि हा खिस्ताब्दाहून पूर्वीचा असेल तर, या देशाचें मूळ नाव प्रदश–वाचक असणे शक्य नाहीं. याकरितां या देशाचें नांव मुळातच 'महाराष्ट्र' असें प्रदेश–वाचक होतें असें गृहीत धरणें सयुक्तिक होणार नाहीं.

( २ ) देशांना जनाशिवाय आणखी कांहीं निराळ्या तऱ्हांनींहि, उदा. चतुर्दिशीं लक्षात येणाऱ्या भौगोलिक स्थितीवरून आणि त्याचप्रमाणें, अरण्य, वनस्पति वगैरेवरून नावें पडतात. या नामकरणामागे विशेष चर्चा, विचार वगैरे असण्यापेक्षा बहुजनाना नित्यव्यवहारांत येणाऱ्या प्रत्यक्ष अनुभवाचाच भाग जास्त असतो. पण 'महाराष्ट्र' या नांवाविषयी विचार केला तर सबंध देशाच्या विस्ताराची कल्पना येण्याकरिता आधीं पाहाणी होऊन मोजमाप केलें गेलें होतें असें गृहीत धरावें लागतें. पण हें प्राचीन काळी असंभाव्य आहे. शिवाय मोजमाप करून महाराष्ट्र असें नांव देण्यापूर्वी या देशाला काहीं तरी दुसरें एक नाव असलें पाहिजे. कारण 'महाराष्ट्र' हें नांव येईपर्यंत दुसरें कोणतेंच नांव त्या प्रदेशाला नव्हतें असें मानणे सयुक्तिक होणार नाहीं. या दृष्टीनेंसुद्धा 'महाराष्ट्र' हें नांव आधीचें असें ठरत नाहीं.

( ३ ) शिवाय 'महाराष्ट्र' हें 'राष्ट्र' स्वरूपांत फार प्राचीन काळापासून अस्तित्वांत होतें याला दुजोरा देणारे ऐतिहासिक आधार मिळत नाहीत.

'महाराष्ट्र' हा शब्द वररुचीच्या प्राकृत व्याकरणात प्रथम आढळतो. वररुचि हा ख्रिस्त शकाच्या आरभीं होऊन गेला असें मानण्यात येतें. नंतर 'महावंसो' नामक बौद्ध ग्रंथात महाराष्ट्र शब्दाचा उल्लेख येतो. हा ग्रंथ पाचव्या शतकाच्या मध्यात झाला असें मानतात. सहाव्या शतकातील वराह-मिहिराच्या 'बृहत् संहितेंत' 'महाराष्ट्रा' चे नाव आढळते. पुढें ७ व्या शतकात बादामी चालुक्य राजा दुसरा पुलकेशी याच्या दिग्विजयाचे वर्णन करणाऱ्या ऐहोळे-शिलालेखात 'महाराष्ट्राच' नाव कोरलेलें आढळते.

वररुचीच्या काळापासून आपल्या मोठेपणाने 'महाराष्ट्र' अशी ख्याति मिळविलेल्या देशाचें नाव त्यापूर्वीहि कित्येक शतकें अस्तित्वात असावे व त्याची कीर्ति आणि महत्त्व सर्व जनतेस कळलेले असावे हे स्पष्ट आहे. पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं त्या सुमाराच्या कोणत्याहि ग्रंथात महाराष्ट्राचे नाव ऐतिहासिक संदर्भात कोठेंहि आढळत नाही. महाभारताच्या प्राचीन प्रतीत 'महाराष्ट्राचें' नाव नाही. अशोकाच्या शिलालेखातहि महाराष्ट्राचें नाव नाही. गुप्त राजाच्या वेळी महाराष्ट्र या नावाने ओळखला जाणारा प्रदेश कोठें अस्तित्वात असल्याचें त्या काळच्या ऐतिहासिक लेखावरून दिसून येत नाही.

## 'माहाराष्ट्री' हें नांव केवळ भाषावाचक

पण राष्ट्र या नात्यानें जरी याचें अस्तित्व त्या काळीं मान्य नव्हतें, तरी भाषेच्या दृष्टीने याला गौरवस्थान होतें हें मात्र निश्चित आहे. वररुचीच्या व्याकरणावरून ही गोष्ट स्पष्ट होते. 'शेषम् माहाराष्ट्रीवत्' हें सूत्र माहाराष्ट्री ही सुप्रसिद्ध भाषा होती याचा स्पष्ट पुरावा होय. तेव्हा राष्ट्र म्हणून जरी महाराष्ट्रीय म्हणविणारे विख्यात नसले, तरी त्यांची भाषा चांगलीच प्रसिद्ध होती. सर्व प्राकृताना ही भाषा प्रमाण अशी मानली जात असे. यामुळें भाषेच्या प्रसिद्धीविषयीं वादच नाहीं. ही प्रसिद्ध बोली बोलणारे लोक त्यावेळी होते हें निर्विवाद आहे. पण या लोकाचें जें संस्कृतातील नाव 'महाराष्ट्र' तें त्याना कितपत यथार्थपणें लागू होतें याबद्दल शंका आहे.

## मूळ नांव 'महाराष्ट्र' कीं 'मरहट्ट'?

'महाराष्ट्र' या शब्दावरून बोध होत असल्याप्रमाणें हे लोक जर

अतिविख्यात राष्ट्राचे असते तर त्याचे या नांवाचेच ऐतिहासिक उल्लेख कां मिळूं नयेत असा मुद्दा उत्पन्न होतो. 'राष्ट्रिक' म्हणून मुळात काही जन होते त्याचाच पुढे महासंघ बनला व त्यावरून पुढें राष्ट्रिकाचें 'महाराष्ट्र' बनलें असें एक उत्तर वराल शकेस देता येईल. पण हें उत्तर समाधानकारक वाटत नाहीं. कारण राष्ट्रिक हा शब्द जनवाचक असला तरी तो 'आर्य' गणल्या गेलेल्या महाराष्ट्रिकाना लागू पडत नाही. 'राष्ट्रिक' याचा अर्थ काय? तर या देशाचा मूळ रहिवासी. विन्सेंट स्मिथ वगैरेंनींहि असाच अर्थ केला आहे. 'राष्ट्रिक' म्हणजे या प्रदेशातील मूळ रहिवासी असे ठरल्यास ते आर्येतरापैकीं एक असावेत असें म्हणावें लागेल. आणि यावरूनच विन्सेंट स्मिथ, डॉ. आळतेकर प्रभृति विद्वान् संशोधकाना राष्ट्रिक–राष्ट्रकूट हे आर्येतर ( native ) कर्णाट जनापैकी असावेत असें वाटलें असून त्यानी आपल्या ग्रथात हे आपलें मत नमूद केले आहे.

राष्ट्रिकाचा संबंध राष्ट्रकूटांशी जितका जवळचा असल्याचें ऐतिहासिक पुराव्यावरून दिसते तसा महाराष्ट्रिकाशीं असल्याचें दिसून येत नाहीं. इतिहासात राष्ट्रकूटाची घराणी अनेक आढळतात; त्याचे अनेक ताम्रपट मिळतात, तसें महारठ्ठिक किंवा महाराष्ट्रिक या नांवाचें राजघराणें एकहि अस्तित्वांत असल्याचा ऐतिहासिक पुरावा पुढे आलेला नाहीं.

भाषेतील वाक्प्रचार व म्हणीतून तत्कालीन जनतेच्या मनोवृत्ति सूक्ष्मपणें ध्वनित होत असतात. 'मारवाडी वृत्ति', 'तेलंगी ब्राह्मण' अशा वाक्प्रचारांतून ऐकूं येणारा व्यंग्य ध्वनि विचारार्ह आहे. एका प्रांताबद्दल दुसऱ्यास काय वाटत असतें हे अशा प्रकारच्या वाक्प्रचारांतून उघड होत असतें. 'गौडबंगाल' या वाक्प्रचारातून जादूटोणा, चेटूक वगैरे तंत्रविद्येबद्दल महाराष्ट्राची भावना चांगल्या प्रकारें व्यक्त होते. कै. इतिहासाचार्य राजवाडे याच्या लेखात एका ठिकाणी असे वाक्य येते : 'कडवा मुसलमान, घिप्पाड रजपूत, राठ कानडी .' यातील विशेषणे अभ्यसनीय आहेत. त्यातील राठ शब्द येथें विशेष महत्त्वाचा आहे. राठ शब्द 'राष्ट्र' शब्दापासूनच निष्पन्न झाला असावा. याशिवाय दुसरी व्युत्पत्ति दिसत नाहीं. हें जर खरे असेल तर मराठींतील 'राठ' शब्दात व्यंग्यार्थानें सूचित होणारे लोक मराठ्यांहून म्हणजे 'महाराष्ट्रिकाहून' निराळे असले पाहिजेत असे म्हणणें जरूर नाहीं काय?

यावरूनहि ' राष्ट्रिक ' हे महाराष्ट्रीयाहून निराळे असावेत असेंच ध्वनित होत आहे. राष्ट्रिक म्हणजे येथील मूळचे ( Native ) लोक हा अर्थ घेतला तर या लोकांची संस्कृतेतर दुसरी कोणती तरी प्राचीन भाषा असावी असा साहजिकच तर्क चालतो. हें राष्ट्रिक घराणें कानडी असावें असें डॉ. आळतेकरांचें मत आहे.

दक्षिणापथातील देशांची मूळ नावें तद्देशीय लोकांवरून आली असलीं पाहिजेत असें आजपर्यंतच्या संशोधनावरून सिद्ध होत आहे. संस्कृत साहित्यात ' द्रविड ' या नावानें उल्लेखिलेल्या लोकांच्या देशाचें मूळ नाव ' तमिळ ' हेंच असल्याचें आज सर्वमान्य झालें आहे. तमिळ या शब्दाचें संस्कृतीकरण होऊन ( दमिळ, द्रामिळ, द्रमिड, द्रविड ) त्याचीं द्रविड आणि द्राविड अशीं दोन रूपें रूढ झालेली आढळतात. इतकेंच नव्हे तर ' द्रविड ' हाच शब्द मूळ असें समजून पंडितानी त्याचें पुन्हा द्राविडीकरण करण्यास आरंभ केला! आणि अशाप्रकारें द्राविड शब्दापासून बनलेला ' तिरमिड ' हा शब्दहि तमिळ साहित्यातच दृष्टोत्पत्तीस येतो !

Tamil was adopted into Sanskrit in early times as Dravida which occurs for example, in the Mahabharat, in Atharvaveda Parishishta and in the Code of Manu Not only has the word thus transliterated survived to us in Sanskrit literature, it even imposed itself on Tamil men of letters who retransliterated it into their own characters as " Tiramida "

( Indian Antiquery 1919 p. 194 )

द्रविडाचें तिरमिड झालेले असें एकच उदाहरण नाहीं. कर्णाटाचें ' करुनाडु ' असें जे रूप काही ठिकाणीं आढळतें तेहि याच प्रकाराचें आणखी एक प्रत्यंतर आहे.

' द्रविड ' शब्दच मूळचा अशी लोकसमजूत होण्याचें कारण संस्कृत साहित्याइतके प्राचीन लिखाण दुसऱ्या कोणत्याच भाषेंत मिळत नाहीं हे होय. यामुळें आपल्या देशातील प्राचीन जनाचा व प्रदेशाचा इतिहास समजण्यास संस्कृत ग्रंथ हेंच आजचें एकमेव साधन झालें आहे. संस्कृत ग्रंथातील प्राचीनतम उल्लेखानाच मूलाधार समजून आपल्या देशांतील इतिहास व संस्कृति जाणण्याचे प्रयत्न सुरू झाले.

पण यांत काही तरी चुकतें आहे याचें प्रत्यंतर पुढें अनेक गोष्टींवरून येऊं लागलें. वेद वगैरे ग्रथातील सर्व शब्दहि केवळ संस्कृतच आहेत कां अशी शंका विद्वानाच्या मनाला प्रथम चाटून गेली. तुलनात्मक भाषाशास्त्रानें यावर बराच नवीन प्रकाश टाकला व पुष्कळ सस्कृतेतर शब्द वेदात आहेत हे निदर्शनास आणले. या देशातील नाना जनाच्या रंग-रूप-आकाराचा व भाषांचा अभ्यास होऊं लागला तशा नवीन गोष्टी उजेडात येऊं लागल्या. आर्यपूर्व जन येथें काही होते हें सिद्ध झालें. पण त्याचे साहित्य असें काहीच मिळत नाही. श्रीरामचंद्रास साहाय्य करणारे "मर्कट" ही खरोखर वानरेच असतील काय अशी शंका उद्‌भवून मर्कट शब्दाची व्युत्पत्ति पाहाण्याची इच्छा काहींना झाली. मर्कट यात 'झाड' या अर्थाचा 'मर' हा प्राचीन द्रविडवर्गीय शब्द आहे. त्यावरून मर्कट म्हणजे झाडीत राहणारे वनातील जन, तेच वानर असा काहींनीं तर्क केला.

प्राचीन काळी या देशांत संस्कृत भाषेशिवाय दुसऱ्याहि भाषा बोलणारे लोक होते याला संस्कृत ग्रंथातूनच पुष्कळ आधार मिळतात. वेदात दास, पणी वगैरेंची नावें येतात. ब्राह्मणादि ग्रंथातून काही जनाविषयी 'वङ्गाः पक्षिणः' अशा तऱ्हेची वाक्यें येतात. पक्षी, गरुड, मर्कट, जाबुवंत वगैरे प्राण्यासारखीं जनवाचक नावे संस्कृत साहित्यात मिळतात. असे जनसमूह होते हें जर खरें तर त्याची भाषाहि असलीच पाहिजे हें स्पष्ट आहे.

नानाचर्मभिराच्छन्ना नानाभाषाश्च भारत
कुशला देशभाषासु जल्पन्तोऽन्योन्यमीश्वराः ॥

महाभारतातील (शल्यपर्व ४५.१०३) या उल्लेखावरून तेथें जमलेले राजे आपसांत बोलत असलेल्या नाना भाषा कोणत्या याचा काहींच बोध होत नाहीं !

भारताच्या राजधानींत, केंद्रीय लोकसभेत जमलेले लोक-प्रतिनिधि आपापल्यांत नाना देशभाषा बोलत असले तरी तेथील इतिवृत्त इंग्रजी भाषेतच लिहिलें गेलेले आपण पाहातों. इंग्रजीतील लिखाण तेवढें शिल्लक राहून देशभाषेंतलें सर्वच नष्ट झाले तर इंग्रजी आधारावरूनच पुढें आजचा इतिहास लिहावा लागेल. अशा स्थितीत ज्या प्रकारच्या चुका गैरसमजामुळें आपल्या

हातून होणें शक्य आहे, तशाच प्रकारच्या चुका, प्राचीन उपलब्ध संस्कृत साहित्यातील उल्लेखावर भिस्त ठेवल्यानें होत आहेत.

कर्णाट हेंच मूळ नाव असें समजून "कर्णाटदेशीयः कर्णदेशं अभूषयत्" (१४.१६५) व 'कर्णे अटति इति कर्णाटः' अशा व्युत्पत्त्या वेंकटाध्वरीनें व भट्टाकलकदेवानी सांगितल्या आहेत. कन्नड हें मूळ नाव असे आज निश्चित झालें आहे. तेलंगणाला तीन लिंगावरून नाव आले अशी जुनी समजूत होती. पण डॉ. लेवीनी त्रिकलिंगचें तिलंग तेलंग झाल्याचे दाखविलें आहे. या प्रांताला आंध्र असें दुसरें एक नाव आहे. तेंहि पण तेथील जनवाचकच आहे. कलिंगजन आस्ट्रो एशियाटिक वर्गाचे, तर आंध्र पत्तिजनसंबंधी (द्रविड वर्गीय) होत.

दक्षिणापथातील गुर्जर व महाराष्ट्र यांचीं आधीचीं नांवेंहि तमिळ, कन्नड, आंध्राप्रमाणेंच येथील मूळ जनावरूनच काही निराळीं असणें शक्य आहे. गुर्जराचें राष्ट्र तें गुर्जर झालें. गुर्जर जन अलीकडे आलेले परकीय लोक होत. तत्पूर्वी या भागाला लाट, सुराष्ट्र, अशी नावें होतीं. लाट म्हणजे 'नाट' जन. नाटाचा उल्लेख 'नटश्च करणश्चैव' या श्लोकांत मनुस्मृतीत आलेला आहे. हे नट, नाट म्हणजे राष्ट्रिकाचे पूर्वसंबंधी होते. नट व राष्ट्रिकावरून लाट व सौराष्ट्र ही नावें आली आहेत. आणि हे नट व राष्ट्रिक हे एतद्देशीय असल्याचे वर आलेंच आहे.

दक्षिणापथातच मोडणारा महाराष्ट्र हा आंध्र, कन्नड, व तमिळ यांच्याप्रमाणें मूळ एतद्देशीय जनाचाच असून त्याचें नावहि त्याच्याच भाषेतील असणें शक्य नाहीं काय? आर्यावर्ताबाहेरील देशाचें नाव 'महाराष्ट्र' असें संस्कृत भाषेतील असणें संभवनीय तरी आहे काय? यामुळेंच या देशाचें मूळ नांव 'महाराष्ट्र' नसून 'मरहट्ट' आहे असें म्हणणें जास्त समंजसपणाचे वाटतें.

## महाराष्ट्रीयांची पहिली वसाहत वऱ्हाडांत

भौगोलिक दृष्टीनें महाराष्ट्राचा निर्विवाद असा पुरावा सातव्या शतकापर्यंत मिळत नाही. मागें उल्लेखिलेल्या ऐहोळे-शिलालेखांत 'त्रयाणाम् महाराष्ट्रकाणाम्'

हें वाक्य मिळतें. पण हे तीन 'महाराष्ट्र' कोणते याबद्दल तज्ज्ञांत अद्यापि एकमत नाहीं.

तरी पण महाराष्ट्रीयांची पहिली वसाहत कोठें झाली याबद्दल सर्व संशोधकांचें एकमत असून ती वऱ्हाडात झाली असें निर्विवाद ठरलेलें आहे. वऱ्हाडचें नाव तर अतिप्राचीन काळापासून संस्कृतसाहित्यांत आढळतें. अगस्त्यानें विदर्भकन्या लोपामुद्रेशी विवाह केला व दक्षिणापथात आर्यीकरणास त्यानेंच सुरुवात केली अशी एक आख्यायिका आहे. वेदकाला-पर्यंत नेणारी ही दंतकथा बाजूस सारली तरी, महाभारतात विदर्भांचा उल्लेख आहे. हा विदर्भ म्हणजे वऱ्हाडच होय याबद्दल कोणाचाहि मतभेद नाहीं.

पुलकेशीने जिंकलेल्या तीन महाराष्ट्रामधील आणखी दोन महाराष्ट्र कोणते हें जरी आज अनिश्चित असले तरी त्यातील पहिला महाराष्ट्र कोणता हें पक्के ठरल्यासारखें झाले आहे. त्याचें नाव सस्कृतसाहित्यात 'विदर्भ' असें आढळत असलें, तरी आज त्याचें 'वऱ्हाड' हेच नाव सर्वत्र दिसून येतें. महाभारतादि संस्कृत ग्रंथातून विदर्भ या नावानें उल्लेखिलेला भाग पुलकेशीच्या शिलालेखातील तीन महाराष्ट्रापैकीं पहिला महाराष्ट्र होय. पण आजपर्यंत लोक भाषेंत याला 'वऱ्हाट' असेंच नाव असलेले दिसून येतें.

एकूण या भागास तीन नावें झालीं:—विदर्भ, वऱ्हाट आणि महाराष्ट्र. याची संगति काय ?

## विदर्भ व 'वरहाट' विचार

वऱ्हाडास असणाऱ्या निराळ्या दोन नावापैकीं 'महाराष्ट्र' हे मूळचें नाव नसावें याविषयी दोन तीन कारणे वर सागितली आहेत. विदर्भ हे नांव कां व कसे आले असावे हें गूढच आहे. 'हरिवंशा'त ( २. ६०. १० ), यादवकुळी विदर्भ नावाचा राजा झाला त्यावरून या देशाला विदर्भ असे नाव मिळाले असा उल्लेख आहे. "विंध्यस्य दक्षिणे पार्श्वे विदर्भान् यो न्यवेशयत् !" विदर्भ राजाने वसविलेला प्रदेश म्हणून याला विदर्भ देश असे नाव प्राप्त झालें ही पौराणिक परंपरा सोडली तर, समर्पक अशी एकहि दुसरी व्युत्पत्ति अजून पुढें आलेली नाहीं. याविषयी संशोधन होणें जरूर आहे. डॉ. केतकरानी आपल्या बेडर

वृत्तीने विदर्भाच्या व्युत्पत्तीविषयीं एक कल्पना सुचविण्याचें साहस केलें आहे. विदर्भाचे मूळ लोक कदाचित् 'बेडर' (बेरड) जातीचे नसतील काय अशी एक शंका त्यानी पुढें माडली आहे (प्राचीन महाराष्ट्र, भाग १ पृष्ठ १४). विदर्भ–विदर–बेदर–बेडर या नामसादृश्यावरून बेडराचा विदर्भाशीं संबंध जोडण्याचा मोह होणें साहजिक आहे; पण बेडर म्हणजे ज्यांना बेरड म्हणतात ते क्षत्रिय राज्यकर्ते म्हणून प्राचीनकाळी कधीच चमकले नाहीत. बेरड ही जात आर्य किंवा द्रविड वर्गाहून भिन्न अशा 'कोळी' (कोलमुंडा) वर्गात मोडते. विदर्भाच्या प्राचीन राजघराण्याचा संबंध यादव वंशाशी होता हें लक्षांत घेता बेरडाच्या वसाहतीमुळें या देशाला 'विदर्भ' नाव मिळाले असेल असें म्हणणें धाडसाचें होईल.

अशा रीतीनें या प्रदेशाच्या वरील तीन नावापैकीं आता 'वऱ्हाट' हें एकच राहलें. या वऱ्हाट शद्वाचा तरी कोठें समर्पक अर्थ लागला आहे असा प्रश्न कोणी उपस्थित करील. 'वऱ्हाट' शब्दाच्या साधारणपणें दोन व्युत्पत्ति पुढें आल्या आहेत :

(१) श्रीकृष्णाचें वऱ्हाड द्वारकेहून जें आलें तें येथेंच राहिलें; त्यावरून या प्राताला वऱ्हाड असें नाव मिळालें असे सागतात. ही कथा झाली; शास्त्रीय व्युत्पत्ति नव्हे. संशोधकात या व्युत्पत्तीला कोणी विशेष मान दिलेला दिसत नाहीं.

(२) दुसरी व्युत्पत्ति : वर्धा+तट=वऱ्हाट. वऱ्हाडच्या इतिहासाचे लेखक श्री यादवराव काळे व इतर काही विद्वान् या मताचे पुरस्कर्ते आहेत; पण ही व्युत्पत्ति बरीच फोल आहे असें पुष्कळ टीकाकारांचे मत आहे. Imperial Gazetteer (Vol. VII p. 361) मध्यें वऱ्हाडच्या या व्युत्पत्तीविषयीं लेखकानें शंका प्रदर्शित केली आहे. वऱ्हाडमध्यें तापी वैनगंगेसारख्या मोठ्या नद्या असता, ओहोळवजा एका प्रवाहासारख्या असणाऱ्या छोट्या वर्धेवरून सबंध प्राताला हें नाव मिळालें असेल हे केवळ असंभवनीय आहे. कारण वर्धातट देश अशा प्रकारचे प्रयोग कोठेहि मिळाल्याचें पुढें आलेलें नाहीं. दुसरी कोणतीही समर्पक व्युत्पत्ति आढळत नाही म्हणून अशा कोणत्यातरी रीतीनें बळेंच समाधान मानून घेणें हें विचारशक्तीला मारक आहे.

विदर्भ–वऱ्हाट देश महाभारत काळाहूनहि प्राचीन आहे हें जर खरें तर

त्याला तेथल्या जनांवरूनच नांव मिळालें असणें तितकेंच निश्चित आहे. तेव्हां या दिशेनेंच विशेष विचार-संशोधन करणें अधिक फलप्रद होईल.

वऱ्हाटच्या मायबोलीचें नाव मऱ्हाटी आहे यात तरी वाद नाहीं. भाषेवरून देशाला ( किंवा लोकाना ) नाव असा विपरीत कोटिक्रम कोणी करणार नाहीं. भाषेला नाव तद्भाषिक लोकावरून किंवा देशावरून येत असतें. वऱ्हाटची मूळभाषा मऱ्हाटी हें जर ठाम आहे तर त्या भागाचें मूळ नाव 'मऱ्हाट' असेंच असावयास नको काय? या भागाचे नाव 'मऱ्हाट' किंवा 'मरहट्ट' असे ठरल्यास वऱ्हाट शब्दाची व्युत्पत्तिहि अत्यंत सरळ रीतीने आपणास कळणार आहे. 'म' चा 'व' होण्याची कानडीतील लकब लक्षात घेता मूळ मऱ्हाट हा शब्द 'वऱ्हाट' अशा रीतीनें कसा बदलला असावा हें आपल्या ध्यानांत येईल. मकाराचा वकार होतो असें हेमचंद्रादि प्राकृत वैय्याकरणीहि सागतातच. 'म'काराचा 'व'कार झाल्याचीं उदाहरणेंहि आहेतः मीमासा=विवास ( पाली ); मन्मथ=वम्मह ( प्राकृत ) मगध-वगध; 'वंगा वगधाश्चेरपादाः ।' या ऐतरेय आरण्यकातील ( द्वि. १-१-९ ) संस्कृत वाक्यातहि मकाराचा वकार ( मगध-वगध ) झालेला आढळेल. याप्रमाणे 'मऱ्हाट-वऱ्हाट' असें झालें असणें अशक्य नाही.

## वऱ्हाट ( मऱ्हाट ) चे मूळ रहिवासी

येथील लोकाना 'मरहट्टे' असें नांव होते हे अपभ्रंगकाव्यत्रयी वगैरे ग्रथांवरून दिसते. लोकावरून देशाला नाव प्राप्त होतें हें सूत्र लक्षात घेतां यावरूनहि वऱ्हाडचें मूळनाव 'मऱ्हाट' किंवा 'मरहट्ट' हेंच सिद्ध होतें.

वऱ्हाडात 'हटगार' नांवाचे लोक आहेत. "Hatgars are of considerable importance in Berar" असें तेथील जाति व जन याचा अभ्यास केलेले एंथोवेन वगैरेसारखे तज्ज्ञ लिहितात. ( Tribes and Castes in Central Provinces, Volume IV pp. 204, 206 ) वऱ्हाटची पुष्कळ देशमुख-देशाचे प्रमुख-घराणीं 'हटगार' ( धनगर ) कुळीचीं असल्याचें कळतें. हटगाराना हटगार-धनगर किंवा धनवडे ( मराठे ) म्हणण्याची प्रथा वऱ्हाडकडे आहे. हे मुळात गोपालनवृत्तीचे लोक होत. ( गो ) धन पाळणारे म्हणूनं यांना धनगर नांव मिळाले. हटगार या शब्दाचा अर्थहि कानडींत

गोपाल असाच आहे. हटगारांची ज्या भागात प्रमुख वसाहत आहे त्या भागाला हट्ट देश म्हणून नाव मिळालें असल्यास आश्चर्य तें काय ?

## 'मरहाट' म्हणजे 'झाडमंडळ'

या भागाला 'हट्ट' देश असें मूळ नाव हटगार (मराठे) लोकांवरून मिळालें असें गृहीत धरलें तरी 'मरहट्टातील' 'मर' याचे औचित्य काय याचा उलगडा अद्याप झालाच नाहीं.

हट्टी म्हणजे पट्टी, गौळवाडा, घोष, प्रदेश असा अर्थ आहे. आतां मरहट्टातील 'मर' याचें स्पष्टीकरण होण्यास या प्रदेशाच्या आणखी एका रूढ नावाचें साहाय्य घेणें जरूर आहे. या भागाला 'झाडमंडळ' किंवा 'झाडिमंडळ' असें नाव प्रचारात असलेलें दिसून येतें. नागपूर वऱ्हाड-कडील आधुनिक प्रांताभिमानी साहित्यिक आपल्या नावापुढे 'झाडिमडळस्थ' असें विशेषण लावून घेत असलेले आढळतात. 'झाडिमडळ' हा शब्द एका जुन्या यादवकालीन ताम्रपटात मिळतो. हेमाद्रीनें झाडिमंडळ जिंकून घेतल्याचें त्यात वर्णन आहे. (पाध्येकृत 'हेमाडपंताचें चरित्र' पहा.) महानुभाव चक्रधराच्या 'लीळाचरित्रात' 'झाडिमंडळ' हा शब्द बऱ्याच वेळा येतो. नरेंद्रकृत 'रुक्मिणीस्वयंवरात' (खि. श. सुमारें ११८५) 'झाडमंडळ' हा शब्द आलेला आहे (ओवी २४५). प्राचीन मराठीचे सुविख्यात संशोधक, 'झाडमंडळ'चे रहिवासी, प्रा. कोल्ते यानीं संपादिलेल्या 'रुक्मिणी-स्वयंवर' ग्रंथात 'झाडमंडळ' म्हणजे 'गोंडवन' 'आजचा मध्यप्रांत' असा अर्थ दिलला आहे. तेव्हा वऱ्हाड देशाला 'झाडमंडळ' असें प्राचीन नाव होतें आणि ते बाराव्या शतकाच्या सुमारास प्रचलित होतें याबद्दल शंका राहात नाही. यावरून 'झाडमडळ' आणि 'मऱ्हाट' हे दोन्ही समानार्थक शब्द आहेत हें निश्चित ठरलें. येथे 'मर' शब्दाचें कोडहि आपोआप आश्चर्यकारक रीतीनें सुटत आहे. 'हट्ट' किंवा 'हट्टी' या कानडी शब्दाचा अर्थ मंडळ किंवा प्रदश असा होतो हें मागें सुचविलें आहेच. कानडीतील 'मर' या शब्दाचा झाड असा मराठी अर्थ आहे. एकूण 'मरहाट' म्हणजे 'झाडमंडळ' असें हें भाषांतर आहे.

असे हें भाषांतर का झालें असा प्रश्न मनात येणें साहजिक आहे. पण

अर्थ नीट कळण्याकरिता अशा प्रकारें भाषातर करण्याची पद्धत सर्वत्र दिसून येते. 'मरहाट' या शब्दयोजनेनें अर्थबोध होईनासा होताच भाषातराची आवश्यकता उत्पन्न होणें साहजिक आहे. मरहाट 'हे आम्हामी कानडे' जेव्हा झाले त्यावेळीं झाडमंडळ अशा दुसऱ्या स्पष्टीकरणाची जरुरी उत्पन्न झाली असावी. नाहीतर 'झाडमंडळ' या नावाच्या औचित्याची व आवश्यकतेची दुसरी उपपत्ति लागत नाही. वोली-शेला, चूल वैल, कोल-काटी वगैरे भाषातरित जोडशब्द हे अशाच प्रकारच्या सक्रमणावस्थेंत प्रचारात आलेले आहेत. याच अनुरोधाने विचार केला असता 'मरहाटाचें' महाराष्ट्र असें संस्कृतीकरण कसे झाले असेल याचाहि उलगडा होणार आहे.

## भाषांतराचे दोन प्रकार

दोन भाषिकाचा सपर्क वाढत जातो तसें त्याच्या भाषातील शब्दाची देवाण घेवाण सुरू होते. अशावेळीं काही विशिष्ट प्रकारची घटना पाहावयास मिळते. यातहि दोन प्रकार आहेत. एक तर दुसऱ्या भाषेतील शब्द आपल्या उच्चारास आणि भाषेच्या प्रकृतीस अनुरूप होतील असा काहीसा बदल करून घेण्याची प्रथा आहे. उदाहरणार्थ 'अॅडरसन' मराठीत 'इद्रसन' होतो. 'स्टुअर्ट' 'इस्टुरफाकडा' होतो. ही जुनी पेशवाई उदाहरणें वगळली तरी आधुनिक मॅक्समुलर हा ऋग्वेदाच्या छापलेल्या प्रतावर 'माक्षमुल्लर भट्ट' असे स्वतःचे नाव घालतो.

परभाषेतील शब्द घेण्याचा दुसरा प्रकार म्हणजे सबंध अर्थाचे भाषातर करून नवीन शब्दच बनवावयाचा-उदाहरणार्थ, Red Sea ताबडा समुद्र. शिलालेखात अशा प्रकारची पुष्कळ उदाहरणे आढळतात. किसुवोळल् (किसु म्हणजे ताबडा, वोळल् म्हणजे नगर) याचें भाषातर रक्तपुरी असें केलेलें आपणास दिसून येतें.

वरील दोन प्रकारापैकीं पहिला प्रकार हा बऱ्याच आरंभकालाचा असतो आणि पुष्कळ देशाचीं नावें याच प्रकारे संस्कृतमध्ये शिरलेली आपणास दिसतात. 'कन्न–नाडु' (कन्न लोकाचा देश) याचें संस्कृतीकरण होऊन कण्णनाड–कण्णाड–कण्णाट–कर्णाट असे झालें. याचप्रमाणें मरहट्ट-मरहाट-मऱ्हाट महाराष्ट्र अशा प्रकारें संस्कृत रूपातर झालें असणें शक्य आहे. यामुळेंच संस्कृतांत

जरी महाराष्ट्र असा राष्ट्रवाचक उल्लेख बऱ्याच प्राचीनकाळीं आढळला तरी महाभारतादि ग्रंथातून प्रमुख राष्ट्राच्या यादींत या देशाचें नाव स्वाभाविकपणेंच आलेलें नाहीं. याप्रमाणें पहिल्या प्रकाराने जसे 'मरहट्टा' चें संस्कृतात 'महाराष्ट्र' झालें त्याचप्रमाणें 'मरहाटा' चे 'झाडिमंडळ' हें दुसऱ्या प्रकारें झालेल्या भाषांतराचे सुंदर उदाहरण आहे.

आपल्याकडील प्राकृत ग्रंथांतून मरहट्ट असें रूपच विशेषेंकरून आढळतें. पण सिंहलद्वीपस्थ पंडिताकडून रचल्या गेलेल्या महावंसो ग्रंथात 'महरट्ठ' असा प्रयोग आढळतो. द्रविड शब्द मूळचा समजून 'तिरमिड' हें रूप जसें पुढें आलें तसे 'महाराष्ट्र' या शब्दावरून 'महरट्ठ' हा तद्भव शब्द त्यानीं बनावला असें दिसतें. कारण राठ–राष्ट्रिक हे महाराष्ट्रीयापक्षा निराळे आहेत हें राठ शब्दातील व्यंग्य ध्वनि दर्शवीत आहे.

## आजपर्यंतचे 'महाराष्ट्रा' च्या व्युत्पत्तीचे प्रयत्न

आजपर्यंत 'महाराष्ट्र' शब्दाची व्युत्पत्ति लावण्यात मुळांतच गैरसमज झाल्यानें कोठलीहि समर्पक अशी व्युत्पत्ति पुढे आलेली नाहीं. विल्सन-मोल्सवर्थ प्रभृतीनीं लोकावरून देशाला नाव मिळते हें मूळ तत्त्व स्वीकारलें, पण तरीहि 'महाराष्ट्र' हाच मूळ शब्द मानण्यात ते चकले आणि 'महाराष्ट्र' या शब्दावर भिस्त ठेवून 'महाराचें राष्ट्र' असा तर्क त्यानीं लढविला पण हा केवळ तर्क असें आता सिद्ध झाल्यानें त्याविषयीं पुन्हा चर्चा करण्याची जरूरी नाहीं.

आता काही विद्वानानीं, 'महारथी,' 'महारठी' 'राष्ट्रिक–महाराष्ट्रिक' वगैरे कल्पना लढवून महाराष्ट्राची व्युत्पत्ति सागण्याचा प्रयत्न केलेला आहे. पण डॉ. भाडारकरापासून तों डॉ. काणे याच्यापर्यंत झालेल्या सर्वांच्या एतद्विषयक वादविवादावरून एकाची व्युत्पत्ति दुसऱ्यास संमत नाहीं हेंच सिद्ध होतें. डॉ. भांडारकर, श्री. राजवाडे, डॉ. काणे वगैरेंचीं परस्परविरोधी मतें पाहिलीं कीं अजून महाराष्ट्र शब्दाची समंजस उपपत्ति पुढें आलेली नाहीं हें स्पष्ट होतें. 'रथिक' म्हणजे वीर याच्यावरून प्राचीन काळीं देशाला नाव मिळालें, असें गृहीत धरणें ऐतिहासिक क्रमाला धरून नाहीं. वीर ही अवस्था राजकीय उलाढालीच्या वेळची आहे. 'हट्टी' जन हा शब्द पशुपालनवृत्तीचा द्योतक आहे.

यामुळें या शब्दावरूनच 'हट्ट' देश असें नाव आलेलें, ऐतिहासिक व सामाजिक विकासास अनुसरून दिसतें.

वरील विवेचनावरून माझ्या मतें या देशाचे नाव मूळचें महाराष्ट्र नव्हे. मरहट्ट हेंच याचे मूळ नाव असून त्याचें संस्कृतीकरण होऊन 'महाराष्ट्र' झालें आणि त्याचेंच भाषांतर 'झाडिमंडळ 'होय. मकाराचा वकार होऊन 'मऱ्हाट' चें 'वऱ्हाट' असें आजचें नाव प्रचारात आलें.

कित्येक देशाच्या नावावरून संगीतातील राग-रागिण्यांना नावें मिळालीं आहेत. कानडा, तिलंग ही याची उदाहरणें होत. 'महाराष्ट्र' असा राग यांत नसावा हे विचित्र दिसतें. पण थोडे खोल पाहिले असता असा पक्षपात झालेला नाही असें दिसेल. 'वराळी' हा महाराष्ट्राच्या नावाचा राग आहे. वराळी म्हणजे वराडी हाच मराठ्याचा रागविशेष आहे. यावरूनहि 'महाराष्ट्र' हा शब्द पूर्वी राष्ट्रवाचक नसावा हेंच निश्चित ठरतें व वऱ्हाट = मऱ्हाट हें नावच आरंभीचें असावें या मताला दुजोरा मिळतो.



: २ :

# स्थलनामें आणि समाजेतिहास

मानवेतिहास जाणण्याची पुष्कळ साधने आहेत. त्यांत स्थलनामाचा अभ्यास हें एक साधन आहे. कोणत्याहि साधनाकडून होऊं शकणाऱ्या साहाय्याला काहीं एक मर्यादा असते. त्या मर्यादेपलीकडे तें साधन गैरलागू ठरून निरुपयोगी होतें. इतकेंच नव्हे तर त्यामुळें, आपण जे सत्य जाणू इच्छितों त्यापासून दूर आडमार्गात जाण्याची भीति असते. स्थल नामाच्या अभ्यासात तर ही भीति याहून विशेषच आहे. या साधनाचा उपयोग करतेवेळी दिशाभूल होऊं नये म्हणून जितकी काळजी घेता येईल तितकी हितावह आहे. शक्य ती दक्षता बाळगूनहि नकळत काही उणीवा या राहतातच. पण त्याचीहि योग्य छाननी व्हावी व जास्तीत जास्त सत्य जाणता आलें तर जाणावें या हेतूनेंच या लहानशा मुद्यावर काहीं विचार या प्रकरणांत माडले आहेत.

## स्थलनामांच्या मागील जुना इतिहास

अतिपरिचयामुळें पुष्कळ गोष्टीतील अर्थ-स्वारस्य बरेचसें कमी होतें म्हणतात, तें काहीं खोटें नाहीं. याला अतिशय जवळचेंच उदाहरण म्हणजे आपल्या गावांचीं नावेंच घ्या. आपण राहात असलेल्या गावाला मिळालेलें विशिष्ट नाव कां प्राप्त झालें हें निश्चितपणें सागणें आज जवळ जवळ अशक्य

झालें आहे. याचें कारण आपण पिढ्यान्‌पिढ्या तिकडे दुर्लक्ष करीत आलों, हेंच नव्हे काय? स्थलनामाच्या योगानें आपणास कितीतरी जुना इतिहास कळूं शकतो, याची जाणीव फारच थोड्याना आहे. आपल्या देशातील पुष्कळ विचारवंताचें लक्ष अजून इकडे पुरेसें वेधले गेलेलें नाहीं यावरून हेंच सिद्ध होते.

एकेक स्थळनाव घेऊन ते नाव कसें रूढ झालें याचा शोध घेत जाणें ही एक पद्धत झाली. पण तुलनात्मक अभ्यासाचा प्रकार याहून थोडा निराळा आहे. एकेका विशिष्ट प्रदेशातील शक्य तों एकूण एक स्थलनामांची यादी करावयाची, त्याच्या नावाचे जुने सर्व फेरफार जाणावयाचे. अशा रीतीने नावें जमवीत असता त्यात आपणास आपोआप काही गट पडत असलेले दिसून येतात. उदाहरणार्थ, स्थलनामातील पूर्व भागावरून त्यात वीस ते पंचवीस गट होतील. पौराणिक प्रसंगावरून, देवादिकांवरून, ऐतिहासिक प्रसंग व व्यक्ति यावरून, ग्रहनक्षत्रावरून, वाराच्या नावावरून, संख्यांवरून, दिशावरून, वृक्ष वनस्पतींवरून, कृमिकीटकावरून, गुराढोरावरून, पशुपक्ष्यावरून, उंचसखल वगैरे भौगोलिक परिस्थितीवरून, लोकजातीवरून, व्यवहारोद्योगादिकावरून वगैरे स्थलनामाचे विविध गट होतात.

या एकेका विभागात येणाऱ्या स्थलाच्या नांवावरून बरीच सूक्ष्म अशी नवी माहिती नजरेस येते. एकेका स्थलाचे नाव सुटें घेतलें असता काहींचा अर्थबोधच होत नसतो. पण गटात त्याचा अर्थ चटकन लक्षात येतो. भाषेतील शब्दाची जुनीं रूपें कळतात. नानातऱ्हाच्या अपूर्व झाडाझुडुपाची माहिती मिळते. एकेकाळी त्या भागात कोणत्या देवता लोकप्रिय होत्या हे समजतें. गतकालीन प्रभावी महाभाग, ऋषि, मुनी, योगी, संत, महंत, सिद्ध, सत्पुरुष किंवा राजकारणी महापुरुष यांचें अजरामर स्मारकच जणुं, अशीं पुष्कळ स्थलाचीं नावें कालप्रवाहासहि दाद न देता तगून उभी असलेलीं दिसतात. काही गावाच्या नावांवरून, त्याच्या पंचक्रोशीतील खनिज संपत्ति आदीची सूचना मिळते. अशाप्रकारच्या सूचनेवरूनच भद्रावती (म्हैसूर) जवळील लोखंडाच्या कारखान्याला आरंभ झाला. या प्रकरणात स्थलनामाच्या पूर्वभागाचें विवरण प्रस्तुत नाही म्हणून त्याचा विस्तार येथे इष्ट नाही.

कोणतेंहि ग्रामनाम घेतलें तरी सामान्यपणें त्यात दोन शब्द आढळतात. पण कांहीं ठिकाणीं पूर्व भागाइतका उत्तर भाग स्पष्ट नसतो. नित्य व्यवहारातील बोलीत तो बराच संक्षिप्त झालेला दिसतो. नाग+पूर, सिंद+खेड, कंद+ऊर. अशा ठिकाणी जी स्पष्टता आहे, ती जुन्नर, खोपवली वगैरे ग्रामनामात नाही. त्याठिकाणी जुने+नगर, खोप+पल्लि अशा स्पष्टिकरणाची आवश्यकता भासते. नाशिक, नगर, पाटण वगैरे काहीं गावाच्या नावात उत्तरपद रूढ नसते. तरी अशा नावापुढे शहर, गाव, खेडें असे काही एक ग्रामवाचक उत्तरपद जोडण्याचा प्रघात आहेच. वर सागितल्याप्रमाणें पूर्वभाग वितरणात्मक असतो. उत्तरभाग स्थान, तीर किंवा प्रदेश याचा वाचक असतो.

मंगळवाड, गणेशवाडी, उदयगिरी, सिंहगड, विंचूर, चाळिसगाव, नागपाडा, वोडनदी, इत्यादि उत्तर भागातील, गड, गिरि, नदी, खोरें, घळ वगैरे नावें वगळली तर बाकीची पूर, गाव, वाड, वाडी, हाट अशीं स्थान किंवा प्रदेश या अर्थाचींच नावें राहातात.

शब्दाच्या उत्तरभागावरून वसतिस्थानाची काही कल्पना येऊं शकते. तळे, नदी, खोरें, गड अशा नावावरून त्या गावाच्या भौगोलिक परिस्थितीची अटकळ करता येते. खेडें, खोप, नगर, वाडी, पूर यासारख्या शब्दावरून ते गाव छोटें आहे किंवा मोठें आहे असा काहींसा तर्क करण्यास अवकाश मिळतो. तसेंच आपल्या वसाहतीला कोणत्या तऱ्हेनें आरंभ झाला व त्याची वाढ कशी होत गेली, हे पाडा, पाडि, वाडा, वाडि...हाट या वर्गातील ग्रामवाचक शब्दावरून बरेचसें कळून येतें. पाडा-वाडा-हाट या वर्गातील ग्रामनामाची या दृष्टीनें अजून कोणी चिकित्सा केलेली नाही. तिचा हा प्रथमच प्रारंभ आहे. या विवेचनात काही तथ्याश आहे असे ठरेल तर आपल्या प्रागैतिहासिक, अत्यंत महत्त्वाच्या पण आजपर्यंत संदिग्ध असणाऱ्या काही गोष्टीचा सुगम रीतीनें उलगडा होणार आहे.

## 'पट्टि'–'पाडि' ची व्युत्पत्ति

'पट्टि, पाडि, पाडा,...वाडि, वाडा...हट्टि, हाट, हाडि...' हे या वर्गातील मुख्य शब्द आहेत, याचा सामान्य आराखडा पुढें दिला आहे. पण

प्रथम हे शब्द स्वतंत्र आहेत किंवा एकाच मूळ धातूपासून उत्पन्न झालेलीं ही विविध रूपें आहेत हे स्पष्ट करून घेणें जरूर आहे.

'पाडगाव' सारखे काहीं अपवाद सोडले तर 'पट्टि, पाडि, पाडा,... वाडि, वाडा...हट्टि, हाट' हे शब्द साधारणपणे ग्रामनामाच्या शेवटीं आढळतात; तेथे सर्वत्र 'स्थळ' 'जागा' 'प्रदेश' असाच मुख्यार्थ आढळतो. उदाहरणार्थ कडपट्टी (जमखंडी जवळचे खेडे), कोकणपट्टी (प्रदेश), गोपाडि (मंगळूर कडील खेडे), ताळेपाडि, नागपाडा, कुरुडुवाडि, मऱ्हाटवाडा, हाटवटि, शिरहट्टी, हाडि (ग्राम) वगैरे या वरील उदाहरणातील 'पट्टि, पाडि, पाडा याना एक अर्थ, 'वाडि, वाड' याना दुसरा अर्थ व 'हट्टि, हाट' याना तिसराच अर्थ संभवत नाही. सर्वात स्थलवाचक अर्थच पुरेपूर भरला आहे. यामुळें हे सर्व शब्द सामान्यपणें समानार्थी आहेत असें म्हणावें लागतें.

'पट्टि, पाडि, पाडा...वाडि, वाडा.. हट्टि, हाट' यात अर्थ सादृश्याप्रमाणे रूपसादृश्यहि आहे. 'पाडि' आणि 'पाडा' हे शब्द भिन्न मानण्याची जरूरी नाही. वाडि, वाडा, वाड व वड ही भिन्न म्हणता येणार नाहींत. नित्य व्यवहारातील उच्चारात किंचित् फरक पडत जाऊन अंत्य इकारामध्ये बदल होत होत 'वाडि' चे वाडा, वाड, वड असें रूपातर होत गेलेले दिसून येते. कर्णाटक, तेलंगण, तमिळ या देशात पट्टि, पाडि व पाडु हे शब्द जितक्या प्रमाणात आहेत तितके ते उत्तरेकडे आले असता कमी प्रमाणात दिसून येतात. संस्कृतोद्भव बोलीत शब्दान्त्य उ, इ पेक्षा अ, (किंवा आ) कडे जास्त कल दिसतो. 'हालु' शब्द हाला किंवा हाल या स्वरूपात बदललेला आढळेल. 'ऊरु' चे 'ऊर' किंवा 'ऊरा' असे होतें (उदाहरणार्थ, केंदूर, बकूरा) याप्रमाणेंच 'पाडि, पाडा' ही 'पाडु' चीच भिन्नरूपे मानणें जरूर होतें. तसेंच वाडा, वाड किंवा वड हे शब्द 'वाडि' चीच निरनिराळी रूपे होत. पट्टि आणि पाडि (पाडु) हे शब्द मुळात 'पडु' या धातूची साधित रूपें आहेत, असें सर्व द्राविडवर्गीयभाषा–कोविदाचें मत आहे.

आता मुख्य प्रश्न राहातो तो हा की, 'वाडि' (वाडा) हा स्वतंत्र शब्द आहे कीं, पाडीपासूनच तो निष्पन्न झाला ? संस्कृत व प्राकृत परंपरेप्रमाणें 'वाटिका'पासून 'वाटि-वाडि' झालें आहे. 'वाट' पासून 'वाड' झालें

आहे. यात वाटि आणि वाट हे शब्द निराळे मानण्याची जरूरी नसता, तसे ते गृहीत धरले गेले आहेत! आणि या शब्दाच्या व्युत्पत्तीविषयी संस्कृत विद्वानातच मतैक्य दिसत नाही. वृत्त-वट्ट-वाट-वाड अशी व्युत्पत्ति काही विद्वान सुचवितात, तर काहीं वर्ति-वट्टि वाटि-वाडि असे गृहीत धरतात. आणखी काही तर वटवृक्षाशीं 'वाटि-वाडि' चा संबंध जोडू पाहातात! 'वाड' करिता 'वृत्त' ची आवश्यकता भासली, वाडि पाहताच 'वर्ति' कडे धाव घ्यावी लागली हे स्पष्ट आहे. मुळात 'वाड' आणि 'वाडि' भिन्न समजल्याने हा घोटाळा झाला आहे.

'पाडि' पासून 'वाडि' शब्द निष्पन्न होतो हे लक्षात घेतले तर वरील सर्व यातायात चुकून घोटाळे दूर होणार आहेत. 'प' काराचा 'व' कार होऊन 'पाडि' चा 'वाडि,' 'पाडा' चा 'वाडा' झाला आहे. या तऱ्हेचे काही जुने प्रयोग पाहिल्यावर याविषयी शंकेला जागाच राहात नाही.

'सप्तार्ध लक्ष रट्टपाडि" चा उल्लेख जुन्या ताम्रपटातून वगैरे मिळतो. (South Indian Inscriptions Vol I pp 63,65) रट्टपाडी म्हणजे रट्टाचा देश. 'पाडि' चा देश, प्रदेश असा अर्थ येथे सुस्पष्ट आहे. 'रट्टपाडि' प्रमाणेच गंगवाडि, सिंदवाडि, नोळंबवाडि, कन्नवाड वगैरे प्रयोग शिलालेख, ताम्रपट वगैरेमधून पुष्कळ आलेले आहेत. येथे रट्टपाडिप्रमाणेंच, गंगपाडि, सिंदपाडि असे मूळरूप असलें पाहिजे. संधि होताना 'पाडि' चें 'वाडि' झाले आहे यात शंका नाहीं.

कर्णाटातील ताम्रपट व शिलालेखातून नोळंबवाडि, कन्नवाडि अशा तऱ्हेनें 'वाडि' युक्त समस्त शब्द आढळतात, पण तमिळनाड मधील ताम्रपटातून 'वाडि' च्या ऐवजी 'पाडि' हा शब्दच उपयोजिलेला आहे. कर्णाटात आढळणाऱ्या रट्टपाडि या प्रयोगाप्रमाणे तेथें गंगपाडि, नोळंबपाडि, तडिगेपाडि अशाप्रकारचीं उदाहरणे फ्लीट याच्या नजरेस आलीं आहेत (South Indian Inscriptions Vol. I pp 63, 65). या उदाहरणावरून वाडिचें पूर्वरूप पाडि हेंच होय यांत शंका नाही.

हेमचंद्राच्या प्राकृत व्याकरणात याला आधारहि आहे. "पो वः" (८·२·२३१) या सूत्राप्रमाणें 'पाडीं' तील 'प' काराचा 'व' कार होउं

शकतो. 'स्वरात् परस्य असंयुक्तस्य अनादेः परस्य प्रायो वो भवति ॥' असें या सूत्राचें विवरण दिले आहे. यावरून गंगवाडि, नोळंबवाडी अशा उदाहरणातील "वाडि"चे मूळ रूप 'पाडि'च आहे हे निःसंदिग्ध रीतीनें सिद्ध होत आहे. 'पाडि"चें वाडि ज्याप्रमाणे होतें, त्याचप्रमाणें पळ्ळि(-ळ्ळि) चे वळ्ळि (-ळ्ळि) झालेली उदाहरणेहि पुष्कळ मिळतात. उदा० तिळवळ्ळि, कासवलि इत्यादि.

प्राकृत व्याकरणाप्रमाणे कानडीचाहि या लकबाला पूर्ण पाठिंबा आहे. नागवर्मा याने 'कर्णाटक-भाषा-भूषण' नामक ग्रंथात कानडी व्याकरणसूत्रें संस्कृत भाषेत रचली आहेत (इ. स. ११४५). याचाच 'काव्यावलोकन' हा दुसरा ग्रंथ आहे. त्यात 'शब्दस्मृति' विभागात व्याकरणविचार येतो. या दोन्हीत अनुक्रमे ३१ व १२ या सूत्रात 'प' 'ब' 'म'काराचा 'व'कार कोठें संभवतो हें सांगितलें आहे. केशिराजाने 'शब्द-मणि-दर्पण' नावाचा व्याकरणग्रंथ लिहिला आहे (इ. स. १२६०). त्यानें आपल्या ग्रंथाच्या ६७ व्या श्लोकात हाच नियम दिला आहे. भट्टाकलंक देवानें (इ. स. १६००) संस्कृत भाषेत, कानडी प्रौढव्याकरण लिहिले आहे. ५९२ सूत्रें देऊन त्यावर 'भाषामंजरी' नामक वृत्ति व 'मंजरी मकरंद' नामक व्याख्यान लिहिलें आहे. यातील ९१ व ९२ सूत्रात 'प' 'ब' 'म'काराचा 'व'कार होण्याचा नियम सांगितला आहे.

समासात आणि वाक्यात 'प', 'ब', 'म' यांचा 'व' कार होतो, ही प्रथा कानडीत अतिप्राचीन आहे. प्राकृतातहि असाच नियम दिसून येतो. कानडी आणि प्राकृत यातील या वैशिष्ट्याचे गमक लक्षात न आल्यानें मराठींतील काही कोडी न सुटता आजपर्यंत ती जशींच्या तशीच राहिली आहेत. 'वाडि, वाड' याचीच व्युत्पत्ति केवळ नव्हे, 'वऱ्हाड' शब्दाचा सुद्धां उलगडा न होतां आजपर्यंतचे सर्व तर्कवितर्क आडमार्गात नेण्यास कारणीभूत झाले आहेत हे आपण मागे पाहिलेच. एकूण 'पट्टि, पाडि, पाडा, 'वाडि, वाडा', 'हट्टि, हाट, हाडि' यातील 'पट्टि, पाडि, पाडा व वाडि' हे शब्द स्वतंत्र नाहीत, 'पट्टि पाडि' ची ही सर्व निराळी रूपें आहेत असेंच ठरते. आता 'हट्टि, हाट' चा प्रश्न : हट्टि आणि हट्ट, हे निरनिराळे शब्द

समजण्याची जरूरी नाही कारण ' वाडि, वाडा, वाड ' प्रमाणेच उच्चारातील अस्पष्टपणामुळें हे प्रकार निर्माण झाले आहेत. हट्टि व हट्ट हे शब्द संस्कृतातून मराठींत आले अशी बऱ्याच विद्वानाची समजूत आहे. आणि संस्कृत ' हट् ' ( प्रकाशणें ) धातूपासून याची व्युत्पत्ति सांगितली जाते. पण ' हट्टि ' हा शब्द संस्कृत नाही असे वाटतें. हेमचंद्राच्या ' देशीनाममालें ' त ' हट्टि गृहभेदे च '; ' ग्रामे ऊरुः ', असे दिलेले आढळते. ' ऊरु ' ( ग्राम ) याप्रमाणेच ' हट्टि ' शब्द संस्कृत नसून देशी आहे, असें हेमचंद्रासारख्या संस्कृत व प्राकृत उभय भाषाविशारदाचे मत आहे.

' हट्टि ' हा देशी शब्द असें ठरल्यास त्याची व्युत्पत्ति सरळ लक्षात येण्याजोगी आहे. जुन्या कानडीत ' ह ' कार नाही. संस्कृत भाषेच्या संपर्कानें कानडी भाषेवर जे काही बरेच मूलगामी परिणाम झाले आहेत, त्यात ' प ' काराचा ' ह ' कार होणे हा एक महत्त्वाचा परिणाम आहे. ' प ' काराचा ' ह ' कार होण्यामुळेच पालु–हालु, पुलि–हुलि, पिठ्ठ–हिट्टु, पर्व–हब्बसारखे शब्द नव्यानें कानडींत अस्तित्वात आले. या नियमानुसारच पट्टि–हट्टि, पाडि–हाडि हे शब्द तयार झाले आहेत असेच सर्व जुन्या व नव्या कन्नड पंडिताचे मत आहे.

यावरून ( १ ) पट्टि, पाडि पाडा . ( २ ) वाडि, वाडा ..( ३ ) हट्टि, हाट, हाडि, हे भिन्न भिन्न शब्द नसून ती उच्चार भेदामुळे रूढीत आलेली एकाच शब्दाचीं विविध रूपे आहेत असे म्हणावे लागते.

' पट्टि पाडि ' ची व्युत्पत्ति निश्चित ठरल्याशिवाय पुढील विचाराला चांगली बळकटी येणें शक्य नाहीं. याकरिता या किचकट चर्चेत शिरल्याविना गत्यंतर नव्हतें. ' पट्टि-पाडि ' या वर्गातील पाडि, वाडि, हट्टि वगैरे शब्द प्राचीन कानडी, तमिळादि वर्गातील सर्व भाषातून आढळणाऱ्या ' पडु ' धातूपासून निघाले असे ठरलें तर बरीच गुंतागुत आपोआप उकलणार आहे.

विद्वानाना मराठी भाषेंतील ' पाडि ' शब्दाच्या अर्थाचा थाग लागल्याचें अजून दिसत नाही. महाराष्ट्र-शब्द-कोशात या शब्दाचा ' पहाडा ' शी संबंध जोडला आहे ! अलीकडील प्रा. कुलकर्ण्यांच्या व्युत्पत्तिकोशातहि हाच प्रकार दिसतो. ' पाडि ' शब्द, महानुभाव भास्करकवीनें व श्री ज्ञानेश्वरांनीं उपयोजिला

आहे. ‘ कैवल्याची पाडि ’ हा महानुभाव भास्करकवीचा प्रयोग आहे. ‘ सद्वासनेचिया पाडि आला ’ असे ज्ञानेश्वर लिहितात. ( ७'१२६ ) पहिल्या उदाहरणात ‘ कैवल्य ’ म्हणजे ( कैलास ) ‘ पर्वत ’ असा भ्रम उत्पन्न झाला असावा. पण दुसऱ्या अवतरणात तशा शंकेला बिलकुल जागा नाहीं. शिवाय ‘ रट्टपाडि ’ वगैरेमध्ये पाडि शब्दाचीं, केवळ प्रदेश किंवा स्थान या अर्थाचीं बरीच उदाहरणें यापूर्वी दिलींच आहेत. यावरून ‘ पाडी ’ चा संबंध पहाडाशीं नेऊन भिडविण्याची आवश्यकताच राहात नाहीं. खेडीं-पाडिं या जोड शब्दातील पाडीचा अर्थ सागणारा खेड शब्द जवळच असल्याने याचा अर्थ जाणण्यास पर्वतप्रदक्षिणेची जरूरी राहात नाहीं.

याचप्रमाणें ‘पाडी’ शब्दाच्या सिद्धिक्रमाविषयी गैरसमज आहेत. संस्कृतातील ‘ पद्र [ क ] ’ शब्दापासून पाडा शब्द निष्पन्न झाला असावा असा समज आहे. पण ‘ पद्र ’ शब्दाचे बूडच आधी संस्कृतात स्थिर नाही ! ‘ पद्र a village ’ असा अर्थ देऊन, मोनियर विलियम्सनें त्यापुढे ‘ L ’ खूण घातली आहे. ‘ L ’ या संकेताचा अर्थ त्याने दिला आहे तो असा:—“ L —Lexicographers, ( i e ) a word or meaning which although given in native lexicons, has not yet been met with in any published text ” बेन्फेच्या ( मॅक्समुल्लरनी संपादिलेल्या ) कोशात हा शब्द घेतलेला नाही. संस्कृतातील आधार म्हणून गणलेल्या मूळ ‘ पद्र ’ शब्दालाच जर या भार्षेत स्थान नसेल तर पुढें ‘ पाडा ’ चा काय पाड ? संस्कृत साहित्यात ज्या शब्दाला जागा नाही त्याला संस्कृत म्हणण्यापेक्षा ‘ देशी ’ शब्द म्हणणेंच जास्त समंजस होणार नाही काय ? यास्तव ‘ पाडा ( पाडि ) ’ हा संस्कृतोत्पन्न शब्द नव्हे तर पट्टि–पाडि, वाडि–हट्टि या वर्गातीलच एक आहे असें वाटतें.

पट्टि–पाडि ‘ पडु ’ धातूपासून निष्पन्न झाले आहेत. ‘ पडु ’ या धातूला पुढील अर्थ किट्टेल देतो:—‘ to lie down, to repose ’ तमीळ कोशात ( Tamil Lexicon ) ‘ to spread out, as bedding, to lay horizontally, to lie down, to sleep ’ असे बरेच अर्थ दिले आहेत. तेलगु, मल्याळम् मध्येहि हेच अर्थ आहेत. किट्टेलने ‘ पडु ’ ( नाम ) a place ( hollow or hole ) of refuge ( for wild animals ) between stones or rocks ” असा अर्थ दिला आहे. ‘ पडु ’ धातूच्या ‘ निजणें ’ वगैरे

अर्थानुसंधानांत 'पहुडणें' या मराठी धातूचें औचित्य चागलेंच लक्षात येण्याजोगे आहे. पहुडण्याची (वसतीची) जी जागा ती पट्टि किंवा पाडि, असा या शब्दाचा मुळातील अर्थ आहे. पाळीमुळी या मराठी जोड शब्दातील पाळी शब्द पाडीचेंच रूप होय. आणि याचा अर्थ (मूळ) वसतिस्थान हाच आहे.

पुढे लक्षणेनें या शब्दाना बरेच अर्थ प्राप्त झाले आहेत. कालानुक्रम-दर्शक शब्दकोश तयार होताच शब्दाच्या अर्थामध्यें झालेल्या फरकाच्या मागें दडलेला बराच महत्त्वाचा इतिहास प्रकाशात येणार आहे. शब्दाचे लक्षणेने प्रतीत होणारे नवनवीन अर्थ निष्कारण कधीच आलेले नसतात. कालपरिस्थितीच्या ओघात शब्दाना अर्थ संभवतो सामाजिक पार्श्वभूमींतील विविध घटनाची रंगीबेरंगी छटा तत्कालीन बोलीतील शब्दाच्या अर्थामध्ये सामावलेली आपणास दिसून येते.

या दृष्टीने पाहाता पट्टि, पाडि, पाडा...वाडि, वाडा . हट्टि, हाट या शब्दांमध्ये व्यक्त होणारे निरनिराळे अर्थ देतेवेळी, कोशकारानी, एकादा विशिष्ट क्रम पाळण्याची तसदी घेतलेली दिसत नाही. कालानुक्रमाचा विचार तर राहोच, मूळ अर्थ आधी, नंतर लक्षणेनें येणारे दुसरे अर्थ असा क्रमसुद्धा अनुसरलेला क्वचितच आढळतो. पट्टि, पाडि, पाडा ..वाडि, वाडा...हट्टि, हाट याचे प्रत्येकीं एकापेक्षा अधिक अर्थ आहेत. त्यात आधीचा कोणता व मागून आलेला कोणता याचा निर्णय कालानुक्रमयुक्त कोश तयार होईपर्यंत निश्चयात्मक रीतीनें होणें जरा कठिण आहे. तरीपण समाजशास्त्र आपणास या बाबतीत काही थोडें साहाय्य करूं शकते. त्याच्या आधारें—पट्टि, पाडि, पाडा...वाडि, वाडा... हट्टि, हाट' याच्या निरनिराळ्या अर्थाचा बराच उलगडा होऊं शकतो.

'पट्टि' शब्दाला किट्टेलनीं पुढील अर्थ दिले आहेत: 'A place of lying down, a pen or fold, an abode, a hamlet.' जुन्या कन्नड कोशांत या शब्दास 'आभीरपल्लि, घोष' असे अर्थ दिले आहेत. तमीळ कोशात 'Cowstall, Sheepfold, a measure of land sufficient for a sheepfold, cattle pound, a hamlet, a village, a place असे अर्थ आहेत. 'हट्टि' ला गोस्थानक, गुरेंढोरें बाधण्याची जागा, असा

अर्थ नाचिराजीय नांवाच्या अमरकोशावरील एका जुन्या कानडी टीकेंत दिल्याचें किट्टेलनें नमूद केलें आहे. 'हट्टि' याचे झोंपडी, गोठा आणि लहान खेडें, असे अर्थ आजच्या कानडींत अजूनहि रुढ आहेत. वसुद्वादशीपासून आरंभ होणाऱ्या सणाला हट्टि हब्ब (गुरामेंढ्यांचा सण) असें नाव आहे. त्यावेळीं गाईबैलाची व मेंढ्याची पूजा केली जात असते. गौळवाड्याचा म्हणजे 'हट्टी' चा हा सण; यामुळेंच 'हट्टिहब्ब' असे नाव प्राप्त झालें आहे. वऱ्हाडातील हटगार धनगरातहि हा सण मोठ्या उत्साहानें साजरा केला जात असून त्यांत बैलाच्या पूजेला महत्त्व दिलें जातें. (Russels Castes & Tribes in Berar IV p 205) यावरून पट्टि आणि हट्टि याच्या अर्थामधील साम्य चागलेच व्यक्त होतें.

पहुडण्याची जागा ती पाडि, पाडा किंवा पट्टि (हट्टि), वसतिस्थान, राहाण्याची जागा असा मुख्य धात्वर्थ आहे. या मूळ अर्थाबरोबर गौळवाडा, धनगराचे बिऱ्हाड हा दुसरा अर्थ का व कसा आला असावा?

## पशुपालन वृत्तीपासून कृषीवल वृत्तीपर्यंत

मानव विकास-क्रमाच्या सामान्यपणे चार अवस्था सागितल्या जातातः- (१) आहारसंचयार्थ भटकणाऱ्या पारध्याची. (२) पाळीव जनावराची माहिती झाल्यानंतर उदयास आलेल्या धनगराची (३) वृक्ष वनस्पतीची ओळख झाल्यावर, त्याची लागवड करण्यास आरंभ करणाऱ्या शेतकऱ्यांची कुटुंबीयाची (४) शेतीपुढील क्रमप्राप्त व्यापारोद्योग व राजकारणी धंदेवाइकाची. या चार अवस्थापैकीं दुसऱ्या अवस्थेतील जीवनाची सूचना 'पट्टि-हट्टि' मध्यें तर आहेच; शिवाय 'पाडा, पाडी' मध्येंहि तोच अर्थ ध्वनित होत आहे. 'पाडम्' ला तमीळमध्ये Street, Street of herdsmen, 'इडैयर्चेरी' (गवळ्याची आळी) असे अर्थ व पाडीला Town, City, Hamlet, Quarters, Pastoral Village, District, असे अर्थ आहेत. कानडी रट्टपाडि, गंगवाडि वगैरे शब्दात 'पाडि'चा देश असा अर्थ व्यक्त होतो. खेडे या अर्थी 'पाडि' आणि 'हाडि' म्हैसूरमध्यें व दक्षिण कन्नड जिल्ह्यांत आढळतात. तरी पण महाराष्ट्रात 'पाडा' शब्दांत, वरील 'पट्टि' (हट्टि)चा अर्थ संपूर्णतया दिसून येतो. 'पाडा' म्हणजे शेतीच्या कामाच्या सोयीसाठीं

शेतकऱ्यानीं आपल्या गावापासून किंचित् दूर व शेतीपासून जवळ बाधलेल्या झोपड्याची वाडी, लहान खेडे' असा अर्थ 'महाराष्ट्र शब्दकोशात' दिला आहे. जुन्या साप्रदायिक माहितीनें भरलेल्या व त्यामुळे उपयुक्त आधारग्रंथाचें महत्त्व पावलेल्या 'गावगाडा' या ग्रंथात श्री. त्र्यं. ना. अत्रे यांनीं 'पाडा'चें विवरण दिले आहे तें असें : शेतात एकदोन घरें असतील तर त्याना झाप, अवसा, कोठा-गोठा किंवा पडाळ म्हणतात. आणि ती दहा पाच किंवा अधिक घरें असून त्याचें छोटेखानी गावठाणच बनलें असेल तर त्याला वाडा, वाडि, मजरे, पाडा असें नाव प्राप्त होते.

वरील दोन्ही उताऱ्यावरून पाडा, वाडा व वाडि हे समानार्थी शब्द आहेत याविषयी शंका राहात नाही. पाडा छोटा असल्यास त्याला पाडळ अशी संज्ञा आहे, असे श्री. अत्रे लिहितात.

एकूण, पट्टि ( हट्टि ), पाडा यात पशुपालन वृत्तीपासून शेतकरी–जीवन-क्रमापर्यंतच्या स्थितीची अर्थसूचना आहे असे सिद्ध होते.

वाट, वाटि (का) शब्दाला संस्कृतात आढळणारा अर्थहि याला सपूर्ण पोषकच आहे. A site of a house, an enclosure, a park, an orchard वाट शब्दाच्या अशा या अर्थाबरोबर हरिवंशातील ३३९७) 'गोवाट' चा प्रयोग पाहिला तर 'वाट' ला पट्टि–पाडिचा संपूर्ण अर्थ असल्याचे मान्य करावें लागतें.

खिस्तपूर्व पहिल्या शतकात रचलेल्या उत्तराध्ययन सूत्रात 'वाड' शब्द आला आहे. या प्राकृत ग्रंथातील 'वाड' शब्दाला गोठा असा अर्थ असल्याचें दिसून येतें. ९–१० व्या शतकातील देवेंद्रादि टीकाकारानीं तोच अर्थ सागितला आहे. "वाडेहि पञ्जरेहि सन्निरुद्धा" विवाहप्रसंगी अरिष्टनेमीला 'वाड' व 'पंजर' यामध्ये कोंडून ठेवलेलीं जनावरें पाहून उपरति झाली व तो प्रव्रज्येस प्रवृत्त झाला, असा तो प्रसंग आहे. मराठीतील 'कोडवाडा' यातील वाडा शब्दाचें रहस्य येथें चागलेच ध्यानात येईल.

'पट्टि-हट्टि'मधील अर्थाचे मर्म विसरून गेल्यानें मराठींतील 'हट्टिकार–धनगर' किंवा हटगार-धनगर' यांतील पदद्वयांची व्युत्पत्ति अजून कोणाच्या लक्षांत आल्याचें दिसत नाहीं. 'हटगार' याला हट्टी 'Obstinate' असा

अर्थ काहींनी लावण्याचा प्रयत्न केला आहे. 'धनगर' म्हणजे धेनुकर असा तर्क लढविलेला पहावयास मिळतो! विल्सनचा हा तर्क पुढें कोणास मान्य झाला नाहीं. पण धन-कर याची दुसरी व्युत्पत्ति लागल्याचेंहि दिसत नाही. हा वैचारिक गोंधळ प्रा. कुळकर्ण्यांच्या व्युत्पत्तिकोशात नमूद आहे. 'हट्टि-हब्ब' हट्टीचा सण म्हणजे 'गाई-मेंढ्याचा सण' हे मागें सागितलें आहे. खानदेशच्या गॅझेटियरमधील पुढील उतारा पहा : Kanadas (gavalis) are a peculiar race of drovers .they have a peculiar breed of black and white cattle, HATKAR which, though not large, are much prized for their strength and spirit (p 106) येथें 'हटकार'चा गाईबैल असा अर्थ स्पष्ट आहे. कानडीतील नाचिराजीय, मंगराजनिघंटु वगैरे जुन्या कोशातून हट्टिकार म्हणजे गवळी असा अर्थ दिलेला आहे. 'हट्टिकार-धनगर' किंवा 'हटकार-धनगर' हे पद, एकाच अर्थाचे दोन शब्द मिळून झालेलें आहे. ताबडा–लाल, कागद-पत्र, ईड–लिंबू, खेळ–आडु अशा तऱ्हेची ही जोडी आहे. याना Translation Compounds असे डॉ. सुनीतिकुमार चतर्जींनी नाव दिलें आहे. 'हट्टिकार' म्हणजेच धनगर. 'धन' ला येथे गो-धन असा अर्थ आहे. कानडीत 'दन' म्हणजे गुरेंढोरें (यात केवळ गाई बैल याचाच समावेश होतो, म्हशीचा नाही). 'दन' हा शब्द 'धन' शब्दाचा तद्भव आहे, असे बाराव्या शतकाच्या पूर्वीपासून कानडीत मानण्यात आलेलें आहे. यामुळें (गो)धन पाळणारा तो धनगर अर्थात् 'हट्टिकार' तोच 'दनगार'. 'दनगार' (म्हणजे गुरे पाळणारा) हा शब्द आजहि कानडी बोलीत रूढ आहे.

पशुपालनवृत्तीच्या पुढील पायरी शेतीवाडीची. शेतीवाडी हा जोडशब्द विचारार्ह आहे. यात शेती शब्दापासून होणारा अर्थबोध थोडा निराळा आहे. पावसाच्या पाण्याने पीक घेणारे ते शेतकरी असें समजलें जातें. वाडी म्हणजे मळा, विहिरीच्या किंवा नदीच्या पाण्यानें पोसून भाजीपाला वाढविला जातो, ती बाग. कृषीच्या विकासक्रमात आधी वाडी, नंतर शेती. स्त्रियाकडून बागायतीला आरंभ झाला असें संशोधकाचें मत आहे. पशुपालनावस्थेंतील पुरुषाना गुरे चारण्याकरितां सदैव भटकावें लागणें साहजिक आहे. पट्टींत (गौळवाड्यांत) राहणाऱ्या स्त्रिया आपल्या फावल्या वेळीं, आपल्या निरीक्षणानें

अनुभवानें उपयुक्त ठरलेल्या वेली, वनस्पति परसांत लावून वाढवूं लागल्या. हा उद्योग किफायतशीर ठरून उपजीविकेचें साधन बनूं लागल्यावर पुरुष मंडळी या कामाकडे विशेष लक्ष देऊं लागली. अशाप्रकारें गुराढोराच्या वाडीनें—गौळवाडा—पुढें बागेचें रूप धारण केले. शेतीवाडी, वतनवाडी यातील 'वाडी' शब्दाला 'गौळवाडा' असा अर्थ नसून 'बाग' असा निराळा अर्थ प्राप्त झालेला आहे.

कानडींतील 'तोट–पट्टि' या जोडशब्दातील 'पट्टि' ला मळा हाच अर्थ आहे. 'पट्टि' या प्राचीन शब्दाचा अर्थ स्पष्ट करण्यासाठी 'तोट' या त्याच अर्थाच्या आधुनिक शब्दाची जोड द्यावी लागली. तामीळ भाषेंत 'पडप्पे' म्हणजे वाडी, बाग हा अर्थ आहे. संस्कृतात 'वाट' 'वाटी' ला बाग असा अर्थ असल्याचे सर्वश्रुत आहेच.

वरील सर्व गोष्टीवरून 'पट्टि–हट्टि' मध्यें गोपालनवृत्तीपासून कृषीवल वृत्तीपर्यंतच्या अवस्थेचा अर्थ प्रतीत होतो हें निःसंशय आहे.

संस्कृतात व मराठीत 'हाट' किंवा 'हट्ट' याला बाजार असा जो अर्थ आहे तो शेतकीच्या पुढील पायरीचा. पट्टि-पाट-पाटक-पेठ यातील अर्थपरिवर्तनहि लक्षात घेण्याजोगें आहे.

संस्कृतमध्ये 'गोप' शब्दाच्या अर्थविकासाची रीत पाहिली तर मराठींतील (गौळ-)वाड्याला विस्तीर्ण (राज)वाडा, वैभवशाली भव्य हवेली असा अर्थ कसा प्राप्त झाला असेल याची चागली कल्पना येणार आहे. हें हटगाराच्या वाढत्या वैभवाचें निदर्शक आहे. पट्टि, पाडि, पाडा, वाडा याना विस्तीर्ण प्रदेश, देश, राज्य असे अर्थ आले. (लहानशा) 'पट्टि' चें 'पट्टण' होऊन राजधानी असा अर्थ प्राप्त झाला. कालगतींत हट्टि, पाडि याना ओसाड गांव असा अर्थहि आला असल्यास नवल नाही.

या हजारो वर्षांच्या कालावधीत 'पट्टि,' 'हट्टि' ची विविधरूपें लोकव्यवहारांत रूढ होणें अत्यंत साहजिक आहे. दक्षिणापथातील (नर्मदा ते कावेरी) गावाच्या नांवाची यादी पाहिली तर 'पट्टि-हट्टि' या वर्गातील नाना रूपें स्वल्प उच्चार-भेदानें पहावयास मिळतील. पाडेगाव, पाटगाव, पारगावसारख्या कांहीं ठिकाणीं हीं रूपें ग्रामनामाच्या पूर्व भागांत आढळलीं तरी तीं बहुतेक

उत्तर भागातच दृष्टीस पडतात. उच्चारानुरोधानें झालेल्या फरकाप्रमाणे गटवारी करून त्याचा आराखडा येथें देत आहे.

## ‘ पट्टि—हट्टि’चे विविध पर्याय

**पाडु** — पाडि, **पट्टि**, पट्टण — पाटण — पाटणा,
**पट्ट** — पाट — पाटक; पट्टार, . पेट, पेठा,
**पाडु** — पाडा — पारा......
**पारा** — हारा, हार — हर, . आर .,
**पाडु** ..आडु, **पाडि**...आडि,
**पाडु** — बाडु — बाड ..
**बाडु** — बाळु — बाळ
**बाळु** — वाळु— वाळ — वळ... वल
**पाडा** — वाडा — वाड, वड वाडे, वडिंग .
**पट्टि** — पाटि ..
**पाटि** — वाटि, वाटिका
**पट्टि** — **पाट**
**पाट** — वाट, वाटक... वाढार (पाठार); वठार, वठाण...
**पट्टि** — पाटि — प्याटि, . पेटे, पेठ, पेठा, . पाटार, पाटक,
**पट्टि** — हट्टि, **पट्ट** — हट्ट, **पाट** — हाट,
**पाटक** — हाटक; **पाडि** — हाडि; .
**पाडु** — पाळु - हाळु - हाळ,...आळ, आल . आण
**पाळि**—पळ्ळि — हळ्ळि
**पट्टि** — पाडि — पाळि — पळ्ळि — हळ्ळि ..
**पळ्ळि** — वळ्ळि ..वळि...वलि . ओलि . ळि,
**पाडि** — पाळि — हाळि — हाळ,
**पाळि** — पाळ्य, पल्य

‘ पट्टि-हट्टि ’चा हा विविध पसारा लक्षात आल्यास बऱ्याच गोष्टींवर नवीन प्रकाश पडणार आहे. ‘ हटगार-धनगर ’ हे उदाहरण वर आलेच **आहे.** शिवाय या प्रकारचें आणखी एक उदाहरण म्हणजे ‘ अग्रहार ’ हें **होय.**

'अग्रहार' शब्दाची व्युत्पत्ति अजून निश्चित झालेली नाहीं. खालील अवतरणावरून ही गोष्ट पटेल :

(१) '**अग्रं** ब्राह्मणभोजनं, तदर्थं **ह्रियन्ते** राजधनात् पृथक् क्रियन्ते ते क्षेत्रादयः।' (२) **अग्रं** प्रथमं **ह्रियते** उत्पन्नशस्यान् उद्धृत्य स्थाप्यते।' (३) **अग्रं हरति**।' (४) क्षेत्रोत्पन्नशस्यात् उद्धृत्य ब्राह्मणोद्देशेन स्थाप्य धान्यादि गुरुकुलादावृत्तब्रह्मचारिणे देयं क्षेत्रादि ग्रामेभ्यश्च।'

वरील उताऱ्यावरून 'अग्र' आणि 'हार' या दोन्हीहि शब्दाच्या अर्थाविषयी एकमत दिसत नाही. तरी पण 'अग्र' हा ब्राह्मणवाचक शब्द आहे असें कबूल करूनहि 'हार' शब्दाला संस्कृत भाषेत ग्रामवाचक सरळ अर्थ होऊं शकत नाही. यामुळेच वरील पंडितानीं 'हार' याला 'ह्रियते' 'ह्रियन्ते' किंवा 'हरति' असा अर्थ केलेला दिसतो.

## उत्तर भारतांत आर्येतर 'पत्ति'

'हार', 'हारा' हा शब्द जुन्या ताम्रपटातून वगैरे आढळतो. बळ्ळारी जिल्ह्यात मिळालेल्या लेखात 'सातवाहनी हरा' हें पद आलें आहे. तेथे 'हरा म्हणजे abode, home' असा अर्थ डॉ. सुखटणकरासारख्या तज्ज्ञानीं केला आहे (Epigraphica Indica XIV p 155). हा शब्द प्रेहार, शिलाहारादि ठिकाणीहि दिसतो (Mysore Arch Rept 1929). हार, हरा किंवा हर हे निराळे शब्द नसून वाड, वाडा, वड सारखी एकाचीच निरनिराळीं रूपें होत.

'हारा' किंवा 'हार' याचें प्राचीन रूप 'पारा' किंवा 'पार' असले पाहिजे. 'पाडा' 'वाडा' चींच ही निराळीं रूपे आहेत. 'पारगाव' यात 'पार' शब्द आपल्याकडे आढळतो. उत्तर भागांत आसाम, बंगाल, बिहारकडे, तेलपारा, उत्तरपारा वगैरे ग्रामनामातून शेवटीं हा शब्द दिसतो.

येथे असा एक प्रश्न उद्भवतो की जर पट्टि, पाडि, हट्टि, हे शब्द 'देश्य' असून द्रविडवर्गीय म्हणविणाऱ्या संस्कृतेतर भाषेतील असतील तर ही उत्तर भारतातील, 'आर्यावर्ता' तील ग्रामनामें आर्येतर भाषेंतील कशीं ?

वाल्डे आणि पोकर्नी याच्या आर्यभाषावर्गीय जर्मन शब्दकोशांत पट्टि-हट्टि हट्ट शब्दाचा सुगावा लागत नसल्याचें डॉ. दांडेकराकडून कळलें. 'पट्टि-हट्टि'

हा वर दर्शविल्याप्रमाणें संस्कृतेतर भाषेचाच असे निश्चित झाल्यास आजपर्यंत न सुटलेल्या एका महत्त्वाच्या समस्येचा परिहार होणार आहे.

द्रविड शब्द वेदकालाइतका प्राचीन नाही, नंतरचा आहे. ‘द्रविड’ लोक आर्यांच्याहि पूर्वी होते हें जर खरें असेल, तर वेदकाळीं हे लोक कोणत्या नांवानें ओळखले जात असावेत ?

माझ्या मतें याना त्यावेळी ‘पत्ति’ असे एक नाव असावें. वराहमिहिर ‘पत्ति’ जनाचा उल्लेख करतो हे पत्ति कोण असतील ? मध्यकाळातील हट्टिकाराच्या पूर्वजाचे नाव ‘पट्टि’ किंवा ‘पत्ति’ असणे संभवनीय नाही काय ? यजुर्वेदीय रुद्राध्यायात अनेक आर्येतर (अनाय म्हणजे रानटी नव्हे !) जनाचा उल्लेख असल्याबद्दल दुमत नाही, त्यातच पत्तीचेंहि नाव येतेः—
नम उच्चैर्घोषायाऽऽक्रंदयते **पत्तीनां** पतये नुमः ॥

हे पत्ति कोण असतील बरे ? ‘पट्टि’मध्ये वास करणारे ते पट्टि (पत्ति). पट्टण–पत्तन असा टवर्गाचा संस्कृत भाषेत तवर्गात बदल होतो. पट्टि आणि पत्ति यात संबंध असल्याचें सिद्ध झाले तर, यापुढें द्रविड या संदिग्ध व अनुचितार्थी शब्दापेक्षा ‘पत्ति-जन’ हा प्रतिशब्द रूढ करणें समंजस ठरेल. तमिळानाच ‘द्रविड’ अशी संज्ञा असल्यामुळें त्या शब्दात त्या वर्गातील सर्वांचा समावेश होऊं शकत नाही. शिवाय ‘पत्ति’ या पदप्रयोगानें कन्नड, तमिळ, आंध्र वगैरे या सर्व जनाची पूर्वपरंपरा वेदकालापर्यंत भिडलेली स्पष्टपणें लक्षात येईल.

‘पट्ट इल्ल’–पट्टिल असे प्रयोग प्राकृत ‘सुपासनाहचरिय’ वगैरे ग्रंथात आढळतात. (पाइअ-सद्द-महाण्णवो’ कोश पहा) इल्ल–इल या तद्धित प्रत्ययाचा अर्थ ‘त्यात असणारा’ असा आहे. पट्टिल म्हणजे पट्टीत राहणारा असा अर्थ होतो. हे पट्टिल हट्टिकाराचे संबंधी असणे असंभवनीय नाहीं. पट्टिल शब्दाचे पुढील रूपच पाटिल किंवा पाटील. ‘पाटील’ हा ब्राह्मण नव्हे. कुणबी धनगराना ‘अहो पाटील’ असें संबोधण्याची प्रथा आहे. पाटील याचा अर्थ ग्रामाधिकारी असा मुळात नाहीं; पुढें तसा लक्षणेने रूढ झाला असला पाहिजे. नाहीं तर संबंध एक जातच ‘पटेल’ म्हणजे ग्रामाधिकारी असणें शक्य नाही. ज्याचा पाटिलकीशीं संबंध नाही अशा जाती आहेत, पाटील घराणीहि पण आहेत. उत्तर

कन्नड व गुजरात गॅझेटियरात ‘Patti’ व ‘Patelia’ (पट्टि व पटेलिया) अशा लोकजाति असल्याचें नमूद आहे. आणि पटेलिया हा शेतकरी वर्ग आहे असेहि तेथे सागितलें आहे.

कर्णाटात पाटील आणि गौड हे दोनहि शब्द समानार्थी वापरले जातात. गौड म्हणजेच पाटील. गौड शब्दाचा संबंध गौळ–गोवळ–गोपाळ याशी जाऊन पोचतो. यावरूनहि पट्टिल–पाटिल हा हट्टिकार (गौळ) संबंधीं असल्याचें आणखी एका रीतीनेंहि सिद्ध होतें.

हटगार-धनगर, पटेलिया व पट्टि या लोक जातीवरून ‘पत्ति’ हे आर्येतर जन असावे असा तर्क करण्यास काही बाध येत नाही असें वाटतें. ते पत्ति रुद्रशिवाचे उपासक, तसे आजचे ‘हटगार धनगर’ वगैरे लोकहि शिवभक्त आहेत. (विष्णु-कृष्णाची उपासना ही शैव परंपरेनतरची आहे.) यजुर्वेदातील ‘पत्ति’ हे जर आर्येतर असतील तर आर्येतर भाषेंतील पाडा, पाटक, पारा, ऊरा, हट्टि, पट्टण वगैरे ग्रामवाचक शब्द उत्तर भारतात (आर्यावर्तात) कसे शिरले हे कोडें आपोआप सुटतें.

छादोग्यात, टोळधाडीमुळें कुरुदेशात दुर्भिक्ष झाल्याचा उल्लेख आहे. “मटचिहतेषु कुरुषु”...कुरुदेशावर मटचीची धाड आली त्यामुळें तेथील पिकाची नासाडी झाली (१–१०–१) या वर्णनातील मटची हा काय प्राणी आहे, आणि तो शब्द कोणत्या भाषेंतील असावा याबद्दल संशोधक विद्वानानी बरेच परिश्रम करून शेवटी जवळ जवळ सर्वानुमते असे ठरविलेले दिसतें की ‘मटची’ म्हणजे टोळ; आणि तो शब्द द्रविड गणलेल्या भाषेंतला आहे. कानडीत टोळ या अर्थी ‘मिडिचे’ असा शब्द रूढ आहे. आणि संस्कृतातील ‘मटची’ ‘मिडिचे’ला फार जवळ आहे हें स्पष्ट दिसतें.

डॉ. बागची यानीं मटची हा शब्द इराणी भाषेंतला असावा असें (Indian Historical Quarterly 1933 p 254) सुचविलें आहे. पण कानडी तमीळ (कंदमिळ्) या भाषावर्गांत उडणें या अर्थाचा ‘मिडि’ धातु आहे. त्यावरून मिडचे शब्द सिद्ध झालेला आहे. आणि सस्कृतात या वर्गाचा मटचीसारखा हा एकच शब्द वेदात असता तर गोष्ट निराळी होती; पण चंद्र, अरणी, मर्कट वगैरे अनेक शब्द असेच शिरलेले आपण पाहतों.

डॉ. सुनीतिकुमार चतर्जी, रे. किट्टेल वगैरेनीं अशा प्रकारच्या शब्दाची एक यादीच तयार केली आहे. असें असता 'मटची' करितां इराणी भाषेचा आधार घेण्याची जरूरी दिसत नाही.

एके काळीं पत्तीची वस्ती उत्तर भारतांत सर्वत्र होती, असें संशोधकानीं सिद्ध केलें आहे. सिंध–बलुचिस्थानमध्ये अजून जिवंत असलेली ब्राहुई भाषा 'द्रविड' वर्गीय असें ठरलें आहे. सिंधु नदाच्या काठानें आर्यांच्या पूर्वी एके काळी द्रविडवर्गीय जनाच्या वसाहती होत्या असे रे. शर्ट याचें मत आहे. Traces of Dravidian element in Sindhi या लेखांत त्यानीं शेवटीं असा निष्कर्ष काढला आहे :—I believe they ( all these things ) point to the fact that the Indus Valley was a home to some part of the Dravidian race, before the Aryan immigration ( Ind Ant VII p 293 ).

गंगायमुनातीरी जेथे प्राकृत व्रजभाषा प्रथम निर्माण झाली तेथें त्यावेळीं द्रविडवर्गीयाची वस्ती असली पाहिजे, असे डॉ. रामकृष्णपंत भाडारकर याना कबूल करावे लागलें आहे ( Wilson Philological Lectures 1867 p 46, 47, 81, 87, 108 ). बंगाल वगैरे उत्तर प्रदेशात द्रविड वस्ती होती असें डॉ. सुनीतिकुमार चतर्जीचे तर ठाम मत आहे. आर्यीकरणामुळें आज हा वर्ग संपूर्ण अदृश्य झाला असला तरी, गावांची नांवे, भाषेंतील लकबी, चालीरीतींतील काहीं प्रकार वगैरे गोष्टीवरून याबद्दल शंकेला बिलकुल जागा नाहीं, असें डॉ. चतर्जींचें मत आहे. The Languages which were replaced by Magadhi Apabhransha in Bengal were Dravidian, Kol and Monkhmer, Tibeto-Barman There are, again, some unmistakably Dravidian affinities in Bengali phonetics, Morphology, Syntax and vocabulary, but these agreements with Dravidian languages are not confined to Bengali alone, but are found in other North–Indo– Aryan Languages also. ( Bengali Language · Its origin & Development p. 284 ). †

---

† अधिक संदर्भ : 'Kolerian & Dravidian Place names' J. R. A. S. 1903 Part III.

मध्ययुगांत नर्मदेच्या दक्षिणेला पट्टि किंवा पत्तिजन दृढमूल झाले. आजहि वऱ्हाडकडे हट्टिकार कांहीं कमी नाहींत. Hatkar — Dhangars seem to have been of considerable importance in Berar असें एंथोवेन लिहितो. पट्टि ( हट्टि ) किंवा पाडि जनांच्या वसाहतीच्या प्रदेशाला पट्टि, हट्टि किंवा पाडि असें नाव प्राप्त होणें साहजिकच आहे. महाराष्ट्र असे संस्कृत नांव धारण करणाऱ्या प्रदेशाचें देशीय मूळनाव '**मऱ्हाट**' असें आहे. मऱ्हाट किंवा मरहट्ट या नावांतील ' हट्ट ' हें पद विचारणीय आहे. यावरून या प्रदेशाला ' हट्ट ' देश असें नाव होतें असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. नाशिकच्या त्र्यंबकेश्वराला ' हाटकेश्वर ' असें नाव असलेलें दिसून येतें; ' द्रष्टुं त्रैलोक्यभर्तारं त्र्यम्बकं हाटकेश्वरम् ' हाटकेश्वर असा ' वाचस्पत्य कोशा ' त आधार मिळतो. बसवपुराणात श्रीशैलेश्वराला ' हाटकेश्वर ' असें संबोधलें आहे. हाटकेश्वर हें नांव शिवाला का आलें असेल ? हाट(क) देशाचा जो ईश्वर, तो हाटकेश्वर असा याचा सरळ अर्थ होण्याजोगा आहे. हट्टि किंवा हाटक जनाचा ईश्वर असाहि याचा अर्थ होऊं शकेल. श्री रामदासानीं केलेल्या एका आरतीत हाटक करणाटकाचें नाव येतें. " जय देवी जय देवी जय वेदमाते...हाटक करणाटक करुणाकल्लोळी " असा तो उल्लेख आहे. यातील हाटक हा महाराष्ट्र देशाला असलेला प्रतिशब्दच होय. शिव हाटकेश्वर तर पार्वती हाटकेश्वरी झाली. या हाटकेश्वरीची श्री रामदासानीं करुणा भाकली आहे. ' हे देवी तुझ्या देशातील ( हाटक–कर्णाटातील ) जनाचे रक्षण कर ' असा वर उद्‌धृत केलेल्या ओळीचा अर्थ आहे. तें काहीहि असो; यावरून नाशिक ते श्रीशैलापर्यंतचा प्रदेश तो हाटक देश असें म्हणावयास काही हरकत दिसत नाहीं.

नर्मदा ते कावेरीपर्यंत राष्ट्रकूटांचें राज्य होतें. राष्ट्रकूटाच्या राज्याला ' रट्ट पाडि ' अशी संज्ञा होती. या पाडि–हाडि–( हाटक ) देशातच हाटकेश्वराच्या त्र्यंबक व श्रीशैल क्षेत्रांचा समावेश होतो. यजुर्वेदातील ' पत्तीनां पति ' तोच मध्ययुगांत हट्टीचा हाटकेश्वर झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## हाटक देश किंवा सुवर्णभूमि

या हाटक देशाला सुवर्णभूमि असेंहि म्हणणें सार्थ आहे. सोन्याला हाटक असा एक पर्यायशब्द संस्कृत भाषेंत आहे. हट्ट किंवा हाटांतील जें, तें ' हाटक.'

हाट देशांत निर्माण होणारी विशेष वस्तु, म्हणून सोन्याला ' हाटक ' नांव पडलें असावें असें मला वाटतें; निजाम-कर्णाटकातील हट्टि नामक गांवांत जुनी सोन्याची खाण आहे. भरतखंडांतील अतिशय खोल खाण हीच असें सर मार्शल यांनीं मोहेंजोदारोवरील विख्यात ग्रंथात आपलें मत व्यक्त केलें आहे. कोडगु ( कर्णाटक ) प्रातात हरिंगी ( हिरण्यागी ) नावाची एक नदी आहे. या नदीला काही ठिकाणी हट्टिहोळे 'सुवर्णावती' असेंहि म्हटलें जातें. पोन्नगुंद ( हुन्नगुंद ) वगैरे सुवर्णवाचक नावाचीं गावे या हट्टि देशांत थोडीं नाहींत. श्री-पुर, शिरोळ, शिरूर वगैरे श्री-वाचक गावे तर सर्वत्र विखुरलेली आहेत. हिंदुस्तानात ज्या सोन्याच्या खाणी सापडल्या आहेत त्या या हाटक देशांतच आहेत.

खिस्ताब्दाच्या प्रारंभापूर्वीपासून सातवाहन, कदंब, गंग, चालुक्य, राष्ट्रकूट वगैरे प्रतापशाली प्रख्यात राजवटीत हट्ट देशानें अखिलभारतीय जनाचें चित्त आकर्षित केलें. हट्ट देश जसा काही भारताचें केंद्रच बनला! वर उल्लेखिलेल्या वैभवशाली राजघराण्याच्या कारकीर्दीत या केंद्राकडे संपत्तीचा पूर वहात असला पाहिजे हें उघड आहे. यामुळेंहि हाट देशाचें ' सुवर्णभूमि ' हें नाव सार्थ झाले असलें पाहिजे.

पण बाराव्या शतकानंतर सेऊण व होयसळ यादवाच्या यादवींत हाट देशाचे दोन तुकडे झाले. मऱ्हाट व कन्नड असा हा प्रदेश दुभंगला गेला. पुढें या दुफळीमुळें हट्ट देशाच्या वैभवाला ओहोटी लागली. सातवाहन, चालुक्य, राष्ट्रकूटाच्या वेळचे तें वैभव स्वप्नवत् झालें. पुन्हा तसली ती ऊर्जित स्थिति कधीच आली नाहीं. आज या जुन्या पट्टी-हट्टीची स्मृति पार नष्ट झाल्यासारखी वाटते. तरीपण पट्टि-पाडि-हट्टि या प्रकारच्या ग्रामनामांतून ती स्मृति अंधुक रीतीनें थोडीफार तरी शिल्लक राहिली आहे हेंच आपलें भाग्य समजलें पाहिजे.



## : ३ :

# हे 'मरहट्टे' कोण ?

अर्थ किंवा भाव अव्यक्त आहे. अव्यक्त अर्थाच्या अभिव्यक्तीसाठीं व्यवहारांत निरनिराळे संकेत उपयोजिले जातात. चित्र, आकृति, र्ति वगैरेंप्रमाणें शब्द ( ध्वनि ) हाहि एक अशाच प्रकारचा संकेत आहे. चेत्ररूपाचा संकेत, मूर्ति वगैरे निरनिराळ्या स्वरूपात आपणास पाहावयास मेळतो. हरप्पा, मोहेंजोदारो येथें मिळणाऱ्या विटावरील चित्रें हा एक लिपीचा कार आहे असें कळते. पण चित्र किंवा आकारामागील अर्थ, परंपरा-च्छेदामुळें नष्ट झाल्यास, त्या संकेतापासून काहीच अर्थबोध होत नाहीं. ामुळें मोहेंजोदारोतील त्या चित्रमय लिपीचा अर्थ काय हें तज्ज्ञाना मोठें ोडेंच होऊन बसलें आहे ! लक्ष्मी, सरस्वती, शिव, अनंत ( शेषशायी ) वगैरे र्तींच्या मागील अभिप्रेत अर्थ आज जवळ जवळ विसरला गेल्यासारखा झाला ाहे. अशा ठिकाणीं मनुष्याला आपल्या अज्ञानाची जाणीव होण्यास उशीर ागत नाही.

पण आपल्या भाषेंतील शब्दसंकेताचें तसे होत नाही. आपल्या बोलींतील ब्द कानीं पडल्यानंतर त्यापासून आपणांस काहीं अर्थबोध झाल्यासारखा ाटतो खरा; आणि झालेला अर्थबोध संपूर्णपणें खोटा असतो असेंहि नाहीं. ारण विशिष्ट कालीं त्याला विशिष्ट अर्थ असतो. पण त्या विशिष्ट पदसमुच्चयाला

सर्वकाळीं, सर्वस्थळीं तोच अर्थ होता किंवा असतो असें मानणें फार धोक्याचें आहे. शब्दाचा अर्थ युगमानाप्रमाणें वेळोवेळीं बदलत असतो ही गोष्ट पुष्कळाच्या ध्यानांत न आल्यानें अनेकदां विचारांत गोंधळ उत्पन्न होतो.

उदाहरणार्थ प्रस्तुत ' मराठा ' हा शब्दच पहा. आज महाराष्ट्रांत स्थिर झालेला प्रत्येक मनुष्य ' मराठा ' समजला जातो; आणि तसे मानणें युक्तहि आहे. मात्र प्राचीन काळीहि असाच अर्थ होता अशी समजूत भ्रामक ठरेल. महाराष्ट्रांतील प्रत्येक नागरिक आपण ' मराठा ' आहोंत असें आज मोठ्या अभिमानानें सागण्यास प्रवृत्त होत असला तरी पन्नास पाऊणशे वर्षापूर्वी अशी स्थिति नव्हती हे पुष्कळाना माहीत नसेल. मराठा या शब्दानें ध्वनित होणारा त्यावेळचा अर्थ आजच्याहून निराळा होता. मराठ्यात त्याकाळीं ब्राह्मणाचा समावेश होत नव्हता. ब्राह्मण बहुधा स्वतःस महाराष्ट्रीय म्हणवीत. कारण मराठा ही एक विशिष्ट जात होती व आहे. §

## मरहट्टे आणि महाराष्ट्रिक

आजच्या मराठ्याच्या पूर्वजाचा उल्लेख प्राकृत ग्रंथातून ' मरहट्टे ' अशा रीतीनें केलेला आढळतो, आणि संस्कृत ग्रंथातून यानाच ' महाराष्ट्रिक ' अशारीतीनें संबोधलेलें दिसून येते. मध्यंतरी महाराष्ट्रीयामध्यें ब्राह्मणाचा समावेश होत असला तरी प्राचीन काळी ' महाराष्ट्रिक ' हा शब्दहि मराठे किंवा मरहट्टे याना उद्देशूनच वापरलेला दिसतो, दहाव्या शतकांतील राजशेखर कवि आपण महाराष्ट्रीय कुलवधूशी विवाह केल्याचे सागतो. ती महाराष्ट्रीय सुंदरी चाहुआण ( चव्हाण ) कुलातील होती असे खुद्द राजशेखराने सागितलें आहे:—

" चाहुआनकुलमौलिमालिका राजशेखरकवीन्द्रगेहिनी " ( कर्पूरमंजरी )

---

§ एकोणिसाव्या शतकाच्या शेवटपर्यंत ( विसाव्या शतकाच्या उदयापर्यंत ) म्हणजे दक्षिणेंत राष्ट्रीय भावना जागृत होईपर्यंत महाराष्ट्रीय ब्राह्मणाला ' मराठा ' असें म्हटले असता त्याला आपला अपमान झाला असें वाटे व चटदिशी रागानें तो प्रत्युत्तर करी, " छे ! छे ! मी मराठा नव्हे, दक्षिणी ब्राह्मण आहे." जदुनाथ सरकार यांचें शिवाजी चरित्र, अनुवाद : श्री. वि. स. वाकसकर पृष्ठ २८५ ( Shivaji & his times—Sir Jadunath Sarkar, 1919, p. 484. )

यावरून आज मराठे किंवा महाराष्ट्रीय या शब्दांत जो व्यापक अर्थ आला आहे तो पूर्वीच्या "हृढलघुश्यामाङ्गान् सहमानान् अभिमानान्... कलहशीलाश्च।" अशा रीतीनें अपभ्रंश काव्यत्रयीत वर्णिलेल्या प्राचीन 'मरहट्ट' किंवा 'महाराष्ट्रिक' या शब्दात नाहीं हें निराळें सागावयास नको.

## मरहट्टे यांची पूर्वपरंपरा

'महाराष्ट्र' या शब्दापासून विशिष्ट जन हा अर्थबोध होत नाहीं, कारण हा प्रदेशवाचक शब्द आहे. म्हणूनच या लोकांचे प्राचीन जनवाचक नांव 'महाराष्ट्रिक' नसावें. या बाबतचें विवेचन यापूर्वी पहिल्या प्रकरणात आलें आहे. 'महाराष्ट्र' या शब्दसमुच्चयाला कारणीभूत झालेला निराळाच एक शब्द असावा आणि तो 'मरहट्ट, किंवा 'मऱ्हाट' हाच होय हेहि यापूर्वी स्पष्ट केलेंच आहे. आता 'मरहट्टे' याची पूर्वपरंपरा काय असावी याचा छडा लावणे जरूर आहे.

'मरहट्ट' यांत 'हट्ट' म्हणजे प्रदेश किंवा मंडळ असा अर्थ निश्चित आहे. 'झाडमंडळ' यांतील मंडळ म्हणजे 'हट्ट' आणि 'झाड' म्हणजे 'मर' असा हा अनुवाद आहे. वऱ्हाड प्रांतांत झाडे या नावानें ओळखल्या जाणाऱ्या बऱ्याच जाती आहेत. (R V. Russell and Hiralal Tribes & Castes of Central Provinces Vol I. pp. 361, 249 to 255, and Tribes and Castes of Nizam Dominions, Vol. I page 165.) 'झाडि' किंवा 'झाडे' या शब्दाचा अर्थ रसेल आणि हिरालाल यानीं पुढीलप्रमाणें दिला आहे.

"A name often applied to the oldest residents of a Caste in any locality of the Central provinces"

यावरून "झाडे" म्हणजे **मूळचे रहिवासी** असा अर्थ स्पष्ट होतो. मरहट्टे,'मर' (झाडे) हे लोक येथील (म्हणजे वरहाटातील) मूळचे रहिवासी असा याचा अर्थ आहे. श्री समर्थ रामदास याच्या देवीच्या एका आरतींत 'हाटक' असें महाराष्ट्रालाच उद्देशून उल्लेखिलेलें आढळतें. 'हट्टि' देशातील या जनास 'हट्टे' या नांवानेहि संबोधण्यास हरकत नाहीं. 'हट्टे' हे नांव काहींना काल्पनिक वाटेल. पण सुदैवानें 'हटगार' जन अजून या प्रदेशात

प्रामुख्यानें असलेले आपणांस दिसून येते. आज ' हटगार ' हा शब्द किंचित् मागें पडत असला तरी या भागांतील देशमुख, पाटील वगैरे घराणीं ' हटगार ' वंशीयच आहेत हें या भागातील जनजातीचें यथातथ्य वर्णन करणाऱ्या ग्रंथावरून कळून येतें. ( Berar Gazetteer p. 202-222 Mr. Sherring's Vol. III p 105, Tribes and Castes of Nizam's Dominion. Vol. I See Hatgar and Dhangar, Enthoven Vol I. p. 312 etc. ) अशा रीतीनें आजहि हटगार या नावानें ओळखली जाणारीं घराणीं आपणांस पुष्कळ आढळतात. हटगार यातील उद्योग किंवा वृत्तिवाचक ' कार ' ' गार ' हा तद्धित प्रत्यय वगळला असता ' हट ' ( हट्ट ) शब्द राहतो. हट्ट म्हणजे गौळवाडा; हट्टे म्हणजे गवळी, धनगर, धनवडे. हीं नावे ' हटगार ' या शब्दाचेच पर्याय होत.

कर्णाटातहि हट्टिकार जन आहेत. या भागात हट्टिकार–दन(धन)गार जनाला आणखी एक पर्यायशब्द रूढ आहे; याना ' हालुमतदवरु ' म्हणण्याची प्रथा आहे. हालु म्हणजे दूध. हालुची वृत्ती करणारे म्हणजे धनगर-गवळी असाच याचा अर्थ होतो. यावरून या हालुमताच्या हटगार–धनगराच्या जीविकेच्या पूर्वपरंपरेची कल्पना येण्यास हरकत नाही.

## ' हट्टे ' यांचे पूर्वज

' मरहट्ट ' हा शब्द कानडी आहे हें मागे दाखविले आहेच. प्राचीन कानडींत ' ह 'कार वर्ज्य असून संस्कृतभाषीयांच्या संपर्कामुळें त्याच्यांत ' ह 'काराचा उच्चार नवीनच रूढ झाला. यामुळें प्राचीन काळांत मागे जावें तसें ' हट्टि ' या शब्दात ' ह 'काराच्या ऐवजीं ' प 'कार असणे स्वाभाविक आहे. यजुर्वेदातर्गत रुद्राध्यायांत आलेल्या ' पत्ति 'जनाचा संबध या ' हट्टि ' जनाशींच असावा असें खालीं उद्धृत केलेल्या प्रमाणावरून दिसून येईल.

महाभारत व भागवतांतील वर्णनावरून यादवजन गोपालनवृत्तीचे होते हें सर्वमान्य आहे. " यादवं गोमहिषादिके धने " कोशातील या विवरणावरून या जनाचें हें नाव कसें सार्थ आहे याचा बोध होतो. यादवजनांना अंधक–वृष्णिकुल असें दुसरेहि एक नांव आहे असें पुराणें व पाली ग्रंथावरून दिसून येतें. 'अंधस्' शब्दाला निरुक्तांत रस, अन्न असा अर्थ सागितला आहे.

अन्नासारखा रस म्हणजे दूध असाच अर्थ येथे अभिप्रेत असावा. प्राचीन संस्कृतांतील हा शब्द परभाषेंतून आलेला आहे असें दिसतें. याप्रमाणेंच रसार्थक हालु शब्दहि कानडी ( व पूर्वद्राविड पालु ) दुग्धवाचक आहे. अंध, अंधक असे उल्लेखिले जाणारे अंधकवृष्णिजन यादववंशीय धनगर होत. तमिळ प्राचीन ग्रंथातून अंडर् जनाचा उल्लेख येतो. डॉ. एस्. कृष्णस्वामी अय्यंगार यांच्या मतें अंडर् व अंधक हे एकच आहेत, ( The Satwats Proceedings of the II Oriental Conference, 1922 ). आणि यानाच आध्र म्हणत असावेत असेंहि त्यानीं सुचविले आहे. कर्णाटातील धनगरात अंडे ( कुरुब ) अशी पोट जात आहे. गवळ्याना इडैयर् असें तमिळ भाषेंतील नांव आहे. इडा-इळा-इरा ( रस-दूध ) याचा धंदा करणारे ते इडैयर्. पुन्हा तमिळ 'इडैयर्' आणि कानडी 'हालुमतदवरु' हीं दोन्ही हटगार धनगर याचीच पर्याय-नामे झालीं. अंडर् व अंडे या नावाची जात तमिळ व कर्णाट या दोन्हीं प्राती असून आध्र या नावावरून याचें मुख्य माहेरघर तेलगु देश होता असे दिसून येते. अंडर, अंडे हे हटगार धनगर असल्याने आध्र हि मूळ याच वृत्तीचे होते असें म्हणणें प्राप्त आहे. अंधकवृष्णींची पूर्वपरंपरा अशाप्रकारें गोपालनवृत्तीशीं जाऊन भिडते. वृष्णि शब्दाला बकरा असा एक अर्थ असून त्याच्या पूर्वजाच्या धनगर वृत्तीचे तें सूचक असण्याचा संभव आहे.

आजच्या मराठ्यातील पुष्कळ कुळाचा संबंध यादव वंशाशीं जाऊन पोचतो. 'जाधव' हे यादव शब्दाचे एक रूप आहे. मराठे धनगरात हंडेवजीर अशी एक पोटजात आढळते. मराठ्यात 'भोजे' हि आहेत. भोजकवंश यादवाचीच एक शाखा होय. कालप्रवाहात पुष्कळ बाहेरच्या जाति यादवात व मराठ्यात येऊन एकजीव झाल्या असल्या तरी, त्याचा मूळ पिंड असलेला अतिप्राचीन गट, हा आर्य पूर्वकालीन पत्तिजनापैकीं हटगार-धनगराची एक शाखा असावीसें वाटते.

डॉ. प्रिलस्की ( Dr Jean Przyluski ) यानी Name of the God Vishnu & Krishna Legend या आपल्या लेखात अंधकवृष्णि यादव वंश हा आर्येतर ( द्रविडवर्गीय ) होता असें संस्कृत, पाली भाषेतील पुराणे व नाना जातककथा वगैरेच्या आधारानें सिद्ध केलें आहे. त्या लेखाचे शेवटी

" Diverse indications point to the Dravidian substrata having made itself felt in Mathura for a long time " ( Mythic Society Journal, Silver Jubilee Number page 48 ) असा निर्वाळा ते देतात. विष्णु–कृष्ण परंपरेविषयीं निराळ्या दिशेनें संशोधन करीत असता गंगायमुनातीरी ( मथुरा ) वसाहत करून राहिलेली यादव घराणीं आर्येतर वर्गीय ( द्राविडवंशीय ) होती या निर्णयाला ते येऊन ठेपले. प्रा. प्रिलस्की याचा हा निर्णय पत्तिजनासंबंधीच्या पूर्वी सांगितलेल्या मतास पोषकच आहे. यामुळेंहि पत्ति ( हट्टि ) या आर्येतरवर्गीय शब्दानें निर्दिष्ट होणारे लोक आणि प्रा. प्रिलस्की याच्या संशोधनाप्रमाणे आर्येतर म्हणून ठरलेले अंधकवृष्णीय यादवकुल हे दोन्ही गोपालक एकच होत असें म्हणावयास प्रत्यवाय दिसत नाहीं.

यजुर्वेदात ( रुद्राध्यायात ) पत्तीचें नाव येते. यजुर्वेदातील हे ‘ पत्ति ’ ऋग्वेदात कोणत्या नावाने निर्दिष्ट झाले असतील ? ऋग्वेदात यदूचें नाव सुमारे चौदा वेळा येतें. ऋग्वेदातील यदुजन आणि महाभारतातील यादवजन हे एकच होत असें पुष्कळाचें मत आहे महाभारतातील यादव हे आर्येतर पत्तिजन असतील तर ऋग्वेदातील यदुजनहि अर्थात् आर्येतर असणारच; आणि ऋग्वेदातील यदु हे आर्येतर ( द्रविडवर्गीय ) असावेत असें काहीं विद्वानाचे मतहि आहे. " नि तुर्वशं नि याद्वं शिशीय्यति भिग्वाम शं स्यं करिष्यत् ॥ " ( ७,१९,८ )...हे इंद्रा तूं यादव आणि तुर्वश याना अंकित कर " अशी प्रार्थना केलेली या मंत्रात दिसते. शिवाय ‘ दासा...यदुः तुर्वः ( १०-६२-१० ). या उल्लेखात तसेंच नवव्या मडलात ( ६२-२ ) यदुतुर्वश हे आर्यशत्रु शंबरासुराच्या पक्षात आढळतात. यावरून यदु ( तुर्वश ) वंश हा मुळात आर्येतर असावा हा तर्क बलवत्तर ठरतो. यदूंच्या बरोबर ऋग्वेदात तुर्वशाचेहि नाव येतें.

यदु तुर्वशाच्या बरोबर आणखी तीन नावे काही ठिकाणी प्रामुख्याने येतात. अनु, द्रुह्यु व पूरु ही तीन नावें मिळून याना ‘ पंचजन ’ म्हणण्याची प्रथा आहे. महाभारतातील उल्लेखाप्रमाणें ही सर्व एकाच घराण्याची मंडळी ( भावंडें ) असावीत असे दिसते. ययातीचे हे पाच पुत्र असे महाभारतांत वर्णन आहे. या सर्वात पूरु हा वडील होय.

‘ मरहट्टा ’पासून मागे जाता जाता ‘ हट्टिकार ’ पत्तिजनापर्यंत आपण

येऊन पोंचतों. मराठ्यांतील भोज व जाधव–यादव या कुळींची परंपरा महाभारतकालीन यादवापर्यंत भिडते. वऱ्हाड, मरहट्टाचें मूळ स्थान; हें भोज कुळाचें माहेरघर; यावरूनहि मरहट्टे व यादव वंशाचा घनिष्ट संबंध असलेला दिसून येतो. मरहट्टे-हट्टि-पत्ति हे जर आर्येतर द्रविडवर्गीय जन असतील तर त्याचे पूर्वज यादव हेहि आर्येतरच असले पाहिजेत असें म्हणणें क्रमप्राप्त आहे. ऋग्वेदातील वर नमूद केलेले काहीं उल्लेख वरील तर्कास पोषक आहेत. प्रिलस्कीनी स्वतंत्र दिशेनें केलेलें संशोधनहि अंधकवृष्णि यादव आर्येतर द्रविड वर्गीय असावेत हाच निर्णय देत आहे.

यदु-यादव हे जर आर्येतर द्रविडवर्गीय असतील तर त्याचे बाकीचे तीन बंधुजनहि द्राविड शाखेचेच असणें संभवनीय आहे. वेदातील यदु, तुर्वश, हीं नावें कोणा एका व्यक्तीची नसून ती जनवाचक विशिष्ट नावें आहेत. पुढें महाभारतांत या वेदकालीन प्राचीन परपरा कथारूपानें लिहिते-वेळीं त्याना व्यक्तिरूप दिले आहे. वेदातील हीं नावें काही विशेषार्थसूचक आहेत. महाभारतातील धर्म, भीम, धृतराष्ट्र वगैरे नावें शीलगुणदर्शक असून व्यक्तींच्या विशिष्ट प्रकाराची ( Types ) निदर्शक आहेत. तीं पाळण्यांत ठेवलेली नावें नव्हेत. यदु हें नाव गोपालक या अर्थाचें आहे. तुर्वश यालाहि असाच अर्थ असल्याचें दिसून येतें.

याच रीतीनें पूरु शब्दहि बराच उद्बोधक वाटतो. पूरु हा या पंचजनात सर्वांत वडील असें महाभारतावरून कळतें पूरु शब्दात नगर या अर्थाच्या ‘ ऊरु ’ या द्रविडवर्गीय शब्दाचा पडसाद ऐकूं येतो. पूर किंवा पुर हे नाव देवाच्या विरोधी असुराच्या संबंधातच विशेषेंकरून आढळतें. त्रिपुरासुराची प्राचीन कथा सुप्रसिद्ध आहे. पुरंदर किंवा पुरघ्न असें इंद्राला असलेलें नाव वरील तर्कास पुष्टिच देत आहे. इंद्रविरोधी पूरु हे पुढे यदु–तुर्वशाप्रमाणें इंद्राच्या गोटात गेले असल्यास आश्चर्य नाहीं. शेंकडों तुकडे करून लाडग्याना चारलेल्या यतींच्यापैकीं काहींनीं इंद्राची करुणा भाकून त्याला प्रसन्न करून घेतलें व ते पुढें इंद्रभक्त झाले हें अशाच प्रकाराचें आणखी दुसरें उदाहरण होय.

पूरु हे मोठमोठी शहरे वसवून नागरिकतेच्या उच्चश्रेणींत असलेले जन असावेत. ९९ पुराचा इंद्राने नाश केल्याचीं वर्णनें आहेत. सुदास राजाशीं

झुंजत असलेल्या पूरु वगैरेंचा इंद्रानें नाश केला असें दाशराज्ञ कथेवरून कळतें. हरप्पा, मोहेंजोदारोसारखी मोठमोठीं शहरें वसवून वैभवानें येथें वसाहत केलेल्या वेदपूर्व कालातील जनतेच्या समस्येचा काहीसा अर्थ येथे होण्यासारखा आहे.

सभोवार कोट–किल्ले बाधून मोठ्या शहरातून राहाणारे जन या अर्थानें ऋग्वेदकालीन ऋषींनी याना ' पूरु ' असे नाव दिलेलें असणे शक्य आहे. आर्यपूर्वकालीन हरप्पा, मोहेंजोदारोसारखी प्राचीन विशाल शहरे पाहिली तर " पूरु " या नावाचे औचित्य लक्षात आल्याविना राहाणार नाहीं. पूरूचे दुसरे भाई अजून पशुपालन स्थितीतच होते हे त्याच्या नावावरूनच व्यक्त होत आहे.

भारतांत आलेल्या आर्याना शहरे तर राहोत, चागलीं घरेसुद्धा अजून माहीत नव्हती असे वेदातील वर्णनावरून काही संशोधकानी तर्किले आहे. (' The Aryans were a people who had never known a city Their way of life is clearly presented in the Rigveda, and is far from being that of the complicated urban organisation ' (Pre-historic India, Stuart Piggot, Penguin Books p. 263) यावरून पूरु हे वेदपूर्वकालीन मोठ्या शहरी–संस्कृतीचे प्रतिनिधि असावेत असा तर्क करणे अनुचित होणार नाहीं. आणि पूरु जर आर्यपूर्व जन, तर त्याचे दुसरे सवंगडी यदु–तुर्वश हे सुद्धा आर्येतर खचितच होत. हरप्पा नावाचा उच्चार हडप्पा असा पंजाबीत आहे. हरप्पा–हडप्पाचें पडुधातुसाधित पाडा–पारा या ग्रामनामाशी बरेंच साम्य पण आहे. हे ग्रामनाम किती प्राचीन आहे हे मात्र निश्चित नाही. या भागातील चिनाब नदीचे प्राचीन नाव चंद्रभागा असे आहे. यातील चंद्र शब्द आर्येतरवर्गीय पत्तिजनाच्या भाषेतील आहे. हडप्पा–हरप्पाजवळ मिळालेल्या चित्रापैकी वृषभाचीं चित्रे लक्षणीय आहेत. ही संस्कृति पत्तिजनसंबंधी पूरूंचीच असणे असंभवनीय नाही.

' द्रुह्योः सुता वै भोजाः ' यावरून द्रुह्यु हे यादवापैकींच होत असें दिसतें. भोजराजे ययाति वंशातील होते असे श्रीकृष्ण सभापर्वात म्हणतो. अनूंच्याबद्दल विशेष माहिती मिळत नाहीं. पण ते बाकीच्यात सामील झाले असें महाभारतात सागितलें आहे. तुर्वशहि असेच यादवात विलीन होऊन गेल्याचे उल्लेख आहेत. मुख्य शाखा पूरु; तीसुद्धां जाऊन पुढें यादव नावातच सर्वांचा समावेश होऊं

लागला. श्रीकृष्णासारख्या तेजस्वी महापुरुषाच्या जन्मामुळें यादव कुळाचें महत्त्व वाढून बाकीचीं त्यातच सामील झाली असावींत.

मुळात जरी हा यदुवंश ( पत्तिजन, गोपालक ) आर्येतर असला तरी पुढे आर्यांचा संपर्क वाढत गेला तसा या दोघामधील विरोध कमी होत गेला हे पुढील काळातील अनेक घटनाच्या कथावरून कळून येते. ऋग्वेदपूर्व काळींच यदुवंशीय पत्तिजनाचें आर्यीकरण होण्यास आरंभ झाला असावा असें म्हणण्यास पुष्कळ जागा आहे. याला 'चंद्रमस्' सारखे भाषिक पुरावेहि मिळतात. वेदकालीन 'पत्ति' या शब्दाचे, 'हट्टि' ( हटगार ) असे हकारयुक्त नवे रूपातर पुढे आलें हें आर्याच्या गाढ सपर्काचें द्योतक आहे. 'मऱ्हाटे' हे आर्य-द्रविड-वंशीय आहेत असें श्री. जाधवराव आदि आधुनिक विचारवंत जे म्हणतात त्याचे प्रत्यंतर वरील परंपरेमध्यें आपणास पाहावयास मिळेल. गंगा-यमुनातीरी शौरसेनी प्राकृत निर्माण होण्यास जो यादववंश कारण झाला तो मुळात आर्यवंशीय नव्हता असेच म्हणावे लागतें. कारण प्राकृतातील ऱ्हस्व 'ए' 'ओ' कारादि स्वर आणि 'ळ' कारादि व्यंजनें संस्कृत भाषेला परकीय असून त्याचा भरणा प्राकृतामध्ये तर विशेष दिसतो. प्राकृतातील या वैलक्षण्याला कारण बाहेरचे परकीय द्रविड लोक असे म्हणण्याची प्रथा आहे. पण प्राकृत भाषा ज्याच्यामुळें निर्माण झाली ते शौरसेनी यादव लोक म्हणजेच मुळात आर्यीकृत झालेले पत्तिजन ( हटगार-गोपाळ ) हेच या उच्चारभेदाला कारणीभूत असावेत असे म्हणणें जास्त सयुक्तिक होणार आहे. या योगें शौरसेनी प्राकृताचा माहाराष्ट्रीशी असलेला आत्मीय संबंध सुस्पष्ट होतो. आणि वररुचीच्या व्याकरणात शेवटी आलेल्या 'शेषं माहाराष्ट्रीवत्' या सूत्राची संगति लागते.

महाभारतातील अनेक कथाच्या आधारानें पण ही गोष्ट जास्त स्पष्ट होते. ऋग्वेदकालीच यदु इंद्रभक्त झालेले काहीं ऋचावरून दिसून येईल. महाभारतांत कृष्ण हा ऋषिमुनीचा त्राता व याविरुद्ध त्याचे मामे कंस जरासंधादि राक्षसी वृत्तीचे होते अशी वर्णनें येतात. जुन्या काहीं चालीरीतीचे प्रकार यदुजनात अजून राहिलेले पुराणकथेंतून डोकावतातच. मामाभाच्यातील वैराचें कारण काय असावें हा एक विचारार्ह प्रश्न आहे. मुलाच्या मुलाऐवजी मुलीच्या मुलाला जेथें वारसाहक्क येतो त्या समाजात मामा भाच्यामधील विरोध पितृप्रधान

कुटुंबपद्धतीत दिसून येणाऱ्या भावाभावामधील विरोधाइतकाच तीव्र आणि तीक्ष्ण असतो. कंसानें (मामानें) जन्मापूर्वीपासूनच कृष्णाचा (भाच्याचा) द्वेष करावा या विलक्षण प्रकाराचे रहस्य पितृप्रधान कुटुंबपद्धतींतील आपणास कळणें शक्य नाहीं. पुढें भगिनीसुत अभिमन्यूच्या अकाली निधनास श्रीकृष्णच पर्यायाने कारण झाला अशी एक कथा स्त्री (लोक-) गीतातून ऐकावयास मिळते. यादवातील ही रूढि त्याच्यातील अतिप्राचीन आर्यीकरण होण्यापूर्वीच्या मातृप्रधान कुटुंबपद्धतीचा एक अवशेष तर नसेल ना ?

या तर्काला पोषक असा एक पुरावा पुराणातरीं आढळतो. ययाति राजाच्या भोगविलासाच्या विविध कथा आहेत. त्यापैकी पद्मपुराणातील भूमिखंडात येणारी एक कथा येथे विचारार्ह आहे. ययातीनें पूरूस आपली जरा देऊन तारुण्य संपादिलें आणि अश्रुबिंदुमति नामक सुदरीशी विवाह केला. अश्रुबिंदुमतीनें ययातीस संपूर्णतया आपल्या आधीन ठेवण्याचा प्रयत्न केला आणि त्यात तिला यश मिळाले. ययाति अश्रुबिंदुमतीशीच तीन्ही त्रिकाल रममाण होतो ही गोष्ट शर्मिष्ठा आणि देवयानी याना कशी खपणार ? सवतीपुढें त्याना हार खावी लागली आणि साहजिकच त्याना फार खद वाटला. शर्मिष्ठा आणि देवयानी यानीं ययातीस त्याने आपला संबंध सोडूं नये म्हणून खूप विनवून पाहिलें पण त्याचा काहींच उपयोग झाला नाही. आपल्या विनवण्या ययातीने झिडकारल्या हे पाहून शर्मिष्ठा-देवयानी चिडल्या आणि त्यानीं "तुझ्या वंशातील पुरुष मातुलकन्यापरिणय करतील व मातृद्रव्याचे वाटेकरी होतील" असा ययातीस शाप दिला ( ६४. ८३, प्राचीन चरित्रकोश : ययाति पहा. ).

मराठ्यात मामाच्या मुलीशीं लग्न करण्याची चाल आजतागायत रूढ आहे. ही चाल द्रविडांच्या संपर्कानें मराठ्यात आली अशी समजूत आहे. पण महाभारतकालीं यादवात ही चाल होती हें सुभद्रा वगैरेंच्या वैवाहिक संबंधांवरून निश्चित दिसतें. येथें एक विचार येतो. आर्यांना काही रूढि विचित्र वाटावयाच्या पण त्या सहजासहजी मोडणें शक्य नव्हते. अशाप्रसंगीं सदर रूढींना शापरूप बनवून त्यांच्यापासून आपला पिंड सोडवून घेणे ही एक पळवाट त्यांना सुचलेली आहे. प्रचलित नको असलेल्या रूढीस शापाचें निमित्त देऊन त्यापासून सुटकाश्च तदनंतर समाधान ( Rationalization ) प्राप्त करून घेण्याचें प्रत्यंतर

पद्मपुराणातील वरील उल्लेखावरून येत आहे. द्रविडनामक दुसऱ्या कोणा एका बाहेरच्या जातीच्या संपर्कानें ही चाल यादवांत नव्यानें आली असली तर ब्राह्मणांप्रमाणें ती काहीं शाखात कांहीं भागांतच रूढ असावयास पाहिजे होती; पण मराठ्यांत ही रूढि सर्वांस आढळते. या कारणास्तव मुळातच यदु, तुर्वसु, जनांत मातुलकन्यापरिणयाची चाल–मातृप्रधानकुटुंबपद्धति–रूढ असावी असें म्हणणेंच क्रमप्राप्त ठरतें.

कांही मराठ्यात आतेच्या मुलीशी (मामाच्या मुलीप्रमाणें) विवाह करण्याची चाल आहे. पण मामाच्या मुलीशी लग्न करण्याची चालच अधिक रूढ असून दुसरी काही थोड्या कुळांत राहिली आहे. ही चाल द्रविडाच्या प्रभावामुळें मराठ्यांत रूढ झाली असा काहींचा तर्क आहे. पण हें योग्य वाटत नाही. द्रविडाच्या भाषेचे व चालीरीतीचे परिणाम आर्यांवर होण्याइतके द्रविड प्रभावी होते काय हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे.

आर्यांच्या प्रभावानें द्रविडाच्या चालीरीती पुष्कळ बदलल्या आहेत. द्रविडांचाहि आर्यांवर परिणाम झाला नाहीं असें नव्हे. जे परिणाम दिसतात ते द्रविड–प्रभावाचे द्योतक नसून अपरिहार्य रूढीचे निदर्शक आहेत. इंग्रजींत Bangle, Monkey, Saree वगैरे शब्द शिरले आहेत ते देशी भाषाच्या प्रभावामुळें नव्हे. प्रभावी भाषा ही तद्भाषिकाच्या सामाजिक, राजकीय किंवा धार्मिक श्रेष्ठतेची निदर्शक असते. अशा कोणत्याहि कारणामुळे इंग्रजीवर देशभाषा प्रभावी परिणाम करूं शकलेल्या नाहीत. केवळ लौकिक व्यवहाराच्या अनुकूलतेकरिता इंग्रजीनें काहीं शब्द उचलले आहेत. याच्या उलट देशभाषांवर मात्र इंग्रजीचा विविध प्रकारचा प्रभाव पडल्याचें दिसून येतें. देशभाषातील शब्दरचना, वाक्यपद्धति, साहित्याचे प्रकार वगैरे नानाविध फेरबदल इंग्रजीच्या वर्चस्वाची साक्ष देत आहेत. आर्यांत झालेले बदल हे कसून झालेल्या विरोधाअंतीं केवळ अपरिहार्य म्हणून झालेले आहेत. द्रविडवर्गीयांत आरंभी थोडा विरोध दिसला तरी पुढें ते स्वसंतोषानें आर्यतंत्र बनले व त्यातच अभिमान मानूं लागले. उलट आर्यांनीं द्रविडापासून घेतलेल्या गोष्टींवरहि, जणूं कांहीं त्या आपल्या पूर्वपरंपरेंतीलच आहेत असा वेष चढविला.

(रुद्र) शिव कोणत्या जनांचा देव याविषयीं आज वाद माजले आहेत.

' अग्निमीळे'तील 'ळ' काराचा उच्चार संस्कृतातीलच असा आग्रह धरणारे थोडे नाहीत. याच्या उलट कानडी ही संस्कृतोद्भव भाषा असा समज प्राचीन कानडी साहित्यात असल्याचें दिसून येतें.

मातुलकन्या विवाहाला निषिद्ध मानूनहि दक्षिणापथांत त्याला अपवाद मानणारें सूत्र पुढें आले; तरी पण ही चाल सर्व ब्राह्मणशाखानीं स्वीकारली नाही ती नाहीच. मराठ्यात मात्र ही चाल नसलेली एकहि कुळी नाहीं, इतकेंच नव्हे तर काही कुळात वेली परतणेची म्हणजे आते मामे बहिण भावंडात विवाह करण्याची चालहि तगून राहिली आहे. याची संगति कशी लावावयाची ? यादवांच्या पुरातन रूढीपैकी ही रूढि असावी व ती काही कडव्या लोकानीच आग्रहानें चालू ठेवली असावी असे मानणेंच जास्त तर्कशुद्ध आहे. मरहट्टीयाचे मूळ द्रविडवर्गीयत्व दर्शविणारी ही एक अवशिष्ट पुरातन रूढि आहे. काही कुळानी आर्यांच्या अनुकरणात पूर्व परंपरेस थोडी मुरड घालून श्रेष्ठ–कनिष्ठ-भावसूचक मातुलकन्या घेणेंची रूढि तेवढीच पुढे चालविली; पण जुन्यात बदल न खपणाऱ्या परंपराप्रिय थोड्या घराण्यानी ती चाल जशीच्या तशी तगवून धरली. प्रभावी वर्चस्वाच्या परिणामा-मुळें शिष्टाचार बनलेल्या चाली बहुसंख्याकात दिसतात व जुने संप्रदाय अगदी थोड्या नाफेरवाल्यात राहात असतात. डॉ. सौ. इरावतीबाई कर्व्यांप्रमाणें, ' हा द्रविडाचा प्रभाव ' असें जर मानलें तर वेली परतणेची चाल मराठ्यात सार्वत्रिक हवी होती ( 'मराठी लोकाची संस्कृति' पान १९७, १९८, १९९ ). मराठ्यातील ही चाल द्रविडापासून त्यानी उचलली ( पा. १९९ ) असें विधान त्यानीं केले असलें तरी नातेवाचक परिभाषेचा गाढ व्यासंग केलेल्या सौ. कर्व्यांचेच पुढील वाक्य पहाः—' मराठी प्रदेशात साधारणपणें मामाच्या मुलीशी लग्न करण्याचा प्रघात आहे, (पण) **नातेवाचक शब्द तर मामाच्या किंवा आत्याच्या मुलीशीं लग्न करण्यास उचित असे आहेत** (पा. १८७ ). भाषेंतील मूळ नातेवाचक अर्थच जर साटेलोटें हा आहे तर यावरून मराठ्यांत आरंभा-पासूनच ही चाल असली पाहिजे असेच ध्वनित होत नाहीं काय ? ही चाल आर्यांची नव्हे या विषयीं कोणाचा मतभेद नाहीं. यावरूनहि मराठे–यादवांचे पूर्वज आर्येतर पत्तिजन होत असेंच ठरत नाहीं काय ?

## पत्तिजनांचा वंशविस्तार

पत्तिजन मुळात आर्यवंशीय नसून पुढें क्रमानें त्यानीं वैदिक परंपरा स्वीकारली आणि त्याबरोबरच त्याच्या भाषा व चालीरीतींत फरक पडूं लागला. अशा रीतीनें मूळ पत्तिजनात दोन तट पडणें अपरिहार्य झाले. पूर्वसंप्रदाय-प्रिय असा एक वर्ग, तर जसे काही आपण संपूर्ण आर्यच आहोंत अशा अभि-निवेशानें सुधारणावादी बनलेला, प्रगतिशील अशा स्वरुपाचा दुसरा. या दोन्ही कमालीच्या भिन्न टोकास साधणारे मधले दुवे अगर गट क्रमानें पुढें येऊं लागले. महाभारत काळानंतरच्या सामाजिक व ऐतिहासिक घटनाप्रवाहांत असे बरेच पक्षोपपक्ष निर्माण झालेले आपणास पाहावयास मिळतात.

हा यदुवंश ( पत्तिजन ) वेळोवेळीं निरनिराळ्या नावानी कालपरिस्थिती-प्रमाणें डोकें वर काढण्याचा प्रयत्न करीत असताना आढळतो. मध्यप्राताचे राजे भोजवंशीय होते असा एक पुरावा पुराणातरीं मिळतो. भोजकुल यादववंशीय आहे असें परंपरा सागते. यादवसंबंधीय सात्यकी वगैरे शाखाच्या नावांनीं राष्ट्रकूटादि काही राजघराणीं कर्णाटमहाराष्ट्रात होऊन गेली. रिस्टिक भोजकाचा उल्लेख अशोकाच्या शिलालेखातून आढळतो.

आर्यीकरण पुढे जसें मोठ्या प्रमाणात होऊं लागले तसा दक्षिणापथात मरहट्टाचा वंशविस्तार त्याच्या प्रदेशाच्या विस्ताराबरोबरच झपाट्याने होत गेला.

## ब्राह्मण देशस्थ बनला

सुमारें दहाव्या शतकापर्यंत झालेल्या परिवर्तनास आर्यीकरण असें म्हणता येईल. पुढें सुमारें दहाव्या–बाराव्या शतकानंतरच्या दक्षिणापथातील या प्रकारच्या परिवर्तनास आर्यीकरण म्हणण्यापेक्षा महाराष्ट्रीकरण म्हणणेंच जास्त योग्य होणार आहे. मऱ्हाट्यांना कानडी आणि तमिळ लोक ‘आरियरु’ ‘आरेरु’ या नावानें ओळखतात. या आरियरु ( मऱ्हाटे ) याचा उल्लेख दुसऱ्या शतकाइतक्या प्राचीन तमिळ साहित्यात आला आहे. कानडी आणि तमिळ लोक मऱ्हाट्याना ‘आरियरु’ असें संबोधीत असले तरी मऱ्हाटे आपणांस ‘मरहट्टे’ किंवा मराठे या नावानें उल्लेखितात. श्रीसमर्थ रामदासाच्या “मराठा तितुका मेळवावा” या वाक्यांत “मराठा” शब्द बऱ्याच विस्तृत अर्थानें

पयोजिलेला दिसतो; इतक्या विस्तृत अर्थानें वापरलेला हाच पहिला प्रयोग ाय असें वाटतें. या प्रकारच्या अर्थविस्तृतीच्या मागें थोडासा इतिहास आहे.

ब्राह्मणवर्ग सुमारें सातव्या–आठव्या शतकापर्यंत तरी दक्षिणापथांत ोठेंच स्थायिक–' देशस्थ ' बनलेला नव्हता. या काळापर्यंत ब्राह्मणांचीं ाडनावें गांवावरून किंवा स्थळांवरून रूढ झालेली दिसत नाहींत असें ात डॉ. देवदत्त भांडारकरानीं नमूद केलें आहे. (Indian Antiquery 'ol IV p. 73-74 ) बऱ्याच काळापर्यंत वेदशाखेवरून ब्राह्मणांत निरनिराळे ट असलेले दिसून येतात. जुन्या ताम्रपटातून वगैरे मिळणाऱ्या उल्लेखांवरून ुमारे नवव्या–दहाव्या शतकापर्यंत ब्राह्मण पूर्णपणें ' देशस्थ ' बनलेले आपणांस ाढळत नाहीत. कल्याण चालुक्याच्या शिलालेख–ताम्रपटांतून " मलेयाळ " ंडित " काश्मीर " ब्राह्मण " द्राविड " ( तमिळ ) ब्राह्मण अशा तऱ्हेचे ल्लेख मिळतात. कल्याणचा राजा सहावा विक्रम याच्या दरबारीं असलेला बेल्हण हा ' काश्मीरी ' पंडित म्हणून ओळखला जात होता.

दहाव्या–बाराव्या शतकाच्या सुमारास ब्राह्मण पूर्णपणें ' देशस्थ ' बनूं ागले. गौड ब्राह्मण, कऱ्हाड ब्राह्मण वगैरे नावे या पुढील काळांतच आपल्यास मेळतात. ' होयसळ ' कर्नाटक किंवा कर्णाटकब्राह्मण हे होयसळ यादवाच्या ाळीं म्हणजे १३ व्या शतकानंतरच अस्तित्वात आले असावेत हे त्या नावातील होयसळ ' पदावरून स्पष्टच आहे. देवगिरी आणि हळेबीडु यादवाच्या ादवीत एकेका ब्राह्मण शाखेनें प्रांताभिमान स्वीकारून अभिनिवेशानें कर्णाटक ा महाराष्ट्रीय ( मराठा ) म्हणवून घेण्यास आरंभ केला असें म्हणण्यास पुष्कळ ागा आहे.

ब्राह्मण ' देशस्थ ' होईपर्यंत त्याला कोणत्याहि देशी भाषेचा विशेष अभिमान नव्हता. वैदिक परंपरा, गीर्वाणवाणी संस्कृत याचाच काय तो ुरस्कार ते करीत. तिच्याच सेवेंत ते यावज्जीव धन्यता मानीत असत. प्राण गेला ारी बेहत्तर पण प्राकृत भाषेचा उपयोग म्हणून करूं नये अशा तऱ्हेची कडवी ृत्ति एकेकाळीं ब्राह्मणवर्गांत होती. ' प्राकृतं म्लेच्छभाषितम् । न श्रोतव्यं द्विजेनैतद्......अधोनयति तत् द्विजम् '. गरुड पुराणांतील हें विधान ब्राह्मण ार्गाचा'मनोभाव प्राकृत वगैरे संस्कृतेतर भाषांविषयीं कशा प्रकारचा होता हें

यथार्थतेनें व्यक्त करतें. अशा रीतीने प्राकृत भाषाकडे ढुंकूनहि पाहाण्यास सिद्ध नसलेला ब्राह्मणवर्ग एकादा अपवाद वगळून पुढील काळात त्याच प्राकृत भाषेचा कैवारी, स्तुतिपाठक बनलेला पाहावयास मिळतो. केवळ गीर्वाण-वाणीच्या प्रेमानें तिच्याच सेवेंत मग्न होऊन राहिल्यास जगात जीवन अशक्य-प्राय होणार हें सभोवारच्या परिस्थितीवरून चाणाक्ष, दूरदर्शी विचारवंताना कळण्यास वेळ लागला नसावा. पण बहुसंख्य ब्राह्मणांची मनोवृत्ति पालटण्यास बराच काळ गेला. व्यवहारात प्राकृत व देशी भाषाचा वापर करण्यास काही स्मृति वगैरे शास्त्रानी परवानगी दिली. जैन, बौद्ध हे बहुजनसमाजाला त्याच्या भाषेंतून ज्ञान देऊन आपल्या पक्षात ओढूं लागले. अशावेळी ब्राह्मण वर्गाला लोकसमाजापासून फटकून दूर राहाणे भयावह वाटले असणे साहजिक आहे. अशा परिस्थितीत ब्राह्मणाना प्राकृताकडे वळल्याशिवाय गत्यतर नव्हतें.

प्राकृत भाषेचा पक्षपात स्वीकारल्यानंतर थोड्याच काळात आणखी एक गमतीचे दृश्य दिसते. भाषा ही कधीहि स्थिरस्वरूपाची नसते. प्रत्येक पिढींत ती थोडीफार बदलत जातेच; आणि दोनतीन पिढ्यानंतरचे काळात प्रचलित भाषेत कमालीची तफावत पडते आणि भाषेतला फरक सहजपणें उमगतो. जुनी पिढी या बदललेल्या भाषेकडे पाहून नाकें मुरडूं लागते. भाषा अवनतीस चालली आहे असे म्हणण्यापर्यंत त्याची मजल जाते. प्राकृताच्या पुढील अवस्थेला 'अपभ्रंश' असें जे नाव मिळालें आहे तें याच मनःस्थितीचे द्योतक आहे. 'अपभ्रंश' म्हणजे पतन पावलेली भाषा असा अर्थ आहे हे वेगळें सागावयास नकोच. संस्कृत प्रिय सुशिक्षित ब्राह्मणवर्ग या भाषेला तिरस्काराने नावें ठवीत होता याला निराळ्या पुराव्याची जरूरी नाही. दहाव्या-बाराव्या शतकाच्या सुमारास या अपभ्रंशाच्या पोटी मराटी जन्मास आली. अपभ्रंश म्हणजे आधीच पतित भाषा, आता त्या अपभ्रंशापासून जन्मलेल्या मराठी भाषेविषयी कितीसें प्रेम या संस्कृतप्रिय वर्गास असेल याची कल्पनाच केलेली बरी ! महानुभाव-पंथीय श्री चक्रधरानीं देशभाषेत लिहिण्यास नाराज असलेल्या आपल्या बड्या पंडित शिष्यांकडून प्राकृत जनाच्या उद्धारासाठीं मऱ्हाटीतूनच ग्रंथरचना करविली. तशातच नरेंद्रासारख्या कविवर्याना मऱ्हाटीविषयी अभिजात आत्मीयता उत्पन्न झालेली त्याच्या पुढील उद्गारावरून दिसून येतें:— ' जिये भाषेचिये रसवृत्ती :

सा भाषाचे कुपे कीजेति निगुती । ते मऱ्हाटी कवण जाणे निरूती : जे रसाचें जीवन ’ (४६). नरेंद्राचे असे हे एकच उदाहरण नसून श्रीज्ञानेश्वरानींहि “ अमृतातेही पैजेसी जिंके ” अशा तऱ्हेचे आत्मीयतेचे उद्‌गार काढले आहेत; हें जरी खरे असले तरी सुशिक्षितातील बहुजन अजून मराठीविषयीं अनुकूल नव्हते असेच दिसते. नाहीतर एकनाथाना “ संस्कृत वाणी देवे केली । तरी प्राकृत काय चोरापासोनि झाली । ” असा खडखडीत सवाल टाकण्याची आवश्यकताच भासली नसती. तसेच एकनाथाचे समकालीन दासोपताना मराठी भाषा कमी दर्जाची नाही असे नानातऱ्हेची उदाहरणे देऊन समजावून सागण्याची जरूरी वाटली नसती.

कसेहि असो. ‘ अनिच्छन्नपि.. बलादिव नियोजितः ’ अशा तऱ्हेने मराठीचा अभिमान स्वीकारल्याशिवाय कोणाहि व्यवहारी विचारवंताला गत्यंतर राहिले नाही. मराठीच्या या अभिमानाबरोबर हळूहळू ब्राह्मणवर्ग स्वतःस ‘ मराठे ’ असेहि म्हणून घेण्यास प्रवृत्त झालेला दिसतो. आणि आज एकेकाळी आपण ‘ मराठे ’ म्हणवून घेण्यास नाराज होतां आणि मऱ्हाटीविषयीं दुजाभाव दाखवीत असूं याचाहि या वर्गास विसर पडला आहे. बाराव्या शतकानंतर मराठीस ब्राह्मण वर्गाचा जसजसा जास्त पाठिंबा मिळाला तसतसा महाराष्ट्राचा विस्तार गोदावरीच्या दक्षिणेस झपाट्याने होत गेला. मरहट्टे ही एक विशिष्ट जात न राहाता मराठे बनण्यास सर्वच अहमहमिकेने उत्सुक झालेले दिसतात नुसते मराठे म्हणवून घेऊनच चालणार नाही तर सर्व प्रकारें बहुजन समाजात एकरूप होऊन एकजात सर्वांनी ‘ मराठे ’ होणे जरूर आहे, असा उपदेश ( बऱ्याच ब्राह्मणाचा रोष पत्करूनहि ) जाहीरपणें करणारे सुबुद्ध विद्वान् ब्राह्मण आज महाराष्ट्रात पुढे येत आहेत हें ‘ मरहट्टा ’ तील विशेष होय.



## : ४ :

# जुळीं भावंडें : मरहट्टे आणि कानडे

**कर्णाट** आणि मऱ्हाटच्या निर्मितीस कारण झालेले मूळ प्राचीन लोक एकच होते, असें म्हटले असता पुष्कळाना आश्चर्याचा धक्का बसेल! किंबहुना हा काही तरी भ्रममूलक विचार आहे असें त्यास वाटण्याची भीतिहि आहे. अलीकडील कर्णाट आणि मराठातील तेढ आठवली तर या दोन्ही प्रांतांना 'जुळीं भावंडें' म्हणणें विचित्र वाटल्याशिवाय राहाणार नाहीं हे खरें. पण विरोध हें प्रेमाचेंच एक विकृत स्वरूप आहे. सूड जसा अन्यायाच्या प्रतिकाराचा आसुरी प्रकार आहे, तसेच वैर हेंहि बऱ्याच वेळां प्रेमाचें एक विकृत रूप असतें. आणि आजच्या कर्णाट महाराष्ट्रांतील विरोधी भावाचा उगम त्यांच्या आरंभींच्या बंधुप्रेमातच आहे हें ऐतिहासिक घटनाच्या सिंहावलोकनावरून सहज कळून येणार आहे.

### यदु आणि तुर्वसु

मरहट्टे याची पूर्वपरंपरा वेदकालीन यदु-जनांपर्यंत जाऊन पोंचते हें आपण मागील प्रकरणीं पाहिलेंच आहे. ऋग्वेदात यदूंच्याबरोबर तुर्वशांचाहि जवळजवळ तितक्याच वेळां उल्लेख येतो. यदु आणि तुर्वश हीं दोन निरनिराळीं घराणीं असलीं तरी ते वेगळे जन नसून मुळांत एकच असावेत असा विद्वानांचा

तर्क आहे. कीथ आणि मॅक्डोनेल यांनीं यदु आणि तुर्वश हीं व्यक्तींचीं नावें नसून हे विशिष्ट जन आहेत असें आपलें मत व्यक्त केलें आहे. "It is perfectly reasonable to hold that the Turvasas and Yadus were two distinct though closely allied tribes." Macdonell and Keith ( Vedic Index Vol. I & II, Yadu and Turvasa )

यदुजनापासूनच विशेषेंकरून मरहट्टे याचा विस्तार झालेला आहे हें खरें. मात्र यावरून कर्णाटक आणि यदुवंश याचा संबंध आला नाहीं असें समजता येत नाहीं. चालुक्य राष्ट्रकूटादि घराण्याची वंशपरंपरा यादवजनांपर्यंत नेली जाते. डॉ. आळतेकरानी अभिजात कर्णाटकीय म्हणून ठरविलेला राष्ट्रकूट वंश यादववंशीय सात्यकी शाखेपासून निघाला असें त्या घराण्याच्या ताम्रपट व शिलालेखावरून कळतें. म्हैसूरचे आजचें राजघराणे यदुवंशीय आहे हें सुप्रसिद्धच आहे.

मराठ्यांचा जसा यदुवंशाशीं विशेष संबंध होता तसा जुनी परंपरा पाहतां कर्णाटकीयांचा तुर्वसूंशा घनिष्ट संबंध असलेला आढळून येतो. ययातीच्या शापाने पतित झालेले तुर्वसुवंशीय लोक दक्षिणेत येऊन राज्य करूं लागले, असे सांगितलें जातें ( महाभारत, आदिपर्व, अध्याय ८४ ). मत्स्य पुराणांत तुर्वसु वंशाच्या दक्षिणापथातील काहीं घराण्यांचा उल्लेख आला आहे.

'तुर्वसोऽस्तु सुतो गर्भो गोभानुस्तस्यचात्मजः ।
गोभानोऽस्तु सुतो वीरः त्रिसारिश्चापराजितः ॥
पाड्यश्च केरलश्चैव चोलः कर्णस्तथैवच ।
तेषा जनपदाः स्फीताः पांड्याश्चोलास्सकेरलाः ॥ ४८.५ ॥

वरील श्लोकांत पाड्य, केरल, चोल याच्याबरोबर उल्लेखिले गेलेले कर्ण ( जन ) कर्णाटकीयच होत, कारण दक्षिणापथातील पाड्य, केरळ, चोलांच्या जवळ या नामसादृश्याचा प्रदेश कर्णाटकाशिवाय दुसरा नाही. मनुस्मृतींत 'झल्लोमल्ला ' च्या बरोबर ' नट ' आणि ' करण ' याची नावें व्रात्य क्षत्रियाच्या यादींत आली आहेत ( १०–२३ ). श्री. राजवाडेप्रभृति विद्वानानी नट आणि करण हे आजच्या कर्णाट जनाचे पूर्वज होत असे आपले मत व्यक्त केलें आहे. मनुस्मृतींतील ' करण ' आणि मत्स्य पुराणांतील ' कर्ण ' हीं निरनिराळीं नावे

नसून, एकच असावींत यात शंका नाही. कण्ण जन कर्णाटकात प्राचीन काळीं होते असें तेथील ग्रामनामावरून निदर्शनास येतें. 'कण्ण-विषय, 'कण्ण-वाड, कण्ण-देश, कण्ण-नाड, कण्ण-पाडि (कण्णंबाडि)' वगैरे स्थलनामातील कण्ण शब्द जनवाचक आहे. संस्कृतातील 'कर्ण' याचें प्राकृतरूप "कण्ण" असें होतें. कण्णजन हे तुर्वसुवंशीय आहेत हें मत्स्य पुराणावरून आपणास कळते.

कर्णाटकातील प्राचीन गंगवंशीय घराणे तुर्वसुवंशीय होतें. गंगातीराहून दक्षिणेला ते आले असें त्याच्या वंशावळीवरून दिसतें. रा. ब. आर्. नरसिंहाचार्यांनी या गंग घराण्याच्या वंशपरंपरेविषयीच्या आपल्या लेखात वरील गोष्ट नमूद केली आहे (कर्णाटक साहित्य परिषद्-पत्रिका ऑक्टोबर १९२४). तुर्वसु वंशाचे राजे चोल, पाड्य, केरलादि राज्यें स्थापन करून दक्षिणेत राहिले, असा पद्म पुराणातहि आधार मिळतो. ही गोष्ट असंभाव्य नाहीं असे "Ancient Indian Historical Traditions" या आपल्या ग्रंथात श्री. पार्जिटर म्हणतात. गंगाच्या प्रमाणेंच विजयनगरचा शेवटचा राजवंश तुर्वसुवंशीय होता असें काही शिलालेखावरून दिसून येते (Ep Indica IX p 340)

अशाप्रकारें कर्णाट आणि मऱ्हाटाशी यदु-तुर्वसूंचा, अतिनिकट संबंध असल्याचे सिद्ध होतें. यदु-तुर्वश या दोघाचा उल्लेख जुळ्या भावंडाप्रमाणे ऋग्वेदात बहुतेक सर्वत्र आढळतो. जिथे जिथें म्हणून यदूचे नाव येते तिथे तिथे तुर्वशाचें नाव आलेंच. एकदोन ठिकाणी मात्र-तुर्व (१०-६२-१०) आणि वश (१०-४०-७) अशी पदच्छेदित नावे आढळतात. आणि हा पदच्छेदहि एका दृष्टीने फार उद्बोधक आहे. तुर्वश असें अखंड एकच नाव समजण्याचे यामुळे आता कारण राहात नाही. तुर्व आणि वश असे दोन शब्द मिळून हे सामासिक पद बनलेलें आहे हे निश्चित ठरते. वश जनाचा उल्लेख ब्राह्मणात आहे (Vedic Index Vol II 273). वशा याचा अर्थ गाई असाहि होतो. यामुळे वश (जन) म्हणजे पशुपालक-गवळी असा अर्थ करणे गैरवाजवी होणार नाहीं. यदु हे तर गवळी असल्याचें सुविख्यात आहे. यदूंच्या बरोबर उल्लेखिले जाणारे तुर्वश हेहि गोपालक वृत्तीचेच

असावेत हें सागावयास नको. आणि तुर्वश यातील वश (वशा) हा शब्द पशु-वसु म्हणजे गाईचा निदर्शक असावा हें उघडच आहे. वेदातील तुर्वश, महाभारतात तुर्वसु या नावाने ओळखले जातात असे विद्यानिधि श्री. चित्रावशास्त्री आपल्या प्राचीन कोशात लिहितात.

"यादवं गो (महिषादिके) धने" या वाक्याबरोबर 'यादः' शब्दाचा अर्थहि विशेष चिंत्य आहे. 'यादः' हा रसार्थक शब्द आहे. 'अंधस्', 'हालु' प्रमाणे या रसार्थक शब्दाचा दूध असा अर्थ होणे शक्य आहे. गोपालक वृत्तीच्या यादवाच्या नावाचें रहस्य यामुळें जास्त खुलून व्यक्त होणार आहे. यदुजन-यादवाचे आप्तबाधव म्हणून निश्चित ठरलेल्या तुर्वशाचें नावहि असेच सार्थ असणें असभवनीय नाहीं. तुर्वश किंवा तुर्वसु हा जोडशब्द आहे हे वर निदर्शित केले आहे. यातील वश किंवा वसु शब्दाची व्युत्पत्ति विचारार्ह आहे. समाजविकासक्रमाच्या इतिहासाचे साहाय्य घेतले असता या शब्दाचें कोडे सुगम रीतीनें सुटणार आहे. मानवाच्या प्रारंभिक स्थितीत, पाळलेलीं जनावरें हीच त्याची सपत्ति असें समजले जात असे. सोनें-चादी वगैरेंना महत्त्व पुढील काळी आलें. जगातील या सामाजिक विकासक्रमाच्या इतिहासाचें प्रतिबिंब स्पष्टास्पष्टरीतीने प्रत्येक जनाच्या भाषेतील शब्दातून उमटलेलें आपणास पाहावयास मिळतें. Cattle आणि Capital याचा मुळातील निकट संबंध हे याचप्रकारचे एक उदाहरण आहे. गोधन यावरूनच कानडीत 'दन' (गुरे) हा शब्द रूढ झाला आहे. हाच क्रम वशा–वसु (संपत्ति), पशु–वसु या शब्दनिर्मितीसहि कारण झाला असावा असा तर्क केल्यास चुकीचे होणार नाही. ऋग्वेदातील 'अजाः' 'शिग्रुः' या प्रकारची जनवाचक सार्थ नावें आठवली असता यदुप्रमाणेच तुर्‌वश–तुर्‌वसु हे नावहि अर्थपूर्ण आहे असे दिसून येईल.

आता तुर्व याचा अर्थ काय असेल हा प्रश्न उद्भवतो. जुन्या द्रविड-वर्गीय भाषेंत 'तुरु' म्हणजे गोसमुदाय. कानडीत हा शब्द या अर्थाने आजहि व्यवहारात आहे. गवळी या अर्थी 'तुरुकार' हा शब्द 'हट्टीकार' या शब्दाचे पर्यायरूप म्हणून कानडी भाषेत रूढ आहे. बेळगाव जिल्ह्यात बरींच देसाई घराण्कें तुरुकारवंशीय आहेत. यावरून तुरुजनाचे अस्तित्व सिद्ध होत असून

ते गोपालक वृत्तीचे होते ही गोष्टहि स्पष्ट होते. वेदकालीन तुर्व (तुर्वश) जन हे आजहि कर्नाटकात असलेल्या तुरुकार (हट्टीकार) जनाचे पूर्वज होत असें म्हटल्यास चुकीचें ठरणार नाही. तुरु (कार) या शब्दावरून तुर्वशाना यवन (तुर्की) बनविण्यापर्यंतहि काहीची मजल गेली आहे! "यदोस्तु यादवा जाताः तुर्वसोर्यवनाः स्मृताः"!

तुर्वसु हे तुर्क लोकापैकीं असावेत असा तर्क नामसादृश्यावरून सुचलेला दिसतो. कर्नाटकातील 'तुरुकार' जातीलाहि असेंच तुरुक गणलें असलें तर नवल नाहीं, कारण तुर्वसुपेक्षां 'तुरुकार' हें नाव तुरुकला फार जवळचे आहे. तुरुकार हे मुसलमानातून हिंदू झाले असावेत या समजुतीनें काही लिंगायत उपजाती (पंचमसाली वगैरे) त्याचेपासून दूर रहाण्याचा प्रयत्न करीत असत. तुरुकारहि आज लिंगायत झालेले आहेत. वीरशैव लिंगायत पंथ, प्रसारक धर्म असल्याने कुरुब, रड्डि, वक्कलिग (कुणबी) वगैरे बऱ्याच उपजाती या नवीन धर्मात समाविष्ट झाल्यानतरहि त्यानी आपले पूर्वीचें शाखानाम सोडलेलें नाही. यामुळे लिंगायतपंथाच्या प्रभावात गेलेल्या प्राचीन जाति, जनांची नावे आजहि आपणास ऐकूं येतात. अशापैकीं 'तुरुकार' हा एक वर्ग आहे. श्री शिवाजीच्या दक्षिणेतील स्वारीत बेळगाव जवळ जिने कसून विरोध केला व काही काळ शिवाजीच्या सैन्यास थोपवून धरलें, जिच्या धैर्याचें व पराक्रमाचें शिवबासहि कौतुक वाटलें ती बेळवडी मल्लम्मा देसाईण वीर तुरुकार घराण्याची होती, असे तेथील जुन्या दप्तरातून नमूद आहे. हे तुरुकार, जहागीरदार, देसाई सर्व पाटील–गौडा घराण्याचे आहेत. वक्कलिग, रड्डिपाटील घराण्याचे देसाई या भागात आहेत. तसे हे तुरुकारहि पण तुरुक मुसलमानापैकी अशा कल्पनेनें बाकीचे याना थोडे दूर ठेवीत असत. शेवटी एका लिंगायत मठाधिकाऱ्याला ही समजूत खोडून काढण्याकरता पुढाकार घ्यावा लागला. त्यानी एक लहानसे पुस्तक काढून, "तुरुकार–जन तुरकी–मुसलमान नसून ते तुर्कांचे अरी म्हणजे वैरी होते, त्यामुळं त्याना 'तुरुकार' असें नाव प्राप्त झालें; अशा यवनविरोधी वीर जनांस मुसलमान समजणें खोडसाळपणाचें आहे" असे जाहीर केले!

संस्कृत ग्रंथकर्ते जर तुर्वसूंना यवन गणूं लागले तर तुरुकार जन म्हणजे

तुरुक अशी भ्राति सामान्य अज्ञ लोकांत उत्पन्न झाली असणें सहज आहे. पण जगांत अत्यंत प्राचीन ग्रंथ म्हणून निश्चित ठरलेल्या ऋग्वेदांतच यदु-तुर्वशांचें नाव नमूद असल्यानें हे सर्व तर्क सपशेल खोटे आहेत हें आपोआप सिद्ध होत आहे. पूर्वपरंपरा विच्छिन्न होऊन आपण अज्ञानांत कसे चाचपडत आहोंत हें यावरून थोडें तरी कळण्याजोगें आहे. मोहेंजोदारोसारखी मोठी शहरें व वेदातील इतिहासवजा काहीं माहिती उपलब्ध झाल्यानें आपणास त्या काळच्या चित्राच्या रेषा अधुकपणे दिसूं लागल्या आहेत. काळ्याकभिन्न रात्रींत वीज चमकल्यानें आपणाभोंवताली अंधकार किती गाढ आहे याची जशी जाणीव येते तशीच आपल्या पूर्वपरंपराविषयी आज आपली स्थिति झाली आहे.

## रिस्टिक-भोजक

वेदकाळांतील यदु-तुर्वसूंच्या जुळ्या नावाप्रमाणे खिस्तशकारंभींच्या अशोक खारवेलादिकाच्या शासनातून रिस्टिक-भोजक अशी जोड नावे आपणांस दिसतात. प्राचीन रिस्टिक भोजकाच्या वसाहती एकमेकाच्या जवळ असाव्यात असा तर्क डॉ. बी. सी. लॉ यानी ( Some Ancient Indian Tribes, Indian culture, 1935, p 390 ) केला आहे. " The Rastrikas who were almost associated with the Bhojas must have occupied the adjoining tracts and it may be assumed that they were located in the very region where present Marathas have their habitat." भोजक हे वऱ्हाडचे, हे निश्चित आहे, यामुळें रिष्टिकाची वसाहतहि वऱ्हाडच्या आसमंतात असावी असा तर्क करणें गैरवाजवी होणार नाही. रिष्टिक हे राष्ट्रकूटाचे पूर्वज होत असा काहीचा तर्क आहे, आणि हा तर्क जर खरा असेल तर राष्ट्रकूटाच्या इतिहासातील एक कोडें सहजपणे सुटतें. राष्ट्रकूट घराण्याची राजधानी मळखेड होती आणि राष्ट्रकूटाचे मुख्य केंद्र कर्णाटकाच्या भागातच आढळते व राष्ट्रकूट घराणें कर्णाटकीयच होय असें डॉ. आळतेकराचे निश्चित मत आहे. राष्ट्रकूट कर्णाटकीय हें जर खरें असेल तर त्याचीं प्राचीन घराणीं कर्णाटकात न आढळता वऱ्हाडात कशी ? याचें उत्तर म्हणून कर्णाटकांतून काहीं घराणी वऱ्हाडात वसाहतीकरिता आली असे आज गृहीत धरावें लागते. (Rashtrakutas and Their Times p. 4). पण भोजकांच्याबरोबर वऱ्हाडच्या

आसमंतांत रिष्टिकहि प्राचीन काळापासून मूळ धरून होते या गोष्टीकडे दुर्लक्ष केल्यानें आजपर्यंत या कोड्यास समर्पक उत्तर मिळाले नाहीं.

## रिस्टिक–राष्ट्रिक कोण ?

" राष्ट्रिक " याचा अर्थ राष्ट्राचे-देशाचे ( Indigenous, Native ) असा होतो. राष्ट्रकूटाचे पूर्वज राष्ट्रिकच होत असें ब‍ऱ्याच विद्वानाचे निश्चित मत आहे. राष्ट्रिक म्हणजे या देशाचे मूळचे रहिवासी हा अर्थ जर खरा असेल तर, राष्ट्रिक हा शब्द, मुळात कोणत्या तरी देश्य शब्दाचे भाषांतर असणें शक्य आहे. कारण या देशाचे मूळचे लोक आर्यांच्या पूर्वी संस्कृतेतर भाषेचे होते याबद्दल आता सध्या तरी कोणाला शंका नाहीं. या दृष्टीनें पाहिले असता राष्ट्रिक हा शब्द, या देशाचे, मूळचे या अर्थाचा संस्कृत शब्द असला पाहिजे. यामुळे तो भाषांतरित असणे शक्य आहे.

कर्णाटकात " नाडव " अशी एक जात आहे. याना विशिष्ट जात असें संबोधण्यापेक्षा ' जन ' म्हणणेच जास्त सयुक्तिक होईल. " नाडव " म्हणजे या देशाचा ( नाडु=देश). राष्ट्रिक हा शब्द नाडव याचेच संस्कृत भाषांतर असावे असें म्हणण्यास पुष्कळ जागा आहे. राष्ट्रकूट राजा नृपतुंग ( खि. श. ८१५ ) याचे नावावर प्रसिद्ध असलेला ' कविराज मार्ग ' नावाचा एक अलंकार–शास्त्रावरील ग्रंथ उपलब्ध आहे. त्यात नाडवाचे विशेष वर्णन दोन-तीन ठिकाणी येतें. वास्तविक तो साहित्यशास्त्रावरील ग्रंथ आहे. असे असताहि नाडवाविषयीं त्यात येणारे उल्लेख गौरवपूर्ण अभिमानसूचक असावेत हे विचारार्ह नाही काय ?

नाडव जन अभिजात रसिक असून विशेष शिक्षण नसताहि ' काव्य परिणत-मति ' होते असे नाडवाचे वर्णन त्यात आरंभीच आलें आहे. आणखी पुढें एका ठिकाणीं असे वर्णन येतें:—

सुभटर्कळ् कविगळ् सु–
प्रभुगळ् चेल्वर्कळभिजनर्कळ् गुणिगळ् ॥
अभिमानिगळत्युग्रर्
गभीरचित्तर् विवेकिगळ् नाडवर्गळ् ॥२.२८॥

वरील वर्णनातील " कळ्" किंवा " गळ्" हा बहुवचनार्थी प्रत्यय आहे हें जाणलें असता व वर उद्धृत केलेल्या श्लोकात ' चेल्वर् ' सोडून सर्वच शब्द संस्कृत असल्याने मराठी जाणणाऱ्याना त्याचा अर्थ लावणें कठिण होणार नाही. ( अर्थः शूर, कवि, सुप्रभु, सुदर, कुलीन, गुणी, अभिमानी, अतिउग्र गंभीर व विवेकी असे हे नाडव लोक आहेत. )

या खेरीज " उत्कटदर्पान् प्रियमोहनान् पदगौद्रान् पतगवृत्तींश्च ॥ " अशा रीतीने कण्णाडीय लोकाचें वर्णन नवव्या शतकातील एका कवीने केले आहे ( अपभ्रंश काव्यत्रयी, पान ९३ ).

या नाडवाना दक्षिण कन्नड जिल्ह्यात ' बंटरू ' असे दुसरे एक नाव रूढ आहे. बंट म्हणजे भट, वीर. या बंट किंवा नाडवाचें गुणवर्णन थर्स्टन् याच्या " जक्षिणेंतील जाति आणि जन " या ग्रंथात खालीलप्रमाणें दिलेले आहेः

" They still retain their manly independence of character, they have strong well developed physique and they still carry their heads with the same hotty toss as their forefathers did in the stirring fighting days, where as an old proverb had it, ' the slain rested in yard of the slayer ' and where every warrior constantly carried his sword and shield Both men and women of Banta community are among the comeliest of Asiatic races " ( Castes and Tribes in Southern India Vol I p 149 ).

११०० वर्षांपूर्वीच्या ' कविराज मार्गा ' तील वर्णनात व नवव्या-दहाव्या शतकातील " अपभ्रंश काव्यत्रयी "त आढळणाऱ्या उल्लेखात आणि वर दिलेल्या एका आधुनिक संशोधकाच्या निरीक्षणात किती आश्चर्यकारक साम्य ! जणूं काही वरील कानडी व संस्कृत श्लोकाचे हें इंग्रजीत भाषांतरच ! !

दक्षिण कन्नड जिल्ह्यात तुळु नामक कानडीची उपभाषा चालते. तुळु भाषेत " वक्कल्मे "–शेतकरी–या अर्थी बंट शब्द वापरतात. राष्ट्रिक-राष्ट्रकूट ' Indigenous Tribes " असे विन्सेंट स्मिथ यानीं आपले मत नमूद केलें आहे ( Early History of India, page 430 ). ' रठिक ' शब्दाला Native असा अर्थ पालीकोशात दिलेला आहे. राष्ट्रकूटांना ' कुटुंबी ' असे

विशेषण कांहीं ठिकाणीं आढळतें आणि त्यांच्या काही शिलालेखांच्या आरंभीं नांगराचें चित्र काढलेलें असतें. हिंदुस्थान सरकारच्या शिलालेख संग्रह करणाऱ्या शाखेचे मुख्याधिकारी श्री. एच. कृष्णराव याचें "राष्ट्रकूट–प्रमुखान् कुटुंबिनः" या वाक्यावर एक टिपण आहे :—

"The familiar phrase राष्ट्रकूट–प्रमुखान् कुटुंबिनः Which occurs in copperplate inscriptions, shows also that the Rashtrakutas were कुटुंबिनः i.e. cultivators, who enjoyed a higher social status than others of their community" (Epigraphica Indica XI pp. 342-343).

कुटुंबिन् हा शब्द द्रविडभाषावर्गीय मूळभाषेतून बनला असावा असा कांहीं विद्वानाचा तर्क आहे. यातील मूळशब्द 'कुडु' म्हणजे कूळ (शेतकरी) असा आहे. 'कुडु–वोक्कलिग' या जोड शब्दांत दोन्ही समानार्थी पदें आहेत. 'कुडु' शब्दात येथे वरील अर्थ अभिप्रेत आहे. "कुडुव" यावरूनच कुणबी शब्द प्रचारात आला असावा असें मला वाटतें. कुणबी हा शब्द कुळ यापासून निष्पन्न झाला असणें जास्त संभवनीय आहे असें आपलें मत रा. अत्रे यानी 'गांवगाड्यात' नमूद केले आहे. या सर्व आनुषंगिक पुराव्यावरून श्री. कृष्णराव यांनीं स्वतंत्रपणें शिलालेखातील संदर्भावरून केलेला अर्थ यथोचित आहे असें म्हणावे लागतें.

राष्ट्रिक–रट्ट–रड्डि; रड्डि शब्दाची व्युत्पत्ति आज अशीच मान्य झाली आहे. पाटलाना तेलगु देशात रड्डी असें पर्याय नाव आहे. पाटील किंवा गौड हा शब्द तेथें प्रचारात नाहीं. रड्डि-राष्ट्रिक ही अवस्था गोपालकवृत्तीच्या पुढची आहे हें मानवसमाजाचा विकासक्रम जाणणाऱ्याना सागावयास नको. पाटील किंवा गौड या शब्दात गोपालकवृत्तीचा जसा ध्वन्यर्थ आहे, तसा तो रड्डि या शब्दात नाही. राष्ट्रिक–नाडव हा वसाहती करून स्थिर झाल्यानंतरची अवस्था सुचविणारा शब्द आहे. संस्कृत भाषेत नाडव शब्दाचे **भाषांतर** राष्ट्रिक झालें. त्याचेंच **संस्कृतीकरण** नाट (< नाड) असें झालेलें आढळेल. मनुस्मृति वगैरे ग्रंथांतून 'करणा' च्या बरोबर नटाचाहि उल्लेख येतो. हे नट व्रात्य क्षत्रिय होत असा स्मृतिग्रंथाचा स्पष्ट निर्वाळा असल्यामुळे त्याना नाच वगैरे करणाऱ्या नाटकी

नटवर्गात ढकलण्याचें धाडस कोणी करणार नाहीं अशी आशा आहे. नाडर् हें आडनांव व या नावाची कुळी तमिळ देशातहि आहे. नाट्टर (—People of the Country, Indigenous Tribes ) म्हणजेच संस्कृतमध्ये राष्ट्रिक असा अर्थ होतो. 'Nattar ( meaning people of the Country ) reported by some to be a main caste and some others a subcaste of Vellalas Nearly all those who returned the name came from Salem and were cultivators '( थर्स्टन IV p 140 ). कन्नड जिल्ह्याप्रमाणे शाल्यम्, कोइमत्तूर, जिल्ह्यातहि नाडव होते असें मागील शिरगणतींत आढळून आले आहे.

भोजाच्याबरोबर प्राचीनकाळी उल्लेखिलेले रिष्टिक–राष्ट्रिक हे नाडव असावेत असे वरील सर्व गोष्टी लक्षात घेता दिसून येतें. भोजाचा उत्तरकालीन वसाहतीचा प्रदेश विदर्भ, तर त्याच्या लगतच त्याचे भाई रिष्टिक याचा प्रदेशहि असावा हें युक्तच आहे. आणि आज खानदेश या नावाने ओळखल्या जाणाऱ्या प्रदेशाच्या जवळपासच हा रिष्टिकाचा देश असावा असा आमचा तर्क आहे. 'खानदेश' या शब्दाची व्युत्पत्ति अजून समर्पकपणे लागलेली नाही. खानापासून याला खानदेश असे नाव आलें हे मत आज कोणालाच मान्य नाही. कारण मुसलमान येण्यापूर्वीपासून हें नाव प्रचलित होते असा पुरावा मिळतो. कन्न देश ही व्युत्पत्ति आज जवळजवळ सर्वमान्य आहे. पण यातील कन्न या शब्दाचा अर्थ काय, याबद्दल काय तो मतभेद आहे. कन्न म्हणजे कण्ह–कृष्ण, कन्ह म्हणजे कृष्णाचा देश किंवा कृष्णवर्णाचा प्रदेश असे दोन अर्थ संभवतात. कृष्णाचा देश असें म्हणणे सयुक्तिक दिसत नाहीं. कृष्ण ज्या प्रदेशात जन्मला त्या मथुरावृंदावनाला किंवा जिथें तो वैभवात होता त्या द्वारकेच्या आसमंताला कृष्णाचे नांव यावयास हवें होते. खानदेशाचा कृष्णचरित्राशी काहींच संबंध येत नाही. कृष्णाशीं संबंध नसलेल्या प्रदेशाला त्याचें नांव प्राप्त झाले असें म्हणणें पटण्यासारखे नाहीं.

जमिनीच्या रंगावरून याला कण्ह–कृष्ण–काळी जमीन असलेला देश हें नांव आलें असें काहीचें मत आहे. देशाला भू–प्रदेशाची पहाणी केल्यानंतर पुन्हा नांव मिळाले असणें अगदींच असंभाव्य नसलें तरी देशाला नाव प्राप्त होण्याचा हा क्रम सामान्य तर खचितच नव्हे. कन्न, कान्न, हा शब्द कृष्णाशीं

जोडणें कितपत सयुक्तिक होईल याबाबत शंका वाटते. खानापूर ( बेळगांव जिल्हा ) येथील जमीन ही सुंदर ताबूस रंगाची आहे ! अशा ठिकाणी कृष्णाचा ( रंग ) आणि कन्नाचा ( खन्न–खानचा ) मेळ कसा बरे बसणार ? येथे कन्न आणि कन्हची गफलत झाल्यानें हा घोटाळा उत्पन्न होत आहे. कन्नचे कृष्ण असे रूप होणें शक्य नाहीं. कृष्णचें प्राकृत रूप कन्ह आहे. खान हें खन्न, कन्न असेंच बनेल, कन्ह होणार नाही. कानडी आणि मराठी बोलीतील उच्चार-वैशिष्ट्य येथे लक्षात घेणें जरूर आहे. कानडीतील काहीं शब्दातील अल्पप्राण मराठी भाषेंत महाप्राण होतात. प्रस्तुत येथे पुढील शब्द अभ्यसनीय आहेत.

| कानडी | मराठी |
|---|---|
| किंडि | खिंडि, खिंड |
| कोब्बरे | खोबरे |
| कळ | खळें |
| काहिले | खाई ( फोफाटा ) |
| कणि | खाणि, खाण |

वगैरे शब्दात क चा ख बनलेला अनुभवास येईल. याचप्रकारें कन्न देश खानदेश होणें शक्य आहे.

‘ कन्न ’ या जनावरून पुष्कळ प्रदेशाना नावें आलेली आहेत, हें या पूर्वीच सागितलें आहे. तशातलाच खानदेश ( कन्नदेश–खानदेश ) हा एक प्रकार होय. कन्न ( कर्ण अथवा नट ) हे या प्रदेशात वसाहत करून होते हे खानदेशाच्या पंचक्रोशीतील काही ग्रामनामावरूहि सिद्ध होते. औरंगाबाद जिल्ह्यात कन्नड असें एक तालुक्याचे मुख्य ठिकाण आहे. शिवाय इंदूर संस्थानात कन्नड अशी काहीं गावाचीं नावे मिळतात. कन्नडगाव ( नागलवाडी महाल ), कन्नडपुरा ( नेमाड जिल्हा, खरगोन महाल ), कानडगाव ( कासरावद महाल ), कान्यखेडी ( महेश्वर महाल ), कानडी ( काळाधोंड महाल ), कानाड्या ( इंदोर महाल ) वगैरे गावें या भागातील पुरातन आर्येतर कानडी भाषिक लोकांच्या वसतीचीं द्योतक आहेत, असें म्हणणें चुकीचें होईल काय ? खानदेश गॅझेटियरमध्यें या भागात कानडी गवळी वास्तव्य करून असल्याचा उल्लेख मिळतो :

" Kanadas are a peculiar race of drovers who sometimes visit the western forests of Khandesh .They appear to be descended from Dravidian immigrants, but *(to our misfortune)* have no tradition to that effect and no special language More civilized and respectable than most wandering herdsmen, they differ little from Maratha husbandmen, and in parts of Nasik, have taken entirely to agriculture. They have a peculiar breed of black and white cattle, *hatkar*, ( हटगार = गुरें ) which, though not large, are much prized for their strength and spirit take good care of their cattle " ( Khandesh Gazetteer page 105 ) नाशिकच्या गॅझेटियरमध्येहि या कानड गवळ्याचा उल्लेख येतो :

" The Cattle breeding tribes, the Kanadas who formed a **fair proportion** of the people mainly depend on their herds and flocks.. the Kanadas were remarkably well off. Some Kanada hamlets with not more than three or four houses had as maney as 500 Cattle and 500 goats " ( page 232 ). खानदेश, नाशिक, अहमदनगर या भागातील गॅझेटियरवरून या प्रदेशात कानड ( गवळी ) कालपरवापर्यंतहि वास करीत होते हे सिद्ध होते. नाशिक जिल्ह्यात पुष्कळ ठिकाणी " वीर गल्लु "–मराठीत ज्याना वीरगळ असे म्हटले जातें-वीराच्या स्मारकाचे दगड आढळतात. ( Memorial stones are found all over the District and are specially numerous near the Sahyadris shivar has a remarkable group of memorial stones one group of unusually large stones occur at Chousale the faces are carved with rude figures, sometimes of one or more men on horse back, sometimes armed with swords sometimes rude incriptions are carved under figures

The people say that they were raised by the Villagers. The custom seems to have prevailed among all cultivating classes, especially among Kunabis, Kolis, and Vanjaris. Nasik Gazetteer page 647 )

वीरांच्या स्मारकाकरितां अशाप्रकारे चित्रे कोरून दगड उभे करण्याची ही पद्धत हिंदुस्थानात कर्णाटकीयांचें वैशिष्ट्य म्हणून मानली गेली आहे हें सुप्रसिद्धच आहे. " वीर गळ " यातील " गळ " शब्द, कानडी " कल्लु " याचें मराठीकरण आहे. कर्णाटकीयाचें वैशिष्ट्य दाखविणारे हे वीरगळ, या भागांत एकेकाळीं कानडे लोक वास करीत होते याचा निःसंदिग्ध पुरावा आहे. गॅझेटियरमधील या भागांत कानड गौळी असल्याचा उल्लेख वरील विधानास पुष्टि देत आहे.

भोजकांच्या जवळच रिष्टिकाची वसाहत होती असें बी. सी. लॉ याना आपल्या संशोधनात आढळलें ते अगदी बरोबर आहे. आणि भोजकाच्या जवळची रिष्टिकाची ती वसाहत म्हणजे वऱ्हाडच्या लगतचा कन्नदेश-खानदेश हीच होय. जवळपासच्या ग्रामनामावरून व तेथे अजूनहि जिवंत असलेल्या कांहीं कानड गवळ्याच्या शाखावरून आणि नाशिक प्रदेशातील वीरगळा-वरून कन्नदेश-खानदेश हा कानड देशच होय असें आम्हाला वाटतें.

## एकींतून बेकी

पत्तिजन-यदुतुर्वसूंच्या आर्यीकरणास फार प्राचीन काळीं ( ऋग्वेदकाळा-पूर्वीपासूनच ) आरंभ झाला. या आर्यीकरणामुळें यदु-तुर्वसू एकत्र आले. महा-भारतात एके ठिकाणी असें लिहिलेलें आढळते कीं तुर्वसूचे स्वतंत्र अस्तित्व नष्ट होऊन ते घराणें यदुवंशांतच सामील झालें. कर्णाटकीय राष्ट्रकूट यदुवंशाशीं संबंध जोडतात. ते तुर्वसु यदूंत विलीन झाल्याचें निदर्शक आहे.

पत्तिजनाना हट्टिजन किंवा हटगार असे प्रचारांत आलेले नाव यदु-तुर्वसु वश संपूर्णतया आर्यीकरणाच्या प्रभावात आल्यानंतरचें आहे. पत्तिजनांच्या भार्षेतील ' प ' काराचा ' ह ' कार हा बदल आर्यांचा अत्यंत निकट संबंध आल्यानंतरचा आहे. याबद्दल पूर्वींच विवेचन केलेलें आहे. पत्तिजनांतील तमिळ आणि तेलगू शाखेनें जुना ' प ' कार अजूनहि जशाचा तसा आपल्या भाषेंत राखला आहे. त्या भाषेंत अजून " हालु " " हुली " असे आरंभीं ' ह ' कार युक्त शब्द बनले नाहींत. पाल् ( दूध ), पुलि ( वाघ ) अशाप्रकारें जुना ' प ' कार आजतागायत त्यांच्यांत चालू आहे. पण कानडींत मात्र ' प ' काराच्या

ऐवजीं 'ह' कार बहुतेक सर्वत्र प्रचारात आला आहे. परंपराप्रिय कर्णाटकीयांनीं हा बदल अकराव्या बाराव्या शतकापर्यंत साहित्यात डोकावूं न देण्याचा भगीरथ प्रयत्न केला असला तरी कित्येक शतकापूर्वीच 'प' काराचा 'ह' कार होण्यास प्रारंभ झालेला आपणास दिसून येतो.

मेघदूतातील 'हित्वा हाला अभिमतरसाम्' या पंक्तींत येणारा 'हाला' शब्द देशीय आहे असें मल्लिनाथ आपल्या टीकेत सांगतो. 'हालु' म्हणजे रस, दूध या अर्थी 'पाल' हा शब्द कानडी वर्गाच्या भाषांतून बऱ्याच काळापासून रूढ आहे. या 'पाल' पासूनच 'हाला' शब्द संस्कृतात गेला असा किट्टेल वगैरे अभ्यासू मंडळीनी केलेला तर्क समर्पक आहे असे वाटतें. 'पारा' 'हारा' या प्रकारचा बदल 'पाला' 'हाला' प्रमाणें प्राचीन आहे. 'अग्रहार' वगैरे वरून हा शब्द संस्कृतमध्ये बऱ्याच प्राचीन काळी शिरलेला दिसून येतो. 'जित्वा **हाटकं** नाम देशं गुह्यकरक्षितम्' असे महाभारताच्या सभापर्वात राजसूय यज्ञाकरिता जिंकलेल्या देशाच्या यादीत एक नाव येतें. 'पाटक' यातील 'प' चा 'ह' प्राचीन काळीच झालेला येथे पाहावयास मिळतो. आपल्याकडे रूढ असलेला पेठा शब्द (हट-हाटच्या पूर्वकालीन) पाट (क) चेंच एक रूप आहे. 'प' चा 'ह' कार सार्वत्रिक झालेला तेलगु आणि तमिळमध्यें दिसून येत नाही. कानडीतच तो संपूर्णतया दृष्टीस पडतो. आणि तदनुषंगाने तो मराठीतहि आढळतो. मरहट्टातील 'हट्ट' हा शब्द याचेंच निदर्शक होय. हटगार हट्टीकार हा शब्द मराठीप्रमाणे कानडीतहि आहे. मराठीत 'धनगर' हा शब्द आहे तर कानडीत 'दनगार' आहे. या व अशा अनेक कारणावरून कानडी आणि मराठी याच्यातील भौगोलिक सामीप्य आणि जनाचे संबंध जितके निकटचे आहेत तितके ते तमिळशी नाहीत हें साधार सिद्ध होत आहे. शिवाय तमिळनाड महाराष्ट्रापासून दूर आहे. एवढेंच नव्हे तर तेलगूचा संपर्कसुद्धा मऱ्हाटकर्णाटका इतका घनिष्ट नाहीं. 'प' काराचा 'ह' कार तेलगूमध्यें अजून घडून आलेला नाहीं.

यदु–तुर्वसु घराणीं महाभारतकाळीं विलीन झाली. पण आर्यीकरणामुळें त्यात पुन्हा वेगळे तट पडले. त्यांतील काहीं पुरोगामी वृत्तीचे लोक जास्त उत्साहानें पुढें गेले असणें जसे शक्य आहे तसेंच काहीं परंपराप्रिय लोक

जुन्यास चिकटून राहिलेले असणें वा अनिवार्य तितकाच बदल स्वीकारण्यास तयार झालेले असणेंहि संभाव्य आहे. हे दोन गट पुढील काळात आढळून येतातच. महाभारताच्या काळानंतर रिस्टिक भोजक अशी जुळी नावें आढळत असल्याचें वर सांगितलेंच आहे. खिस्तशकाच्या सुमारें दुसऱ्या शतकानंतर कर्णाट-महाराष्ट्रीयाचा उल्लेख, निःसंदिग्धपणे स्वतंत्र असा बऱ्याच काळापर्यंत मिळत नाही. शातवाहन कुंतल देशाचे राजे म्हणवितात. चालुक्यहि कुंतलाधिपति होते असे वर्णन आढळतें. कुंतल देश या मोघम नावाखालीं मऱ्हाट-कर्णाटक या दोहोंचा उल्लेख पर्यायानें होत होता यात शंका नाही. विदर्भापासून कर्णाटा-पर्यंतच्या सर्व प्रदेशास कुंतल असे नाव एककाळी प्रचलित असल्याचे शिलालेखा-वरून समजून येतें. वरील राजवटींत महाराष्ट्र व कर्णाटाच्या सीमा अजून स्पष्टपणे निर्दिष्ट झालेल्या नसल्यामुळे दोन्ही देशाना लागू होणारें कुंतल हे मोघम नावच त्यानी उपयोजिले नसेल काय? महाराष्ट्राचा विस्तार अजून मराठीकरणाच्या रूपाने चाललाच होता. बाहेरच्या प्रवाशाना कर्णाट व महाराष्ट्र या जुळ्या भावंडाना स्वतंत्रपणें ओळखणे जड जात असावे. हुएनत्सांगने बादामी चालुक्याचे विषयीं लिहितेवेळीं 'महोलोच'–महाराष्ट्र असें त्याचे वर्णन केले आहे. बादामी आजहि संपूर्णतया कर्णाटातील एक गाव आहे चालुक्याच्या सैन्याला 'कर्णाटक-बलम्' असें नामाभिधान असलेले जुन्या ताम्रपट शिलालेखावरून निश्चितपणें कळतें, असें असता हुएनत्सांगला कर्णाटकी महाराष्ट्रीयासारखा भासावा याचे कारण काय? जुन्या तमिळ साहित्याने तमिळ देशाच्या उत्तरेला 'आरीय' असल्याचे वर्णिलेले आढळतें. 'प'काराचा 'ह'कार वगैरे भाषिक बदल ज्याच्या भाषेत होतात ते आपल्या उत्तरेकडील (वडुगर्) लोक 'आरिय' असा कट्टर परंपराप्रिय तमिळाचा ग्रह झाला! आणि कर्णाटकीयानाच 'आरीय' म्हणण्यापर्यंत त्याची मजल गेली!

ही जुळीं भावंडें बऱ्याच काळापर्यंत विशेष हेवादावा न करिता स्वतंत्र पण एकत्र अशा प्रकारे बाराव्या–तेराव्या शतकापर्यंत नांदत आली. पैठणचे शातवाहन, बादामीचे चालुक्य, मळखेडचे राष्ट्रकूट आणि कल्याणचे चालुक्य या चारहि राजवटींत मराठीने आपलें स्वतंत्र घर मांडलें नव्हते. कर्णाटकीयाच्या राजवटींत ती कानडीजवळच वाढत गेली. वरील चार राजधान्यापैकी तीन तर

निर्विवादपणे आजहि कर्णाटकात आहेत. पुढें देवगिरी–यादवाच्या उत्तरार्धात मराठीला स्थिरस्थावरता येऊन मराठ्याच्या अशा स्वतंत्र राजकारणास प्रारंभ झाला. तेराव्या शतकानंतर मराठीनें कानडीपासून पूर्णपणें अलग होऊन स्वतंत्र संसार माडला. पुढें या जुळ्या भावंडाच्या अतिप्राचीन एकाच कुळाची दोन निराळी घराणी झाली, आणि आज कधीकाळी याच्यात सोयरिक संबंध होते की नव्हते याची पुसट जाणीवसुद्धा पार विसरून जाण्याइतका फरक दिवसेदिवस पडत चालला आहे.



: ५ :

# भाषिक पुरावा

**पत्तिजन**–यदुतुर्वसु हे आर्येतर असल्यास त्याची संस्कृताहून निराळी अशी एक स्वतत्र भाषा असावी याबद्दल शका राहात नाही. वेदातील संस्कृत आणि कोल-मुंडा वर्गाच्या भाषेचे शब्द वगळले असता आणखी एका प्रकारचे शब्द राहातात असे भाषाशास्त्रज्ञानी ठरविले आहे. अशा शब्दाना "द्रविडवर्गीय" शब्द म्हणण्याची आजवर प्रथा आहे. पण द्रविड म्हणजे कोण आणि त्याना वेदकाळी काय नाव होते याचें निश्चयात्मक उत्तर अजून कोणाहि संशोधकाकडून मिळालेले नाहीं. पण आज पत्तिजन–यदुतुर्वसूंच्या या अभ्यासात द्राविड समस्येचा उलगडा होत आहे असे मला वाटते. द्रविड म्हणजे तमिळ एवढाच अर्थ होत असल्याने आणि वेदात द्रविड हा शब्द आढळत नसल्यानें निश्चितार्थ व्यक्त करण्याच्या दृष्टीने, केवळ तमिळजनवाचक संदिग्धार्थी व अनुचित असा द्रविड हा शब्द जितक्या लौकर उपयोगातून काढून टाकता येईल तितक्या लवकर तो काढणें अगत्याचें आहे. या द्राविड नामक वर्गात तमिळ, तेलगु, कानडी, मल्याळम् वगैरे सर्व भाषाचा समावेश केला जातो. या गटातील मूळ भाषेचे लोक कोण हा प्रश्न अद्याप निश्चितपणें सुटलेला नाही. वेदकाळीं या गटाच्या मूळभाषेचे कांहीं लोक होते एवढ्या तर्कावरच आज समाधान मानणें जरूर आहे. या लोकाचे निश्चित नांव आणि त्याची पुढील परंपरा वगैरेबद्दल काहीच कळत नाहीं. पण यापूर्वीच्या विवेचनावरून पाहता,

यदुतुर्वसु–पत्तिजन हेच आजपर्यंतचे तथाकथित " द्राविड " वर्गीय लोक होत असें म्हणावे लागतें आणि या लोकाची वेदकाळातील भाषा ही आजच्या कानडी, तमिळ, तेलगु वगैरे वर्गाच्या सर्व भाषाची मूळ भाषा होती असे ठरते.

वेदकाळी आर्यांचा संपर्क आणि संबंध जसजसा वाढत गेला तसतसा त्याच्या भाषेत फरक पडत गेला. दोन भिन्न भाषिकाचा संबध आला असता परस्परावर त्याचे परिणाम झाल्याशिवाय राहात नाहीत. त्याप्रमाणे संस्कृतावर या पत्तिजनाच्या भाषेचाहि काही परिणाम घडलेला आहे. " चंद्रमस् " हा जोड शब्द दोघाच्या घनिष्ठ संबंधाचे द्योतक आहे. चंद्र+मस् यांत एकाच अर्थाचे दोन शब्द आहेत. मस्–मास, Month, Mehn, Moon वगैरे शब्द आर्यवर्गीय भाषेमधील आहेत. तसेच चंद्र हा शब्द आर्येतर पत्तिजनाच्या भाषेतील आहे असे निश्चितपणे वाटते. यदुतुर्वसु घराणे चंद्रवंशीय आहे अशी प्रतीति आहे. याचा येथे काही संबंध नसला तरी यावरून चंद्रपूजेशी त्याचा निकट संबंध आहे हें सूचित होते. या घराण्यात चंद्राची पूजा फार पूर्व काळापासून चालत आलेली आहे. पौर्णिमापूजा, देवीचे उत्सव आजहि महाराष्ट्र–कर्णाट जनाचे वैशिष्ट्यनिदर्शक आहेत. चंद्र हा शब्द मुळात संस्कृत नाही. इंडो–जर्मानिक भाषातून त्याशी संबधित ( Cognates ) दुसरे शब्द मिळत नाहीत. ऋग्वेदात चंद्र ( Moon ) या अर्थी हा शब्द उपयोजिला नाहीं. तांबूस किंवा सोनेरी तांबूसपणा अशा वर्णनात्मक विशेषणाच्या रूपानें हा शब्द आलेला आहे. प्रा. वैजनाथ काशीनाथ राजवाडे याच्या मते चंद्र या शब्दाचा उच्चार ऋग्वेदकाळी आजच्याहून बराच निराळा होता. अग्निश्चंद्र, वसुश्चंद्र इत्यादि शब्दातून आढळणाऱ्या चंद्र शब्दातील 'च' काराचा उच्चार 'च' आणि 'श' याच्यामधील काही विशेष उच्चार असावा असा त्याचा तर्क आहे, आणि तो अगदी योग्य आहे असे वाटतें. इंग्रजीमधील 'C' चा उच्चार याच्याशीं तुलनीय आहे. 'C' मध्ये क, च, श, या तीनहि तऱ्हेचा उच्चार निरनिराळ्या शब्दात आपणास मिळतो. पत्तिजनाच्या मूळभाषेत 'चंद्र' यातील "च" काराचा उच्चार असाच काहीसा असावा असे वाटतें. तमिळमध्ये " चेन् " चा उच्चार "शेन्" असा होतो. कानडीमध्ये चेन् आणि केन् ही दोन्ही रूपें आढळतात. शेन्–चेन्–केन् याचा मूळ अर्थ तांबडा असा आहे. ऋग्वेदातील

चंद्र शब्दाचा अर्थ हाच आहे. यामुळें चंद्र शब्द मुळात शेन्–चेन्–केन् याच वर्गातून निष्पन्न झाला असावा असें वाटतें. हरिश्चंद्र, वसुश्चंद्र यात 'श' काराकडे झुकत असलेला उच्चार पुढे "च" काराकडे वळत गेला याला आर्यवर्गीयाचा संपर्कच कारण असावा. मृध्रवाचा म्हणजे अस्पष्ट उच्चाराचे असा टोमणा पूरु वगैरेंना मिळालेला आहे. दाक्षिणात्याचे उच्चार अस्पष्ट, अनिश्चित असतात अशी संस्कृतात फार प्राचीन काळापासून म्हण आहे. मृच्छकटिकात त्याचा पडसाद ऐकू येतो. आर्यवर्गीय भाषेच्या प्रभावांत आलेल्या कानडींत 'श' कार युक्त 'च' काराचा अनिश्चित उच्चार बराच नष्ट होऊन केवळ 'च' कारच राहिलेला आहे. तमिळमध्यें मात्र कानडींतील 'चेन' चा उच्चार अजून दोनहि तऱ्हेने केला जातो. आर्यांच्या संपर्काने पत्तिजनाच्या भाषेत जसा फरक पडत गेला, तसाच आर्यांच्या भाषेवरहि पत्तिजनाच्या भाषेचा काहींसा तरी परिणाम झाल्याशिवाय राहिला नाही. संस्कृतीकरणापासून चंद्र, अरणी वगैरेंसारखे शब्द आर्यांच्या भाषेत शिरले. प्राचीन कानडीत 'प' काराचा 'ह' कार झाल्याचे कारण आर्यांचा संपर्क होय हें यापूर्वीच सागितलें आहे. अशा प्रकारें आर्यजनाच्या संपर्कानें पत्तिजनाच्या मूळ भार्षेत बराच फरक पडूं लागून मूळ भाषेचें स्वरूप बदलूं लागलें.

## कानडी आणि महाराष्ट्रीयांचा घनिष्ठ संबंध

दोन भिन्न भाषिकाचे व्यापारव्यवहाराचे संबंध जसजसे वाढत जातील तसतसा त्यातून काहीं मध्यस्थाचा एक द्विभाषिक वर्ग निर्माण होतो. ज्ञात असलेल्या दोन भाषात राजकीय, सामाजिक, किंवा धार्मिक वर्चस्व असलेल्या भाषेचा वरपगडा होतो आणि दुसरी भाषा खालीं दबली जाते. परभाषा आत्मसात् करतेवेळीं मूळ भाषेंतील, ज्याना एका अर्थानें विकृत म्हणता येणार नाहीं, (कारण ते मुद्दाम वेडावण्यासाठी केलेले नसतात.) पण ज्याना व्याकरण दृष्ट्या विकृत म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं असे काहीं शब्द प्रचारात येऊं लागतात.

पत्तिजन वेदकाळानंतर 'हट्टिजन' झाले, या हट्टिकार–हटगार मधूनच मरहट्टे यांच्या एका गटाने वर उचल खाल्ली. या मरहट्टे यांचीच भाषा 'माहाराष्ट्री' (प्राकृत) होय.

पत्तिजनाच्या आर्यीकरणाबरोबरच त्यांच्या भाषेच्या आर्यीकरणासहि आरंभ झाला. पत्तींच्या भाषेंत संस्कृत शब्द जास्त जास्त डोकावूं लागले. पण संस्कृतातील संयुक्ताक्षरें आणि श, ष, स वगैरेंचे उच्चार त्याना जमेनात; यामुळें संस्कृत शब्दाना, आपलें रूप बदलून, पत्तिजनाच्या उच्चारपद्धतीला अनुरूप होईल असे स्वरूप धारण करावे लागलें, आणि त्याच्या भाषेंत त्या शब्दानी तशा स्वरूपातच स्थान मिळविलें. कानडी भाषेंतील तद्भव प्रकरणाचा अभ्यास केला असता या विधानाची सत्यता कोणासहि पटेल.

पत्तिजनाच्या भाषेंत मुळात कोणतीं स्वर-व्यंजने होतीं, त्याची वर्णमाला कशा प्रकारची असावी, याची बरीचशी अटकळ आजच्या तमिळ वर्णमालेवरून करितां येण्याजोगी आहे. तमिळमध्यें, वर्गीयाक्षरातील पहिलें आणि शेवटचें अशीं दोनच अक्षरें आढळतात. क, ञ; च, ङ, ट, ण, त, न, प, म. संस्कृताशी संबंध आल्यानंतर पत्तिजनाच्या भाषेंत संस्कृतवर्णमालेंतील सर्व उच्चार क्रमाक्रमानें रूढ झाले आणि संस्कृत शब्द जसेच्या तसे उच्चारणें सोपें होत गेलें.

हे सर्व बदल होण्यास हजारो वर्षांचा कालावधि लागलेला आहे. या दरम्यानच्या अवस्थेंत भाषा–मिश्रणाचे पुष्कळ प्रकारचे प्रयोग होऊन गेले असावेत. अशा प्रयोगातूनच आज उपलब्ध प्राकृत भाषा निर्माण झालेल्या आहेत. दोन भिन्न भाषाच्या संपर्कात धार्मिक, सामाजिक, राजकीय महत्त्व प्राप्त झालेली भाषा अन्यभाषिकाकडून आस्थेनें अभ्यासली जाते. शक्य तो मुळातील उच्चारास अनुसरूनच श्रेष्ठ गणल्या गेलेल्या परभाषेतील शब्द उच्चारण्याचा प्रयत्न केला जातो. आरंभी हा प्रयत्न सिद्धीस जात नाहीं; तथापि काहीं काळानंतर मूळ उच्चारानुकरण शक्य होतें. कानडीत ‘ कार्य ’ या शब्दाचे “ कारिय ” आणि ‘ कज्ज ’ असे दोन तद्भव आहेत. आर्य याचेहि असेच दोन उच्चार आहेत. ‘ आरिय ’ आणि ‘ अज्ज ’, कारिय, आरिय या पहिल्या प्रकारच्या उच्चारात कार्य, आर्य अशीं संस्कृतातील संयुक्ताक्षरें उच्चारण्यास जड जात असल्यामुळें, त्याच्या सुलभीकरणाकडे असलेला कल स्पष्ट दिसतो. पण ‘ कज्ज ’ व ‘ अज्ज ’ वगैरेंत सुलभीकरणापेक्षा प्रौढीकरणाकडेच प्रवृत्ति असलेली दिसून येते. तमिळमध्यें शिरलेल्या संस्कृत शब्दांना सोपें रूप देण्याकडे त्या लोकांची जास्त प्रवृत्ति दिसते. अग्नि याचा तद्भव तमिळमध्यें ‘ अक्किनी ’ होतो

तर प्राकृताप्रमाणे कानडीत "अग्गि" असा शब्द रूढ आहे. "अगिनी" हें रूपहि क्वचित् आढळतें. पण 'अग्गि' यालाच साहित्यात व व्यवहारात जास्त प्राधान्य मिळालेलें दिसतें.

जोंपर्यंत कानडीत संस्कृतासारखी वर्णमाला सिद्ध झालेली नव्हती, तोंपर्यंत संस्कृत शब्द कानडींत मूळ स्वरूपात प्रवेश करूं शकत नव्हते. प्रारंभीं 'आरिय' 'अगिनी' सारखी सोपी रूपें, तमिळप्रमाणें कानडीतहि रूढ झाली असावींत. पण तो काळ लवकरच मागे पडून संस्कृतचीं प्राकृत रूपेच कानडींत प्रामुख्यानें प्रचारात येऊं लागली. कानडीचें तद्भव प्रकरण म्हणजे प्राकृत भाषेचें एक छोटें व्याकरणच होय. पुढें संस्कृताप्रमाणेंच कानडीची वर्णमाला पूर्णपणें बनल्यानंतर तद्भवाची आवश्यकताहि दिवसेंदिवस कमी होऊं लागली आणि त्याचेऐवजी संस्कृत शब्दच कानडी बोलीत आणि साहित्यात जसेच्या तसे वावरूं लागले. 'अग्गि' 'कज्ज' 'दिट्टि' 'गब्ब' वगैरे प्रकारचे तद्भव शब्द मागे पडून 'अग्नि' 'कार्य' 'दृष्टि' 'गर्भ' वगैरे शुद्ध रूपेंच व्यवहारात उपयोजिली जाऊं लागलीं.

परकीय भाषेतील उच्चाराचें जसेच्या तसें अनुकरण करण्यात कर्णाटकीय साऱ्या हिंदुस्थानात प्रसिद्ध आहेत. संस्कृत शब्दाच्या शुद्ध उच्चाराविषयी महाराष्ट्रीय कर्णाटकीयाना हार जाणार नाहीत हें खरे असले तरी इंग्लिश व इतर परभाषेच्या उच्चाराविषयी महाराष्ट्रीय तितकीशी आस्था बाळगीत नाहीत अशी आज सर्वत्र समजूत आहे. सामूहिक अभिमान–स्वदेश किंवा स्वजन याचा अभिमान–जास्त असलेले लोक परभाषेविषयीं तितकी आस्था बाळगीत नसतात. सामूहिक अभिमानापेक्षा वैयक्तिक प्रतिष्ठेची दृष्टिच जेथे प्रभावी असते तेथे परकीय भाषेचा अभ्यास मोठ्या आस्थेनें होत असतो, असें मत भाषा व संस्कृतीचे विख्यात अभ्यासू व्होस्लेर यानी आपल्या ग्रंथात माडलें आहे. त्यात बराच तथ्यांश आहे. दृट्टिकारात अशा प्रकारची व्यक्तिनिष्ठ मनोवृत्ति असलेल्या गटाच्या भाषेंत आधी प्राकृतातल्या आणि नंतर संस्कृतातल्या शब्दाचा भरणा जास्त होत गेला. पुढील आर्यीकरणात आपल्या (नवीन) प्राकृतमय भाषेविषयी सामूहिक अभिमान असणाऱ्याचाच एक निराळा गट निर्माण झाला आणि तोच महाराष्ट्रीय प्राकृतास कारण झालेला मरहट्टे याचा होय. बाकी जे राहिले

त्याचा गट म्हणजे कानडी हट्टीकाराचा, कानडी भाषेच्या आरंभिकाचा होय. कानडीत संस्कृत आणि प्राकृत शब्दाचा भरणा शेकडा ५०-६० टक्क्याहूनहि जास्त कसा याचा उलगडा याहून दुसऱ्या रीतीनें होणें शक्य नाही. सामाजिक व राजकीय प्रतिष्ठेस कारण होणारी दुसरी भाषा **जशीच्या तशी** आत्मसात् करण्याची प्रवृत्ति आजहि दुसऱ्या कोणत्याहि प्रातापेक्षा कर्णाटकात जास्त आहे. आपल्या भाषेत नसलेले इंग्लिशमधील काही उच्चार कानडीतही करता यावेत म्हणून काही नवीन अक्षरें बनविण्याचा प्रयत्न बेंगळूरच्या काही विद्वानानी केला आहे. हिंदीमध्ये येणाऱ्या उर्दूतील 'क'चे एकापेक्षा जास्त उच्चार आहेत आणि ते कानडीत जसेच्या तसे लिहून दाखविण्याचा प्रयत्न आज कर्णाटकात काही मंडळी करूं इच्छित आहेत. ही सर्व उदाहरणे सुशिक्षित कानडी वर्गात परभाषेविषयी अभावितपणें आढळून येणाऱ्या आस्थेचीं निदर्शक होत..

परभाषेविषयी आसक्ति व आपुलकी वाढत जाईल तसा स्वभाषेविषयींचा आदर व अभिमान कमी होऊन आपल्या भाषेच्या हेळसाडीस आरंभ होतो. स्वभाषेतील शब्दाचे उच्चार व लकबी वगैरे, आसक्तीनें आत्मसात् करीत असलेल्या नव्या भाषेच्या वळणावर जातात. उत्तर कर्णाटकातील कानडी उच्चार-पद्धति व भाषाशैली इतर भागाहून निराळी होण्यास हेंच मुख्य कारण आहे. सागली, सोलापूर भागातील कानडी भाषेत हाला (दूध), मसरा (दही), याका (एके), याना (येनु) अशाप्रकारचे बरेच शब्द आकारान्त झालेले ऐकावयास मिळतील. याच प्रवृत्तीची पुढील पायरी म्हणजे दुसरी भाषाच पूर्णपणें आपली बनवून घेणें.

### 'हे आम्हांसी कानडे'

प्राकृत भाषेत पुष्कळ "देशी" शब्द आहेत असे हेमचंद्रादि तज्ज्ञानीं ठरविलें आहे. "देशी" याचा अर्थ सस्कृताशी संबंध नसलेल्या या देशातील दुसऱ्या भाषा असाच करणे जरूर आहे. कारण 'देशी' गणलेल्या शब्दाची व्युत्पत्ति संस्कृत शब्दानीं दाखविणे शक्य होत नाही. मेघदूत (पूर्व मेघ ४९) काव्यात 'हाला' शब्द आल्याचे मागे सागितलेंच आहे. "अभिप्रयुक्त-देशभाषापदमित्यत्र सूत्रे हालेति देशभाषापदमप्यतीव कविप्रयोगात्साधु" असें वामन नामक पंडिताचें वाक्य, मल्लिनाथ मेघदूतावरील आपल्या

टीकेंत देतो. 'हाला' शब्दाची व्युत्पत्ति देशीय पाळ् (प्राचीन कानडी) शब्दापासून झाली. संस्कृतमध्यें या शब्दाची व्युत्पत्ति लागत नाहीं. प्राचीन पत्ति भाषेंतील पाळ् हा शब्द संस्कृत भाषिकाच्या संपर्कानें 'हालु' असा परिवर्तित होऊन कानडीत आज व्यवहारात आहे. हा 'हालु' शब्दच संस्कृतात 'हाला' या रूपांत शिरला असें म्हणावें लागतें. हालु हा शब्द कानडीमध्येच असून तमिळ तेलगूमध्यें दूध या अर्थी हा शब्द 'ह' कार युक्त नाही. जुना 'प' कार युक्त "पाळ्" हा शब्दच त्या भाषेंत अजूनहि रूढ आहे. यावरून संस्कृतात शिरलेल्या 'हाला' शब्दास पत्तीतून आर्यीकरण पावलेला 'हट्टि' कार वर्गच कारण झाला असावा असें म्हणणें क्रमप्राप्त होतें. याचप्रमाणें प्राचीनकाळीं संस्कृतमध्ये शिरलेल्या इतर बऱ्याच देशी शब्दाना आधी हट्टि-कारच (कानडीजन) कारण असावेत असें म्हणण्यास हरकत दिसत नाही.

गंगायमुनातीरीं बनत चाललेल्या प्राकृताचा उगम कशा रीतीने झाला असावा याची काहींशी कल्पना वरील विवेचनावरून येण्यासारखी आहे. प्राकृताला 'माहाराष्ट्री' असे जे एक नाव मिळालें तें राष्ट्रावरून नसून 'मरहट्ट' या लोकावरून आहे. आधीं राष्ट्र बनून नंतर त्या राष्ट्रांतील भाषा निर्माण झाली असे दर्शविणारा एकहि ऐतिहासिक पुरावा मिळत नाहीं. ती भाषा बोलणाऱ्या जनावरूनच हें नाव या भाषेला प्राप्त झालें असावें; 'माहाराष्ट्री' प्राकृत हें नाव वररुचीच्या काळाइतके प्राचीन असून त्या नावाच्या राष्ट्राचा मात्र कुठेंहि मागमूस नसावा हें आश्चर्य नव्हे काय ? 'माहाराष्ट्री' प्राकृतास 'मरहट्टे' जन कारण होत याबद्दल शंका नाहीं. यामुळें या प्राकृताशीं त्याच्या आरंभापासून कानडीचा निकट संबंध होता हें सिद्ध करण्याची आता जरूरी राहात नाहीं. संस्कृताच्या परिणामानें पत्तिजनांच्या जुन्या भाषेंत फरक पडूं लागला, तेव्हापासूनच कानडीच्या उगमाला प्रारंभ होतो. शेद्र (श्वंद्र), पत्ति, (हट्टि), वगैरे शब्दांच्या उच्चारांत फरक पडून नव्या भाषेच्या निर्मितीस आरंभ होतो. त्याला स्पष्ट पूर्ण भाषेचें असें स्वरूप येण्यास बराच कालावधि लागला असावा यांत शंका नाहीं; आणि या मधल्या काळांत संस्कृतांतील पुष्कळ शब्द पत्तिजनाच्या भाषेंत शिरत शिरत तद्भव व तत्सम शब्दांची संख्या वाढत जाऊन पुढें तेच या नवभाषा–निर्मितीस कारण झाले असावेत.

यादवाच्या वसतिस्थानाविषयीं स्पष्ट कल्पना आल्याशिवाय प्राकृत—माहाराष्ट्री प्राकृताच्या निर्मितीची व वाढीची चागली कल्पना येणें शक्य नाही. गंगायमुनातीरीं यादवाच्या वसाहती होत्या. त्या त्यांच्या 'हाटा'तून (घोष—पल्ली) प्राकृत भाषेनें बाळसें धरलें असें सामान्यपणें सागितलें जातें. पण महाभारतकाळींच यादवाच्या निरनिराळ्या शाखा द्वारका, विदर्भापर्यंत पसरून स्थायिक झाल्या होत्या असे अनेक पुराव्यावरून निश्चितपणें कळते. कालयवनादि शत्रूचा त्रास चुकविण्याकरिता श्रीकृष्ण द्वारकेत येऊन स्थिर होतो. सुरक्षिततेकरिता आश्रयास जाणारे, अगदी अपरिचित स्थळीं जाणें शक्य नाही. वेळप्रसंगी आपल्या नात्याची जवळची मंडळी पाठिंब्यास आहेत अशा प्रकारच्या सर्वतोपरी परिचित किंवा जेथें विश्रब्धतेनें राहाणे शक्य आहे अशाच स्थळीं शत्रूचा मारा चुकविण्याकरिता कोणीहि जाईल. या दृष्टीनें विचार केला असता श्रीकृष्णाने सौराष्ट्र—द्वारका पसंत केल्याचे कारण काय हें चागले ध्यानात येण्याजोगें आहे. लाट, सौराष्ट्र देश म्हणजे नाट (नाडव) राष्ट्रिकाचें माहेरघर—या प्रदेशास मिळालेलीं नावें हेंच याचे प्रत्यंतर आहे. नाट राष्ट्रिक हे भोजक यादवाचे संबंधी ही गोष्ट ऐतिहासिक काळातील रिस्टिक भोजकादि उल्लेखावरूनहि सिद्ध होत आहे. भोजक हे विदर्भाचे जन. यावरून गंगा—यमुना ते द्वारका—विदर्भापर्यंतचा प्रदेश, हे हट्ट जन व्यापून होते असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं अशा या प्रमुख जनाची बोली (प्राकृत) त्याच्या वर्चस्वाबरोबर देशात सर्वत्र लवकरच प्रसृत होऊं लागली.

हिमालय प्रदेशात 'हाटक' नावाचा देश होता असा महाभारतातील एक उल्लेख मागें आलाच आहे. बंगालच्या एका भागाला गौड देश असें नांव असलेलें आढळतें. गौड देश असें नांव या देशाला का पडलें असावें हें विचार करण्याजोगें आहे. संगीतात गौळ नावाचा एक राग आहे. देशाच्या नांवाचे कानडा, सौराष्ट्र, अरबी वगैरे जसे राग आहेत तसा गौळ हा देशावरून नांव मिळालेला एक राग आहे. गौड, गौळ अशा दोन प्रकारांत हा शब्द रूढ आहे. प्राचीन काळीं गौळजनांच्या वसाहतीवरून त्या प्रांताला हें नांव मिळालें असण्याचा संभव आहे. गोपाल-गोवळ-गौळ हा शब्द हट्टि-हट्टिकार याचा संस्कृतोत्पन्न पर्यायशब्द आहे. बंगालमध्यें वसाहत केलेले हे गौळ (जन) पत्तिजनांची एक शाखा असावी असें म्हणावें लागतें. याला बंगालच्या भाषा व

इतिहासांत पुष्कळ बलवत्तर पुरावा मिळतो. "मागधी अपभ्रंश भाषेनें बंगाल्यात त्याहि पूर्वी असलेल्या द्राविडी, कोल आणि मॉखमेर, तिबेटोब्रमेन या भाषा मागें टाकून त्या जागीं आपले वर्चस्व वाढविले. बंगाली भाषेतील उच्चारपद्धति, शब्दरचना, वाक्यपद्धति व शब्दसंग्रह वगैरेंशी द्राविडीचा आजहि घनिष्ठ संबंध असल्याच्या अचूक खुणा दाखविता येतात. तथापि हे साम्य फक्त बंगाली भाषेशीच आहे असें नसून उत्तरेकडील इतर आर्य-हिंदी भाषातूनहि हाच प्रकार आढळतो असे डॉ. सुनीतिकुमार आपल्या 'बंगाली भाषेचा उद्‌गम व विकास' या पुस्तकात लिहितात.

गौड असें एकेकाळी काही भागास नाव असलेल्या या बंगालकडील, बंगाली भाषा व रीति याच्यावर दूरगामी परिणाम करणारे असे हे द्रविड म्हणजे कोण हे तमिळ, का तेलगु, का कर्णाटकी किंवा या शाखेचे दुसरे कोणी लोक ? याचा निश्चित निर्वाळा कुठल्याहि संशोधनात अजून पुढे आला नाही. पण ही संदिग्धता अजून किती दिवस चालू राहावयाची ?

गौहट्टी, बारहट्ट, नयहट्टि वगैरे या भागातील 'हट्टया' पाहिल्यास— या ग्रामनामाची दखल घेतल्यास हे द्रविड कोण ते कळण्यासारखे आहे. या भागातील ग्रामनामाच्या शेवटी, अनेक ठिकाणी आढळणारा 'पारा' हा शब्द लक्षात घेता 'प'काराचा 'ह'कार होण्याच्या पूर्वीपासूनच पत्तिजनाची वसाहत या भागात होण्यास आरंभ झाला होता असें म्हणावें लागतें. 'ह'कारयुक्त हट्टी वगैरे रूपातरे, ही पुढील काळातील हट्टिकाराच्या प्रभावाची द्योतक आहेत. हे हट्टिकार म्हणजे कर्णाट-महाराष्ट्रीयाचे पूर्वज होत. बंगालमध्ये १०७० पासून ११९९ पर्यंत सेन नावाचें घराणें राज्य करीत होते. या घराण्याच्या ताम्रपटातून ते आपणास "ब्रह्म-क्षत्रिय", "कर्णाटक-क्षत्रिय" असे विशेषण लावून घेत असे आढळतें (Vincent Smith, Early History of India, p. 434–35). या वशात बल्लाळ नावाचे राजे झाले. बल्लाळु शब्दाला पराक्रमी पुरुष असा कानडीत अर्थ आहे. बल्लाळपूर नावाचे एक गाव बगालच्या या भागात होतें; ते नाव पुढें 'विक्रमपूर' असे बदलल्याचें ऐतिहासिक कागदपत्रांवरून दिसून येते. 'बल्लाळपूर' चे विक्रमपूर हें उघड उघड भाषातर आहे. या भागांत 'ऊरा',

'पल्लि' वगैरे शब्द असलेलीं ग्रामनामें आढळतात. मिथिला (बिहार) येथें होऊन गेलेला नान्यदेव, आपणास 'कर्णाटक–कुल' क्षत्रिय म्हणवितो. ('नान्य certanily was a Karnatak King of Mithila & contemporary with Vijayasen' V Smith) या नान्यदेवाचे वंशज नेपाळमध्यें काही काळ राज्य करीत होते असे त्या देशाच्या इतिहासावरून उघडकीस आलें आहे. या सर्व गोष्टी लक्षात घेता, या गौड देशात आपल्या भाषा व चालीरीतीचा सुस्पष्ट ठसा उमटविणारे या हट्टिकारशिवाय दुसरे कोण असणार?

गौळ शब्द गौड झाला हे गृहीत धरण्यात 'ळ'काराचा 'ड'कार झाला असे म्हणावें लागतें. 'ड'काराचा 'ळ'कार झालेला सर्वत्र दिसतो. पण 'ळ'काराचा 'ड'कार क्वचितच झालेला आढळतो. तरी पण अशी उदाहरणे नाहीत असे नाही. तमिळपासून द्रविड शब्द झाला असें आज गृहीत धरलें जातें. तमिळ-दमिळ-द्रमिड-द्रविड, या ठिकाणीं 'ळ'कारापासूनच 'ड'कार झाला असें स्वीकारणें भाग आहे. गौड आणि गौळ अशा दोनहि प्रकारें एकच नाव उच्चारलेले आजहि आपणास ऐकावयास मिळते. चद्र, अरणि, मटची सारखे शब्द ज्या भाषेतून वैदिक वाङ्मयात आले ती भाषा बोलणारे लोक त्यावेळीं उत्तरापथात-पंचनद देशात होते हें निराळें सिद्ध करावयास नको. यजुर्वेदातील पत्ति, ऋग्वेदातील यदु-तुर्वसु हे आर्येतर असून वरील प्रकारच्या चंद्रवर्गाच्या संस्कृतेतर शब्दाना तेच कारण होत.

उत्तर हिंदुस्थानात हट्टीकारांची वसाहत एके काळी होती हें जरी खरें असले तरी आर्यीकरणात ते पूर्णपणे हतप्रभ झाले. पण नर्मदेच्या दक्षिणेस त्यानी आपलें वैशिष्ट्य राखून आजवर आपला प्रभाव कायम ठेवला आहे. याच कारणास्तव या प्रदेशास पंचद्राविड देश असे म्हणण्याचा प्रघात आहे. मरहट्टे हा हट्टीकारातील एक छोटासा विभाग होय. नर्मदा ते कावेरी या भागात हट्टीकाराची वसाहतसूचक ग्रामनामे पुष्कळच आहेत. नीलगिरी ओलाडून कोईमत्तूर–सेलम्–(शाल्यम्) जिल्ह्यापर्यंत हट्टि (ग्रामे) आढळतात. हट्टि हा शब्द तमिळमध्यें मिळत नाहीं. दक्षिणेंत जेथपर्यंत हट्टि (ग्रामें) आहेत तेथपर्यंत हट्टि यांचें वर्चस्व होतें किंवा तो प्रदेश त्याच्या कक्षेंत होता हे

निश्चित ठरते. दक्षिणेस हट्टिग्रामें असलेल्या प्रदेशात आज जरी तमिळ भाषा चालत असली तरी त्याकाळी ती नव्हती. नर्मदेच्या दक्षिणेस व पूर्वेसहि जेथपर्यंत हट्टि ( ग्रामें ) आहेत तेथपर्यंत हट्टिकाराचा विस्तार होता हे निश्चित आहे. आज ज्याला कर्नूल म्हणतात तो कण्णनूर जिल्हा या हट्टिकाराच्या पूर्णशः प्रभावाखाली होता. श्रीशैलाच्या भोवतालच्या प्रदेशाला 'कण्ण विषय', 'कर्णाट + विषय' अशी नावे असल्याचे ताम्रपटावरून कळते. या भागास 'कर्णाट सीमा' असे नाव असल्याचें डॉ एन्. वेंकटरमणय्या यानी आपल्या लेखात नमूद केले आहे (Andhra Historical Journal Vol 10-p 95)

प्राकृतभाषा पत्तिजनाच्या गोष्ठात उदय पावली तरी सुसंस्कृत साहित्यिकाच्या साहाय्यानेच पुढे ती चागले बाळसें धरून वृद्धिंगत होऊं लागली. जैन व बौद्ध मतप्रसारकानी या भाषाना आधी जवळ केलें संस्कृत भाषा व साहित्य याच्या बाहेर पाहाण्यास तयार नसलेला ब्राह्मणवर्ग दिवसेदिवस सभोंवतालच्या समाजापासून दूर दूर होऊं लागला. यामुळे समाजातील आपल्या स्थानमानास धक्का बसत आहे हा कटु अनुभव येताच हा वर्ग खडबडून जागा होऊन प्राकृताकडे आपुलकीने पाहाण्यास तयार झाला.

प्राकृतात अशा प्रकारचे दोन स्थूल प्रवाह दिसतातहि. जैन, बौद्धानी पोसलेली भाषा निराळी, तर वैदिक किंवा हिंदु मतानुयायी यानीं प्रचारात आणलेली प्राकृत भाषा निराळी बौद्ध व जैन साहित्य विशेषतः पाली-अर्धमागधी भाषेत आहे तर वैदिक परपरेतील विद्वानानी रचिलेले ग्रंथ माहाराष्ट्रीत विपुल मिळतील.

पंचनद देशातून वैदिक संस्कृतीचे केंद्र हालल्यानंतर तें विदर्भ देशातच बहुतकाळपर्यंत प्रकर्षाने स्थिर झालेले दिसते. त्यानंतर तें केंद्र काची, ( काही काळ कल्याण व नंतर ) विजयनगरकडे झुकलें. मुसलमानाच्या तावडीतून हिंदु संस्कृतीचें संरक्षण केल्याचे श्रेय जसे विजयनगरास आहे तसें दक्षिणापथात जैन मताच्या प्रसारास टक्कर देण्याचें कार्य विदर्भ–महाराष्ट्रानेच केलें. विदर्भीय विद्वानानीं आधी माहाराष्ट्रीस, नंतर मऱ्हाटीस उचलून धरून वैदिक–हिंदु धर्माचें अस्तित्व कायम राखलें. मरहट्टाचें–विदर्भ–महाराष्ट्र–मराठी झाले. या स्थित्यंतरात हा सर्व इतिहास सामावलेला आहे.

मरहट्टाच्या आर्यीकरणास आरंभ झाल्यावर देशनामाचें पहिले रूपांतर विदर्भ असें झाले. विदर्भ हे राजाचें नाव असे हरिवंशात नमूद आहे. पण ते मऱ्हाटचें संस्कृतीकरण होऊन 'महाराष्ट्र' हा शब्द बनण्यापूर्वीचे, मध्यंतरकालीन एक रूप आहे. वऱ्हाटचें विदर्भ असे स्थित्यंतर झाले असणेंहि असंभवनीय नाही. महाभारतादि प्राचीन ग्रंथातून वऱ्हाटचा विदर्भ असाच उल्लेख येतो. या प्रदेशाचा विदर्भ असा उल्लेख असला तरी जनाचे नाव महाराष्ट्रीय असें आधी रूढ झालें असले पाहिजे. पण पहिल्या रूढीला मागे टाकून दुसरे देशवाचक नाव साहित्यात चालू होण्यास आणखी काहीं काळ लागला असल्यास नवल नाही. वऱ्हाट–विदर्भाशिवाय कोठेहि महाराष्ट्राची बैठक दिसत नाही. "महाराष्ट्रीय" मरहट्टे हे संपूर्णपणे वैदिक किंवा हिंदु संस्कृतीच्या कक्षेत आले होते. आणि त्याच्या पाठिंब्याने ब्राह्मणानी कर्णाटातून जैन धर्मास मागे हटविले व महाराष्ट्राची मर्यादा वाढविली. सर्वत्र हिंदूतील विद्वानानी याच आपुलकीने माहाराष्ट्री ( प्राकृता )ची जोपासना केली. रसाळ ग्रंथसंपत्तीची भर पडून ही भाषा अखिल भारतात सन्मान पावली. पुढे मराठी सुद्धा, कर्णाटकात या प्रकारच्या भावनाची पार्श्वभूमि मिळाल्यानेच झपाट्याने वाढत गेली.

वऱ्हाट हे मरहट्ट्याचे मूलस्थान ( प्रथममहाराष्ट्र ) होय. मरहट्टे हे पूर्णपणे आर्यांच्या प्रभावात विरून गेले तसे, ते 'आरिय' बनले आणि आर्यांचा. प्रभाव मरहट्टाच्या बाहेर ( वऱ्हाट ) जसजसा जास्त वाढूं लागला तसतसा आरिय जनाचा विस्तारहि मोठा होत गेला. मरहट्टाचे संस्कृतीकरण होऊन महाराष्ट्र असें नाव घुणाक्षर न्यायाने जरी पुढे आले तरी क्रमाने ते नाव सार्थ होऊं लागले! कर्णाट–हे नाव 'कण्ण' जनावरून आले हे निश्चित असले तरी एका अर्वाचीन कवीने अभावितपणे तर्काने सुचविलेली पुढील व्युत्पत्ति बरीच खरी ठरली आहे. "कर्णे अटति"– कानास ऐकू येते, म्हणजे सुप्रसिद्ध आहे ( पण डोळ्याना दिसत नाही म्हणजे प्रत्यक्षात नाही ) अशा अर्थानें त्या कवीने लावलेली व्युत्पत्ति निराळ्या अर्थाने ( कर्णाट क्षीण होऊन ) खरी ठरण्यासारखी परिस्थिति यावी हें अजब होय!

बाराव्या शतकापर्यंतचा कर्णाट–महाराष्ट्र संबंध नीट लक्षात येण्यास आजची या दोन्ही प्रांतातील तेढ बरीच आडवी येत आहे. बाराव्या शतकापूर्वी

संस्कृत भाषेविषयीं तर राहोच, प्राकृत किंवा मराठी भाषेविषयींसुद्धा कर्णाटकांत कोणत्याहि प्रकारचा दुजाभाव नव्हता. इतकेंच नव्हे तर या भाषा शिकणें आवश्यक असे समजलें जात असे. जुने कानडी महाकवि स्वतःस " उभय–भाषाविशारद " असे मोठ्या अभिमानानें म्हणवितात. कानडी भाषा आर्यभाषा–वर्गातीलच आहे अशी प्राचीन कानडी ग्रंथकाराची समजूत होती. " संस्कृतं प्राकृतं अपभ्रंशं पैशाचिक एंब मुरुवरे भाषे गळोळ् पट्टुव " संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश आणि पैशाची अशा साडेतीन भाषापासून झालेली ( कानडी ) भाषा असें दहाव्या शतकातील नागवर्मा नामक छंदःशास्त्रज्ञ लिहितो. नागवर्माची ही समजूत त्याच्याहि बऱ्याच पूर्वीपासून रूढ झालेली असावी. बादामी चालुक्य, विजयादित्य याच्या एका ताम्रपटात ( खि. श. ६९९ ) कानडीला प्राकृत भाषा म्हटलेले दिसून येतें. " अतःपरं प्राकृतभाषया वर्णान्येतानि दत्तानि " असें लिहून पुढें दान दिलेल्या प्रदेशाच्या सीमा कानडींतून दिलेल्या आहेत. कानडीलाच प्राकृत भाषा म्हणण्याची पद्धत कर्णाटकात सोळाव्या, सतराव्या शतकापर्यंतहि आढळते. आडय्य नामक कवीनें ( खि. श. १२३५ आपण अस्सल कानडीतच काव्य रचणार असा विडा उचलून ) " कब्बिगर काव " नावाचें काव्य रचले. पण हे काव्य प्राकृत पदभूयिष्ठ असल्याचे आपण पाहतो. याप्रमाणें प्राकृताविषयी कर्णाटकीयाची इतकी आपुलकी होती कीं, ही परकीय भाषा आहे असे त्याच्या स्वप्नींहि आलें नाही. प्राकृताविषयीं जी आपुलकी तीच पुढें बऱ्याच काळपर्यंत मराठीविषयी होती. कारण त्या काळी भाषा हा राजकारणाचा किंवा प्रातीयतेचा विषय नव्हता. धार्मिक व साहित्यिक आनंदाचे तें एक साधन होते. विचार–वाहनाचें साधन या एकाच दृष्टीनें त्या काळीं कानडी लोक या संस्कृत आणि प्राकृत भाषाकडे आपुलकीनें पाहात असत.

कानडी ही प्राकृतोद्भव भाषा अशी कर्णाटकी विद्वानाची ठाम समजूत झाल्यानें त्या भाषेत संस्कृत आणि प्राकृत शब्दाची रेलचेल होण्यास कोणतीच आडकाठी राहिली नाहीं. कानडी व्याकरणप्रक्रिया संस्कृत भाषेसारखीच बनली. कार, गार, वंत, वळ ( पाल–वाल–वाळ–वळ ) वगैरे प्रत्यय संस्कृतापासून कानडींत घेतलेले आहेत. मारामारी, हाणाहाणीसारखे समास कानडींत रूढ करण्याचा प्रयत्न परवापर्यंतहि झाला. पण तो कानडी बोलीशीं 'विसंगत

ठरल्यामुळे आज मागेंच पडला आहे. वाक्यातील क्रियाप्रत्यय आणि नाम-विभक्तिप्रत्यय वगळले तर सबंध वाक्यें संस्कृत प्राकृत शब्दानीं भरलेलीं कानडी प्रौढ कवींच्या काव्यातून पदोपदीं आढळतील.

यामुळे कानडी भाषेंत बाराव्या–तेराव्या शतकापर्यंत प्राकृत अशा समजुतीनें रूढ केलेले शब्द पर्यायानें मराठी भाषेच्या पूर्वसिद्धीसच कारण झाले. आधुनिक मराठीचीं प्राथमिक रूपें मराठी साहित्यात आढळलीं पाहिजेत. पण ती आजहि कानडी बोलीत व साहित्यात विखुरलेलीं आहेत. मराठींतील, तेल, पीठ, गाभ(ण) वगैरे शब्द मूळ संस्कृत असून मराठींत येण्याच्या पूर्वी त्याची प्राकृतमधील मध्यम अवस्था उच्चारशास्त्राच्या दृष्टीनें आवश्यक ठरते.

| १ | २ | ३ |
|---|---|---|
| **संस्कृत** | **प्राकृत** | **मऱ्हाटी** |
| तैल | तेल्ल | तेल |
| पिष्ठ | पिट्ठ | पीठ |
| गर्भ | गब्भ | गाभ |
| कर्पट | कप्पड | कापड वगैरे..... |

त्यातील तिसरा प्रकार मराठींत रूढ असून मधली रूपें जुन्या मराठी साहित्यातदेखील विशेष आढळत नाहींत. पण ते शब्द नित्य व्यवहारांतील कानडी बोलींत आजहि रूढ आहेत. ज्ञानेश्वरी वगैरे जुन्या ग्रंथातून आढळणारीं नीच, चोख, आगळ, सान, दिठी, जेठी, साद, वगैरे शब्दाचीं पूर्वरूपें कानडी बोलींत आजहि जिवंत आहेत.

| **मऱ्हाटी** | **कानडी** | **संस्कृत** |
|---|---|---|
| नीच | निच्च | नित्य |
| चोख | चोक्क | — |
| आगळा | अगळ | अर्घ |
| जेठि | जट्टि | — |

| | | |
|---|---|---|
| सान | सण्ण | — |
| दिठी | दिट्टि | दृष्टि |
| साद | सद्द (सद्दु) | शब्द वगैरे..... |

हे मऱ्हाटींतील शब्द आजच्या ( तिसऱ्या ) स्वरूपांत एकदम व्यवहारात आलेले नाहींत. उच्चारशास्त्राच्या दृष्टीने त्यांची मधली एक अवस्था गृहीत धरावी लागते. ती गृहीत धरलेली अवस्था काल्पनिक असत नाहीं; तर ते शब्द भाषेंत जिवंत असावे लागतात. आज कानडींत हे शब्द रूढ आहेत. मऱ्हाटी प्रत्यय लागलेलीं दिट्टि, जेट्टि अशी रूपें मराठींत कोठेहि आढळत नाहींत. या प्राकृत रूपाचे मराठीकरणाचे प्रयोग सबंध कर्णाटकात चाललेले होते. आणि तशा प्रयोगातूनच निष्पन्न झालेलीं वाक्ये कर्णाटकी साहित्य व शिलालेख यांतून आढळतात.

मऱ्हाटी भाषेंत कानडीचीं जुनी रूपें आणि कानडीत मऱ्हाटीचीं प्राथमिक रूपें निश्चितपणे आढळतात. यावरून या दोन प्राताच्या जनामध्ये पूर्वी अतिशय निकट संबंध होता व या दोघाच्या बोलीत सामान्य असे पदप्रयोग बरेच होते हें कबूल करावें लागतें. मराठी बोली अजून मूर्त रूपास येण्यापूर्वीपासून या दोन जनात अशा प्रकारचा घनिष्ठ संबंध होता असेंहि यावरून निश्चितपणे ठरते. खिस्ती सनाच्या सुमारें पहिल्या शतकातील गाथासप्तशतींत गल्ल, पोट्ट, तुप्पसारखे कानडीतहि रूढ असलेले शब्द बरेच आहेत. मराठीत सेदणे हा शब्द अनुस्वारयुक्त आहे. कानडींत बाराव्या शतकात तो अनुस्वारयुक्त होता असें केशीराजाच्या शब्द–मणिदर्पणावरून कळून येतें. पण तो शब्द आज अनुस्वार-रहित ( सेदु ) आहे. याचप्रकारचें आणखी एक उदाहरण 'कुरंब' शब्दाचे. चादा–भंडाराकडील या कानडी जातीचे नाव ग्रियर्सन्नें "कुरुंबर" असें दिलें आहे. सेंदणेंप्रमाणें बाराव्या शतकापर्यंत हा शब्द अनुस्वारयुक्त होता. पुढें तो अबिंदुक ( कुरुब ) झाला. याप्रकारचीं आणखी पुष्कळ उदाहरणें देता येतील. या सर्वांवरून बाराव्या शतकानंतर या दोन प्रातातील संघटन कमी कमी होत जाऊन पुढे तें जवळजवळ संपुष्टात आले असल्याचा इतिहास ताजा आहे.

पप महाकवीचें ( इ. स. ९३२ ) आदिपुराण नामक सुंदर काव्य आहे.

त्यातील संस्कृत आणि प्राकृत शब्दाचें प्राचुर्य पाहिले असता मराठी बोलीची पूर्व-भूमिका आपणास स्पष्टपणे आढळेल. याच कवीचे 'विक्रमार्जुनविजय' नामक दुसरें एक रम्य काव्य आहे. या काव्यात त्याने कानडी भाषेवरील आपलें प्रभुत्व चागलेंच व्यक्त केलें आहे. तो ग्रंथ अस्सल कानडी भाषा व शैलीचें निधानच आहे. या काव्यात एके ठिकाणीं द्रोणाचार्यांच्या तोंडीं 'अरे होय जन्नाप्पा' असे उद्गार घातले आहेत. कल्याणी चालुक्य राजा सोमेश्वर यानें लिहिलेला 'मानसोल्लास' किंवा "अभिलषितार्थचिंतामणि" नावाचा अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ आहे. त्या काळची सामाजिक स्थिति जाणू इच्छिणाऱ्याना हा ग्रंथ फार उपयुक्त आहे. संधिविग्रही (परराष्ट्रमंत्री) कसा असावा हें सागतेवेळी 'प्रगल्भो मतिमान् दक्षः **सर्वभाषाविशारदः**' असें तो लिहितो. संधिविग्रही मंत्र्याला सर्व भाषा येणें जरूर होतें. यामुळेंहि कर्णाटकात प्राकृत-मराठी अभ्यासिली जात होती. हस्ति-शिक्षकाने आपल्या हत्तीला कसे शिक्षण द्यावें याचें याच ग्रंथात असे विवरण आहे : हत्तीला मागे सरकावयास सागावयाचें झालें तर "हेडे हेडेति वक्तव्यम्" हड, हट् हाच शब्द याच अर्थानें मराठीत अजूनहि उपयोजिला जातो. "याचनार्थ महामात्रो दे, दे, शब्द उदीरयेत्" "कस्यापि ग्रहणे वाच्यो **घे, घे** शब्दं मतंगजः" "ईदृशी प्रथमा भाषा शिक्षयेत मतंगजम्."

कल्याण चालुक्यानंतर कर्णाटकची राजधानी होयसळाच्या वेळीं हळेबीडु येथें गेली. इ. स. १२१० च्या सुमारास हळेबीडु होयसळ दरबारातील राजकवि जन्नानें 'अनतनाथ पुराण' नावाचे कानडा काव्य लिहिले आहे. त्यात प्रतीहारी "उठि उठि मागा बैस जा तू हळू" अशी सूचना देतो. हे वर्णन अस्सल कर्णाटाच्या गाभ्यातील हळेबीडु दरबारातील कवीने आपल्या अभिजात कानडी काव्यात घातले आहे, हे लक्षात घ्यावे. कवीनें आपल्या डोळ्यानी पाहिलेल्या व कानानी ऐकलेल्या गोष्टीचे हे चित्रण नसेल काय? इ. स. १२३६ च्या सुमारास झालेल्या आडय्यानें अस्सल कानडींत ग्रथरचना करण्याची शपथ घेतली होती याबद्दल मागे सागितलेच आहे. प्राकृत आणि कानडी या भाषा अभिन्न आहेत अशी त्याची दृढ समजूत नसती तर त्याने आपल्या काव्यातून प्राकृत शब्द सढळ हातानें पेरले नसते. संस्कृत आणि

कानडी शब्दाचें सामासिक पद बनविण्याविषयी कानडी व्याकरणकाराचा विरोध आहे. पण त्याच व्याकरणकारानीं कानडी आणि प्राकृत शब्दाचे हवे तसे मिश्र समास बनविण्याची मुभा दिलेली आहे. आडय्याने आपल्या काव्यात राउताच्या तोंडीं घातलेलीं वाक्यें या ठिकाणीं मननीय आहेत. "झा रे, जझारे हळू रे, हो! हो! मझा" यातील 'जा' शब्द तोंडीं 'झा' असा महाप्राण बनलेला दिसतो. या उदाहरणावरून अस्सल कर्णाटकाच्या केंद्रातूनहि मऱ्हाटीचे प्रयोग चालले होते, मऱ्हाटी भाषा काही ठिकाणी उपयोगात होती हे कुणालाहि कबूल केल्याशिवाय गत्यंतर नाही.

ही पार्श्वभूमि लक्षात घेतल्याशिवाय श्रवणबेळगोळच्या एकमेवाद्वितीय प्राचीन मऱ्हाटी शिलालेखाचें कोडें उलगडणार नाही. श्रवणबेळगोळ महाराष्ट्रापासून अत्यंत दूर आहे. मराठी शिलालेख ज्याअर्थी तेथे आहे त्याअर्थी तेथपर्यंत महाराष्ट्र पसरला होता असे म्हणण्याचे धाडस आजपर्यंत कोणत्याहि कडव्या महाराष्ट्रीयाने सुद्धा केलेले नाही. "चामुंडराये सुत्ताले करवियले" हें वाक्य मराठीच नव्हे असे म्हणणारे काहीं कन्नडिग आहेत. तें वाक्य गुजराथी आहे असे सिद्ध करण्याचा त्याचा प्रयत्न आहे. श्रवणबेळगोळ गोमटेश्वर हें जैनाचे क्षेत्र आहे. गुजराथी जैनभक्त येथे यात्रेकरिता येत असत, त्याना समजावें म्हणून हे वाक्य गुजराथी असावे असा त्याचा तर्क आहे. हा तर्क क्षणभर खरा असें मानलें तरी यापूर्वी उद्धृत केलेल्या मऱ्हाटी वाक्याची संगति कशी लागणार?

कर्णाट-महाराष्ट्रातील आजची अटीतटीची मनोवृत्ति, प्राचीन कर्णाट-महाराष्ट्रातील वस्तुस्थिति आकलन होण्यास बरीच आड येत आहे. आजचा हा प्राताभिमानाचा चष्मा बाजूस सारल्याशिवाय त्या काळची वस्तुस्थिति नीट लक्षात येणे शक्य नाही. कानडी आणि मराठी या दोनहि भाषाचा आणि साहित्याचा अभ्यास तटस्थ वृत्तीनें केल्यास आपल्या सास्कृतिक इतिहासातील बरींच कोडीं सहजगत्या सुटणार आहेत. चादा, भंडारा जिल्ह्यात कुरुंब आणि होलेय जातीचे ४-५ हजार लोक असून ते कानडी भाषा बोलतात असें ग्रियर्सन आपल्या Linguistic Survey of India (Vol. IV, page 446) या ग्रंथांत लिहितात, आणि ही भाषा विजापुराकडील आजच्या बोलीशी जुळणारी आहे असा आपला स्पष्ट निर्वाळा देतात! महाराष्ट्रापासून अति दूर असलेल्या

श्रवणबेळगोळच्या दहाव्या शतकाच्या शिलालेखातील मऱ्हाटी वाक्य हें जसें महाराष्ट्रापुढें एक कोडें आहे, तसे आजच्या कर्णाटकापासून खूप दूर असलेल्या वऱ्हाडातील चादा भंडारा जिल्ह्यातील कानडी भाषिकाचें अस्तित्व हे कोडें कर्णाटकीयापुढें आहे. आजच्या या दोन प्रांतांतील प्रांताभिमानाच्या दृष्टि-कोनातून याचे समर्पक उत्तर मिळणें मुळीच शक्य नाही.

देवगिरी आणि होयसळ येथील उत्तरकालीन यादवाच्या यादवीने (इ. स. १२०० नंतर) कर्णाटक–महाराष्ट्रातील प्रांतीय स्वरूपाच्या तेढीस प्रारंभ झाला. तोपर्यंत मऱ्हाटीविषयीं कर्णाटकीयात दुजाभाव कधीच नव्हता. " आरे अरसु " (आरे भाषा श्रेष्ठ) अशी मराठी भाषेविषयी एक म्हण असून ती म्हण एकेकाळच्या कर्णाटकीयाच्या मऱ्हाटीविषयक दृष्टिकोनाची निदर्शक आहे. यादवकाळांनतर कर्णाट–महाराष्ट्रातील राजकीय तेढीमुळें दोन्ही प्रांतातील पहिले सख्य कमी कमी होत चालले. गुलबर्गा, अहमदनगर, विजापूर येथील मुसलमानी राज्यकर्त्यांनी कर्णाटकावर राज्य करण्याकरिता कर्णाटकीयापेक्षा मऱ्हाटी भाषिकास जवळ केले. हे मुसलमानी राजे, विजयनगरचे प्रतिस्पर्धी होते. कर्णाटकी विजयनगरच्या राजकर्त्यांशी झगडण्यास कानड्यापेक्षां मऱ्हाटे त्यांना जवळचे वाटले असल्यास नवल नाही. यामुळेहि मराठीचें संवर्धन कर्णाटकातच झालें, हें येथें पुन्हा लक्षात घेण्याजोगे आहे. पण येथपासूनच दोन्हीहि भाषिकामध्यें तेढ सुरू झाली. मराठीविषयी कर्णाटकीयाच्या बदललेल्या मनोवृत्तीचे पडसाद १७ व्या शतकातील 'अप्रतिम वीरचरिते' नामक ग्रंथात आपणास दिसून येतात. राजकीय आक्रमक वृत्तीमुळें या दोघात एक प्रकारची तेढ पुढे वाढत गेली, तरी सुद्धा औरंगजेबाच्या हल्ल्यापासून आत्मसंरक्षणाकरिता निघालेल्या राजारामास केळदीच्या कर्णाट राजानीं, त्या खुनशी सम्राटाचा रोष होणार हें जाणूनहि आश्रय दिला हें विसरता कामा नये. यापूर्वी, शहाजीनें बेंगळूर वगैरे भागात जो विजय मिळविला तो कोणा एका उपऱ्या विजेत्याने नव्यानेंच या भागात येऊन केलेला दिग्विजय नव्हे. या दोन्ही प्रांतात पूर्वापार चालत आलेली अंतर्गत आत्मीयता, बंधुभाव यामुळेच शहाजीचे या भागात स्वागत झालें. अभिजात कर्णाटकी आणि मरहट्टे यात असलेल्या प्राचीन घनिष्ठ संबंधाचेंच ते प्रत्यंतर आहे.

ज्ञानेश्वरांनीं ' हे आम्हासी कानडे ' असें जरी म्हटलें तरी या वाक्यावरूनच, एके काळीं या लोकास कानडी कळत होतें हेंच सिद्ध होतें. " हे आम्हासी कानडे " असें म्हणण्यात ज्ञानेश्वराचा मराठीचा अभिमान व्यक्त होतो; तसेंच कानडीपासून दूर राहाण्याची उत्तरयादवकालीन प्रवृत्तिहि ध्वनित होते. " हे आम्हासी तेलगु " किंवा " हे आम्हासी द्रविड " असें न म्हणता " हे आम्हासी कानडे " असें म्हणण्याचा अर्थच हा की एके काळीं कानडी त्यांना समजत होते. ज्ञानेश्वरांच्या ग्रंथातून कानडी शब्द विखुरलेले आहेत ही गोष्ट महाराष्ट्रीयास आजहि मान्य आहे. ज्ञानेश्वरीच्या भाषेवर कानडी भाषेची दाट छाया असल्याचें संशोधकानी सप्रमाण सिद्ध केले आहे. यावरून " हे आम्हासी कानडे " याचा अर्थ एवढाच की कानडी वर्चस्वांतून बाहेर पडण्यास मराठी या सुमारास प्रयत्न करू लागली. श्री. विठ्ठल रामजी शिंदे यांनीं कानडी व मराठी या तुलनात्मक प्रबंधात हाच निर्णय दिलेला आहे. यादवाचे पंतप्रधान हेमाडपंत (हेमाद्रि) यानीं मराठीच्या उद्धाराकरिता मनःपूर्वक आरंभ केला. मोडी लिपि सुरू करण्याचे श्रेय हेमाडपंताना दिलें जातें. वैशिष्ट्यपूर्ण शिल्पकलेस महाराष्ट्रात नव्यानें यानीच प्रारंभ केला असें सागितलें जातें. महाराष्ट्रात हेमाडपंती देवळे बऱ्याच ठिकाणीं आहेत. ही कला आणि लिपि त्यांनी दक्षिणेतून—लंकेतून आणली अशी दंतकथा महाराष्ट्रात प्रचलित केली गेली. श्री. विठ्ठल रामजी शिंदे याच्या मतें या दोन्ही कला हेमाडपंतानी कर्णाटापासून घेतल्या. हळेबीडु वगैरे ठिकाणीं असलेली वास्तुपद्धति ही महाराष्ट्रांत अनुसरली गेली. मोडी हा शब्दच मुळांत कानडी आहे. मोडी म्हणजे पद्धत, रीत, लकब असा अर्थ आहे. मोडीचा मूळ शब्द ' मुरी ' असा आहे. ' मुरी ' म्हणजे मोडणें. अक्षरे मोडून एकापुढे एक सलग रीतीनें लिहिण्याची पद्धत ती मोडी. या दोन्ही गोष्टी इतक्या स्पष्ट असता त्या लंकेतून आणल्या असें म्हणण्याची आवश्यकता कां वाटावी? ज्याच्या राजकीय सामाजिक वर्चस्वातून बाहेर पडावयाचें आहे त्याचा आपल्याशीं मुळींच संबंध नाहीं असें म्हणण्याचा मानवी स्वभावच आहे. ब्रिटिश लोकांविषयीं हीच प्रवृत्ति कांहीं काळ होती. तसेंच कानडीच्या बाबतींतहि झाले. कानडी भाषेपासून दूर राहाण्याच्या महाराष्ट्रीयाच्या प्रयत्नातून अशा तऱ्हेची दंतकथा उद्‌भवली.

देवगिरी राजाच्या राजवटींत, तेराव्या शतकाच्या सुमारासच मऱ्हाटीच्या उत्कर्षास आरंभ झाला ही गोष्ट निर्विवाद आहे. यामुळें मऱ्हाटीच्या आद्यप्रवर्तकत्वाचे श्रेय देवगिरी यादवास देण्यास हरकत नाहीं. मऱ्हाटीच्या उत्कर्षास कारण झालेल्या या यादव घराण्याचे शिलालेख शेंकडा ९९ पेक्षाहि जास्त कानडीत असावेत याचा अर्थ काय ? मऱ्हाटी चागलें अंग धरून चालती बोलती होऊन व्यवहारात व्यवस्थितपणें येण्यास समर्थ होईपर्यंत त्यावेळीं परम उत्कर्ष पावलेल्या कानडीचाच राजव्यवहारातून स्वीकार करणें देवगिरीच्या यादवान भाग होतें. आजचें इंग्रजीचें अशाप्रकारचे उदाहरण ताजें आहे. खि. श. ११४४ याच्या पूर्वीचे असे सहाच शिलालेख मऱ्हाटीत उपलब्ध असून त्यांतील श्रवणबेळगोळ व सीताबर्डी हे दोन फारच त्रोटक आहेत ( डॉ. तुळपुळे म. साहित्यपत्रिका अंक ९९, १९५१ ). अंबेगावचा ( ११४४ ) लेखसुद्धा प्रौढ भाषेचा नमुना म्हणता येणार नाही. असें असलें तरी होयसळ यादवाविरुद्ध मराठीच्या ध्वजाखालीं विरोधी गट निर्माण करण्यास मऱ्हाटी भाषाभिमानाचा उपयोग करून घ्यावा लागला. हे केले नसते तर देवगिरी यादवांचें राजकारण ते कसलें ?

देवगिरी यादवाच्या घराण्यांतील लक्षियव्वा, धाडियप्पा वगैरे तऱ्हेच्या पूर्वजाच्या नावावरून कानडीचा पगडा त्याच्यावर किती होता हें बिनचूक कळून येईल. तेराव्या शतकांत महादेवराय, रामराय, यांच्या वेळीं हें घराणें कानडी वर्चस्वांतून बरेंच बाहेर पडले. मराठी नावातील 'राया' चे 'राव' या पुढील काळातच झालें. ज्ञानेश्वरादिकाना मऱ्हाटीच्या अभिमानाने 'हे आम्हासी कानडे' असें मानणे आवश्यक झालें, तरी पण अनेक शतकाचे कानडी-मराठींतील दृढ संबंध एकदम तोडून टाकणें दोघांनाहि शक्य नव्हतें.

> " मज संस्कृतीं नाही अभ्यास । कर्नाटक कवि कुमारव्यास ।
> त्याचेनि आधारें ग्रंथविलास । प्रारंभिला या हेतु " ॥ ५५ ॥
>
> ( उद्योगपर्व )

मराठी भाषिकाना संस्कृत भाषेप्रमाणें कानडी काव्येंहि ज्ञानदायी व स्फूर्तिप्रद होत असत हें चंद्रात्मज रुद्राच्या या ओवीवरून कळून येईल. चंद्रात्मज रुद्र

नामक कवि कुमारव्यासाच्या कानडी महाभारतांतील भीष्मपर्व वाचून मुग्ध झाला. यामुळें मराठी भाषिकाकरिता त्या मनोहर काव्याचें भाषांतर केल्याचें तो सागतो. ( आजगांवकर कृत मराठी कवि-चरित्र पाहा ). मराठीचे महाकवि मुक्तेश्वर ( इ. स. १६५० ) व कुमारव्यासाच्या पुढील कवितातील साम्य अभ्यसनीय आहे :–

## मुक्तेश्वर सभापर्व

कवळोनि अभिप्राव सर्व । मागा कथिलें आदिपर्व ।
आता अपूर्वापूर्व । सभापर्व परियेसा ॥ १३ ॥

मुक्तेश्वर कवी भारत । टीका प्राजळ व्यक्त ।
जेवि वेदाचा मथितार्थ । श्रुतिपुराणें बोलती ॥ १४ ॥

जो राजयातें वीररसु । विप्रवर्याते वेदसारांशु ।
तत्त्वार्थ बोध परमहंसु । योगेश्वरु भावीति ॥ १५ ॥

बुद्धियुक्तीचा सागरु । ऐसे मानिती मंत्री चतुरु ।
विलासियातें शृंगारु । सुरतानदुवर्धका ॥ १६ ॥

विद्याप्रवीण शास्त्रमंडित । कौतुकें मानिती कर्णामृत ।
दोषादोषीं याचे आर्त । पुरवी गंगेसारिखे ॥ १७ ॥

पर्वतामाजी कनक मेरु । तडागामाजीं क्षीरसागरु ।
महाराष्ट्रासी काव्यगुरु । हा गौरवू ये ग्रंथी ॥ १८ ॥

मुक्तेश्वराच्या या भागाशी कुमारव्यास कवीच्या कानडी महाभारतातील उद्योगपर्वाच्या मंगल चरणातील खालील श्लोक ताडून पहावेत. ( कुमारव्यासाचा काळ श्री. गोविंद पै याच्या मतें १२३०-३५ पर्यंत ठरतो. आणि काहींच्या मतें १५०० च्या पुढे निश्चितपणें जात नाहीं. )

अरसुगळिगिदुवीर, द्विजरिंगे
परम वेदद सार, योगी-
श्वरर तत्त्वविचार, मंत्रीजनके बुद्धिगुण ॥

विरहिगळ श्रृंगार, विद्या-
परिणतरलंकार, काव्यके
गुरुवेनलु, रचिसिद कुमारव्यास भारतव ॥

वेद पारायणद फल, गं-
गादि तीर्थ स्नान फल, कृ-
च्छ्रादितपसिन फलवु, ज्योतिष्टोम याग फल ॥
मेदिनिय नोलिदित्त फल, व-
स्त्रादि कन्यादान फल बहु-
दादरिमि भारत दोळोदक्षरव केळिदरिगे ॥

कानडीत राघवाक कवीने षट्पदीवृत्तामध्यें लिहिण्याचा प्रघात पाडला. छंदाचा हा प्रकार बागव्या शतकानंतर फार लोकप्रिय झाला. मराठीतहि या षट्पदीत लिहिलेल्या कविता प्रा. पोतदार, श्री. खरे वगैरेंच्या संशोधनांत आढळल्या आहेत. या नवीन छदाच्या प्रकाराने मराठी विद्वानात मोठें कुतूहल निर्माण केलें होतें.

## भाऊबंदकींत शब्दांची वांटणी आणि भाषेस निराळें वळण देण्याचे बुद्धिपुरस्सर प्रयत्न

सतराव्या शतकापर्यंतहि मराठी कवि कानडी भाषेचा अभ्यास करीत असत हे दाखविण्यास ही उदाहरणे पुरेशी आहेत. आणि प्राकृताच्या निमित्ताने कानडी साहित्यिकानी आठव्या-दहाव्या शतकापासूनच मराठी भाषा बनण्यास कशाप्रकारे साहाय्य केले याबद्दल मागे सागितलें आहे. १३ व्या शतकाच्या शेवटी किंवा पंधराव्या शतकाच्या आरभी झालेल्या कुमार व्यासाच्या ग्रंथात त्याच्यावर असलेला मराठीचा पगडा उठून दिसतो. त्यानें वापरलेल्या शब्दांना प्राकृत म्हणून त्याची वासलात लावण्याची काहीजण खटपट करतील; पण अशा रीतीने डोळ्यावर कातडें ओढून घेऊन सत्य स्थिति पाहाण्यास भिणें हें काही नैतिक धैर्याचें लक्षण नव्हे. त्या काळीं मराठी राजरोसपणें व्यवहारात होती व प्राकृत भाषा कधीच मागें पडली होती. शहाणपण, झोंप, राहाणी, चौऱ्यांशी, गयार ( गचाळ ), विटाळ, बोळेतन ( भोळेपणा ), लावकरु

(लावालावी करणारे, चहाडी करणारे), खेप, खरे, वगैरे शब्दाना प्राकृत म्हणून वेळ मारून नेणें कितीसें युक्त होईल? 'हे आम्हांसी कानडे' असें जरी ज्ञानेश्वरानी म्हटलें तरी महाराष्ट्रात कानडी शिकणारे होते हें सिद्ध होते. आणि कर्णाटकीयात मराठीपासून चार पावले दूर राहाण्याचा प्रयत्न चालला होता तरी ते मराठीच्या कक्षेंतून बाहेर पडूं शकले नाहींत. तेराव्या शतकानंतर कानडी आणि मराठी भाषाच्या विकासाचा सूक्ष्मपणे अभ्यास केल्यास एक मौजेची गोष्ट उघडकीस येते. पंप, रन्न वगैरे कानडी कवीनी 'ळ' काराच्या अनुप्रासाचा आपल्या काव्यात मनोहर रीतीनें उपयोग केलेला आहे. "अविरळ मळयानिळ कंपितंगळ्" (पंप भारत), "बाळकेळीलीळे" (शातिपुराण ५,२५) अशा प्रकारचीं वाक्यें जुन्या प्रौढ कानडी शैलीची निदर्शक आहेत, कमळ, जळ वगैरेंतील 'ळ'कार त्यावेळीं शिष्टमान्य होता. पण चौदाव्या-पंधराव्या शतकानंतर कमल, जल असे प्रयोग होत जाऊन 'ळ'काराची जागा 'ल'कारानें काबीज केली असें दृष्टीस पडते. महानुभाव साहित्यात, ज्ञानेश्वराच्या पूर्वी 'आगळा' वगैरे शब्द 'ळ'कारयुक्त आढळतात. पण ज्ञानेश्वरीच्या शुद्ध व प्राचीन म्हणून श्री. राजवाडे प्रभृतीनी छापलेल्या आवृत्तींत 'ळ'कार संपूर्ण वर्ज्य केलेला दिसतो. आगळासारख्या शब्दांतूनसुद्धा ज्ञानेश्वरानी 'ल' कारच उपयोजिलेला आढळतो. ज्ञानेश्वराचे समकालीन कानडी साहित्यिक 'ळ'काराचा सर्रास उपयोग करीत असल्यामुळे मराठीचें वैशिष्ट्य दाखविण्याकरिता सर्वत्र 'ल'काराचा उपयोग करण्याची आवश्यकता त्याना भासली नसेल ना? कारण ज्ञानेश्वरानीं आरंभ केलेला हा 'ल'कार पुढील पिढ्यानीं स्वीकारलेला दिसत नाहीं. त्याच्या पूर्वी महानुभावातहि तो नाहीं. कमळ, सकाळ, वेळ वगैरे 'ळ' कार मराठीतच दृढमूल झाले आणि कानडीत पुन्हा 'ल'कारानें प्रवेश केला!

कानडी व मराठींतील 'ल'कार 'ळ'काराच्या प्रकाराप्रमाणेंच आणखी पुष्कळ शब्दप्रयोग, पुढील काळीं (तत्पूर्वी दोघात प्रचलित असून) व्यवहारातून वगळले जाऊन त्याची भाऊबंदकींत वाटणी झाल्याप्रमाणें दिसतें. शब्दरूपांत थोडा फरक होऊन नव्या स्वरूपांत काहीं शब्द प्रचारांत आले. मुदल (मोदलु), कैवारसारखे शब्द कानडींतून मागें पडले. निरि, माड (माडि) शब्दांचें नीरिगे, माळिगे असें रूपांतर झालें.

## पूर्वीचे जिव्हाळ्याचे निगडित संबंध

कानडी आणि मराठींतील पुष्कळ शब्द या दोन्ही भाषिकांच्या निकट संबंधाचे निदर्शक आहेत. यापूर्वी सांगितल्याप्रमाणें कोल–काठी, चूल–वैल, कींव–काकुळती, ओली–शेला वगैरे दोन्ही भाषापासून बनलेले मराठींतील समानार्थक जोड–शब्दहि या म्हणण्यास पुष्टि देतात. या प्रकारचे जोड शब्द कानडींतहि रूढ आहेत. उदाहरणार्थ : छप्पन्न–ऐवत्तारु, नडु–मध्यें वगैरे. या शिवाय दोन्ही भाषातून पुष्कळ भाववाचक शब्द परस्परानी घेतलेले आहेत. मराठी संख्यावाचक शब्द कानडीत सर्रास शिरलेले दिसतात. 'बाहत्तर–नियोग' 'तेत्तीस कोटि' 'एक्कसर' 'अठरा कचेरी' वगैरे संख्यावाचक शब्द कानडी साहित्यांतून व लोकभाषेमधून हरघडी कानीं पडतात. दुसऱ्या भाषेंतील संख्यावाचक शब्द स्वीकारणारी भाषा त्या भाषेची विशेष ऋणी असते असें तुलनात्मक भाषाशास्त्रज्ञाचें म्हणणें आहे.

दोन भिन्न भाषिकाच्या संपर्कात सामान्यतः नित्य व्यवहारातील आपल्या भाषेंत नसलेल्या आवश्यक वस्तूंच्या नावाची उसनवारी करणें अनिवार्य होऊन बसते. याहूनहि जास्त परिणाम झालेल्या ठिकाणी नामपदाच्याबरोबर दुसऱ्या भाषेंतील संख्यावाचक शब्दहि येऊ लागतात. पण परभाषेंतून धातु जसेच्या तसे उचलून घेतलेले मात्र फारच क्वचित् ठिकाणीं आढळत असतील. तुलनात्मक भाषाशास्त्रातच हा प्रकार विलक्षण आहे असें म्हणावें लागतें. या प्रकारचे असामान्य दृश्य मऱ्हाटींत पाहावयास मिळते. मऱ्हाटींत कानडी धातु आपणास आढळतात. उदाहरणार्थ : किडणें, मुरकणें, अडकणें, मिरविणें, कालविणें, कुटणें वगैरे; हे शब्द संस्कृतापासून आले असें मानता येत नाहीं. किडु, मुरकु, अडकु, मेरे, कलसु, कुट्टु, वगैरे धातु कानडी वर्गाच्या तमिळ, तेलगु वगैरे भाषातहि आहेत. म्हणून हे धातु आर्यवर्गीयाच्या भाषेंतील नव्हत याबद्दल शंका नाही. कानडी आणि संस्कृत या दोनहि भाषांचा संबंध कैक शतकांचा असून कानडीमध्यें संस्कृत धातु जसेच्या तसे आलेले नाहींत आणि येत नाहींत. इसु, सु, प्रत्ययादि संस्कार होऊनच ते कानडींत येऊं शकतात. संस्कृत 'गम्' धातु मराठींत गमणें असा होतो खरा, पण कानडींत तो शब्द शिरतांना 'गमिसु' असा संस्कार पावतो. इंग्रजी भाषेचा सखोल परिणाम

आज सर्वच भाषावर झालेला आपण पाहातो. तिच्यांतील पुष्कळ नामपदें देशभाषेंतून जशींच्या तशी शिरलेलीं आहेत. पण धातूंना तसा प्रवेश नाहीं. "मोटार ड्राइव्हली" असें कधीं कोणी म्हटल्याचें ऐकिवात नाही. पण "मोटार ड्राइव्ह केली" असें वाक्य ऐकिवात येतें. यातील 'मोटार' हें नामपद असल्यानें जसेच्या तसें घेतलें. पण 'ड्राइव्ह' हा शब्द धातु रूपात मराठीत येऊं शकला नाहीं. अशाप्रकारची उपजत प्रवृत्ति प्रत्येक भाषिकात असतां मराठीत असे कानडी धातु कसे ?

मराठे आर्योद्रविडियन् आहेत असे श्री. भास्करराव जाधव यानी प्रतिपादिलें आहे. असे गृहीत धरल्याशिवाय वरील विचित्र प्रकाराचा उलगडा होऊं शकत नाहीं. याच कारणाकरिता या दोन भाषिकाना जुळीं भावंडें असें मागील प्रकरणीं संबोधिलें आहे. श्री. जाधवराव मराठ्याना आर्योद्रविडियन् म्हणतात हें खरें; पण त्याना मरहट्ट यांची वैदिक काळापर्यंतची परंपरा उमगली नसल्यामुळें मराठे मुळात आर्यवर्णीय अशी त्याची समजूत झालेली आहे. आर्यवर्गीय मराठ्यानीं द्रविडवर्गीय बायका करून घेतल्या, त्यामुळे पुढची संतति आर्य-द्रविड बनली असे त्याचें म्हणणे आहे. पण यदुतुर्वसूंची ऋग्वेदकाळापूर्वीपासूनची परंपरा आणि यादव हे मातृप्रधान कुटुंब–पद्धतीचे होते हा पुराणातर्गत पुरावा लक्षात घेणे जरुरीचे आहे.

आपल्या प्राचीन वेदव्यासादि पुराणेतिहासलेखकानी वास्तव घटनाचे संपूर्णतया यथावत् वर्णन करण्याची पद्धत स्वीकारलेली नाही. प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टीचें संकेतरूपानें किंवा प्रातिनिधिक रूपाने एकादें उदाहरण घेऊन पुढें चालू लागण्याची प्रथा सर्वत्र आढळते. महाभारतात यदुतुर्वसूंच्या आर्यीकरणाच्या प्रकाराचीहि सूचना अशीच दिली गेली आहे. देवयानी शुक्राचार्यांची कन्या म्हणजे ब्राह्मणकन्या; हिचा ययातीशीं विवाह होतो. हा प्रतिलोम विवाह होय. आर्य वधूपासून ययातीला झालेला मुलगा यदु. अशा रीतीने यदुसंतति-यादव हे 'आरियरु' झाल्याची साक्ष पुराण देत आहे. अशा आरिय यादवाच्या गौळवाड्यात जन्म पावलेल्या प्राकृत भाषेत दिसून येणारे संस्कृतेतर ऱ्हस्व 'ए', 'ओ' आणि 'ळ' वगैरे उच्चार जमेस धरले असता हा यादववंश मुळात तथाकथित द्रविडवर्गीय पत्तिजनच होय असें म्हणणें जास्त समंजस होणार

ाही काय ? आणि यामुळेच आर्यीकरणात त्याच्या भाषेचें स्वरूप पूर्णपणें दललें तरी कानडी वर्गीय धातु मराठींत जसेच्या तसे राहिले असणे हेच जास्त भवनीय नाही काय ?

मराठींत कानडी धातु आहेत ही गोष्ट श्री. विठ्ठल रामजी शिंदे यानी ापूर्वीच 'मराठी आणि कानडी याचा परस्पर संबंध' या आपल्या महत्त्वाच्या ख्यात विशद केली आहे. इतकेंच नव्हे तर मराठे आणि कानडे याच्यात काहीतरी विशेष' आनुवंशिक संबंध असल्याशिवाय खालील शब्दाची वघेव होणे शक्य नव्हते असेंहि मत त्यानी व्यक्त केले आहे. "नात्याचे व्व (आवा, आवु), अप्प (बप्पा, आप्पा, आबा) वगैरे शब्द, आणि ोट्ट (बोट), पोट्टे (पोट), तले (ताळू) वगैरे अंगवाचक शब्द जेव्हा ोन भाषात सामान्यपणे आढळतात तेव्हा त्यापैकी जी जुनी असते तिच्याशीं ावीचा निकट आनुवंशिक संबंध आहे असें मानल्याशिवाय गत्यंतर नाही" अशा निर्णयाला श्री. शिंदे येऊन ठेपले आहेत.

पण हा आनुवंशिक संबंध कशा प्रकारचा आहे याची श्री. शिंदे याना कल्पना नव्हती. तुलनात्मक भाषाशास्त्राच्या पुराव्यावरून त्याना अनिवार्यपणें वरील प्रकारचा निर्णय घ्यावा लागला. यदु–तुर्वसूंच्या कुळकथेकडे त्याचें लक्ष गेले असतें तर त्याच्याकडूनच या विचाराची सागता कधीच होऊन गेली असती आणि कानडी व मरहट्ट याची समस्यापूर्ति होऊन मराठी संस्कृतीच्या बऱ्याच गुंतागुंतीचा उलगडा झाला असता.

कानडी आणि मराटीचा संपर्क (आजच्या बऱ्याच लोकाना वाटतो तसा) सागली, मिरज फार तर पुणे या भागातला एवढाच असता तर वरील प्रकारचा मूलगामी संबंध आपल्या दृष्टीस पडता ना. वऱ्हाड-नागपूरकडील भाषेतहि हे धातु का असावेत बरे ? चालुक्यराष्ट्रकूटादि राजवटीत दोन्ही भाषिकाचा निकट संबंध आल्यामुळे मऱ्हाटीत शिरलेली कानडी किंवा कानडींत शिरलेली अनेक मऱ्हाटी नामपदें किंवा संख्यावाचक शब्द याचा फार तर उलगडा होईल; पण मऱ्हाटीमधे कानडी धातु कसे आले याचें कोडे काहीं उलगडणार नाहीं. मऱ्हाटी' भाषा जन्मतेवेळीं तेथेंच जवळपास कानडीहि प्रचलित होती असें

म्हणणें अनिवार्य ठरतें. दोनहि भाषाचा सराव असलेल्या कुटुंबातील लहान मुलाच्या भाषेंतच हा प्रकार दृष्टीस पडतो. द्विभाषिकाचीं मुलें दोनहि भाषाचे धातु उचलून बोलतात असें आढळतें. यामुळे हा विचित्र प्रकार पुन्हा आपणास मऱ्हाट–कर्णाट शेजारीं होते या मूळ मुद्यावर आणून सोडीत आहे. एकमेकाशेजारीच वाढलेल्या प्राचीन रिस्टिक भोजकाच्या वसाहती, प्रथम मऱ्हाट म्हणजे वऱ्हाड हे जर खरें असेल तर मऱ्हाटच्या शेजारचा कन्नदेश–खानदेश हा मुळात कानड देशच होय. यावरूनहि कर्णाट–मऱ्हाटचे मूळ जन जुळीं भावंडें असावेत असे म्हणणे सयुक्तिक ठरत आहे.



: ६ :

# देव देवता

[ रुद्र-शिव, मल्लय्या-मल्हारी, श्री देवी, यल्लूआई वगैरे ]

अति पुरातन काळापासून कर्णाट–मरहट्ट जनाच्या निकट संबंधाचा–जुळेपणाचा स्पष्ट पुरावा देणाऱ्या काही देवताचा विचार येथें प्रस्तुत आहे. त्यात अतिपुरातन रुद्र–शिवाचा विचार आधीं येतो. रुद्र हा ‘पत्तीनां पतिः’ असें वेदातच आलें आहे. रुद्राध्यायात स्तेनादि अनेक जनसमूहाप्रमाणें पत्तीचाहि देव रुद्र असल्याचे वर्णन आहे. यामुळें पत्तीजन अनेकातील एक, सामान्य जन असावेत असा बोध होतो. पत्तींच्याशिवाय आलेलीं दुसरी नावें निरखून पाहिलीं तर त्याचे महत्त्व कितीसें असणार हे त्या नावावरूनच कळणार आहे. स्तेन, कुलुच, आरण्य, तस्करादि नावावरून त्या लोकाचें सामाजिक महत्त्व काय हें फोड करून सागण्याची आवश्यकता नाहीं. या जनाना पुढील काळात कोठे सन्मान्य असें ऐतिहासिक महत्त्व प्राप्त झाल्याचेंहि आढळत नाही. तरीपण रुद्राला “ तूं चोराचा देव, तूं बेरडाचा देव, तूं वनचरांचा देव ” अशातऱ्हेनें वैदिक ऋषीनीं वर्णिलें आहे तें का ?

## रुद्र–शिव : अवैदिक देवता

या वर्णन–प्रकारावरूनच रुद्राविषयीं वैदिक आर्यांची मनोवृत्ति काय

होती हें उघड होत आहे. आजहि ब्राह्मणातील सर्व शाखा रुद्रोपासक नाहींत. शैव पंथ स्वीकारलेल्याशिवाय बाकीच्या ब्राह्मणात रुद्राला महत्त्व नाहीं. शैवांतहि काही कट्टर वगळले तर त्यातील ब्राह्मणवर्गाच्या संकल्पमंत्रातून वगैरे विष्णु किंवा नारायणाला प्रामुख्य असलेलें दिसते. श्रीमत् शंकराचार्यांनीं नारायणाची उपासना सागितली आहे. त्याची चर्पटपंजरी गोविंदाचे स्तवन करणारी असल्याचें सुविख्यात आहे. ब्राह्मणानी शिवालयाचें पुजारीपण करूं नये, केले असता त्याचें कल्याण होत नाही, अरिष्ट येते, अशी भावना मागील पिढीपर्यंत जुन्या परंपराप्रिय लोकात दृढ होती. शिवाचे पुजारी सामान्यतः गुरव असत. खुद्द ऋग्वेदांतहि इंद्राच्या मानानें रुद्राचीं अशी फारच थोडी सूक्ते आहेत. संपूर्ण अशी तीनच सूक्तें रुद्राची आहेत. शिवाय रुद्राला उद्देशून केलेल्या प्रार्थनाहि पाहाण्याजोग्या आहेत : "नमस्ते रुद्र मन्यव उतो त इषवे नमः। (वा. सं. १६–१) मा नो महान्तमुत मा नो अर्भकं मा न उक्षन्तमुत मा न उक्षितम् मा नो वधीः पितरं मोत मातरं मा नः प्रियास्तन्वो रुद्र रीरिषः ॥ मा नस्तोके तनये मा न आयौ मा नो गोषु मा नो अश्वेषु रीरिषः। वीरान् मा नो रुद्र भामितो वधीर्हविष्मंतःसदमित्वा हवामहे ॥ (१. ११४. ७–८)

"हे रुद्रा तुझ्या कोपाला नमस्कार असो (–का. वा. लेले) हे रुद्रा, तूं आमच्यातल्या मोठ्याचा किंवा लहानाचा जीव घेऊं नकोस, आमच्यातल्या वाढत असलेल्यांचा किंवा वाढलेल्याचाहि तूं जीव घेऊं नकोस. तू आमच्या पित्यास किंवा मातेस मारूं नकोस किंवा आमच्या स्वतःच्या प्रिय शरीरासहि दुःख देऊं नकोस. तूं आमच्या पुत्राना किंवा पौत्राना किंवा आमच्या नोकराचाकराना ठार करूं नकोस, हे रुद्रा तूं रागावून आमच्या वीरांना मारूं नकोस. आम्ही हवि घेऊन तुझी सर्वकाळ प्रार्थना करीत असतों" (सिद्धेश्वर शास्त्रीकृत ऋ.)

या प्रार्थनेंत रुद्राच्या उग्रपणाला भ्यालेली मनोवृत्ति व्यक्त होत आहे. इंद्राच्या प्रार्थनेंत ओतप्रोत भरलेली आपुलकी यांत नाहीं. हा रुद्र त्रासदायक होऊं नये म्हणून पीडानिवारणार्थ विशेषेंकरून ही प्रार्थना केलेली दिसते.

नवीन जागीं कोठें बिऱ्हाड बदलल्यास तेथील वास्तुदेवता, ग्रामदेवता

कोपूं नये म्हणून त्यांनाहि आपल्या मुख्य देवतानंतर नैवेद्य वगैरे देण्याचा प्रघात आजहि आपल्यात आहे. अशातऱ्हेनें हिंदूंच्या देव्हाऱ्यांत पुष्कळ दुय्यम दैवतानी कानाकोपऱ्यातून जागा मिळविली आहे. वेदकाळी वैदिकांना रुद्रालाहि अशाच प्रकारे मान्यता द्यावी लागली असावी असे दिसतें.

वरील मत्रात, "रुद्रा तुला हविस् आम्ही देतो" अशी प्रार्थना आहे खरी; पण रुद्राला इंद्रादीच्या समवेत यज्ञातील हविर्भाग केव्हाच दिला जात नाहीं. यज्ञात रुद्राला खरोखर स्थान नाही. तरीपण त्याचा क्रोध कमी व्हावा म्हणून की काय यज्ञात इंद्रादीस्तव हवन झाल्यावर शेवटीं "रुद्राय पशुपतये स्वाहा" असें म्हणून अवशिष्ट भाग देऊन टाकतात व क्रियेनतर (अपउप-स्पृश्य) हात धुतात. हवि अर्पण करण्याचा हा प्रकार पाहिला तर त्यात जिव्हाळ्यापेक्षा जुलुमाचा रामराम जास्त दिसतो. अमंगळ, अशुभकारक म्हणून गणलेल्या ग्रहाला जसे मंगळ हें नाव दिले गेले आहे तसे रुद्रालाहि त्याचप्रकारें शिव (मंगलकारक) हें विशेषण लावलें असल्याचे भाष्यकार सागतात. शिव हें विशेषण लावण्यात त्या मंत्रद्रष्ट्या वैदिकाच्या मनाच्या आतल्या कप्यात या देवतेविषयी दडलेला अनादर व भीतिच व्यक्त होत नाही काय?

वेदातील वर्णनावरून त्याच्या रूप आकाराचा काहीसा बोध होतो. या प्रकारच्या स्वरूपवर्णनावरून तो वैदिकाचाच एक स्वतंत्र देव असावा असा तर्क करण्यास जागा आहे. पण रुद्राला पुढीलकाळीं प्रामुख्यानें रूढ झालेल्या शिव या नामाभिधानावरून मुळात हे दोन देव एकच असावेत असें वाटतें. वर विवरण केल्याप्रमाणें वैदिकाकडून गौणस्थान मिळालेल्या रुद्राचे पुराणातून आलेलें वर्णन मुळाशीं ताडून पाहिले असता वेदातून वर्णिलेला रुद्रच पुराणकाळीं शिव या नावानें पुढे आला आहे असें दिसतें. यावेळी शैवमत प्रसार पावूं लागलें असलें तरी पुराणातून आलेलीं शिवाची वर्णनें फारशी हृद्य नाहींत. माध्वात शैवांना निंदाव्यंजकरीतीनें असुर म्हटलें जाते. वेदात रुद्राला 'असुर' असें द्व्यर्थी विशेषण लावलेले आढळते. पुराणातून शिव हा असुरांचा पक्षपाती असल्याचीं वर्णनें जागोजाग येतात. रावणादि राक्षस म्हणून प्रसिद्ध असलेले जन परम शिवभक्त होते. भागवतात (४.२.१८–३१) येणारे पुढील श्लोक चिंत्य आहेत :—

अयं तु देव यजन इन्द्रोपेन्द्रादिभिर्भवः ।
सहभागं न लभता देवैर्देवगणाधमः ॥ १८ ॥

भवव्रतधरा ये च ये च तान् समनुव्रताः ।
पाखंडिनस्ते भवन्तु सच्छास्त्रपरिपंथिनः ॥ २८ ॥

नष्टशौचा मूढधियो जटाभस्मास्थिधारिणः ।
विशन्तु शिवदीक्षाया यत्रदैवं सुरासवम् ॥ २९ ॥

........................................

एष एवहि लोकाना शिवः पन्थाः सनातनः ॥ ३१ ॥

या वरील श्लोकात शैवपंथाविषयी भागवत संप्रदायी ब्राह्मणाच्या काय भावना होत्या किंवा आहेत हें दिसून येतें. भागवत संप्रदायातच नव्हे तर मूळ वेदातच रुद्राला मानाचें स्थान दिलेले आढळत नाही. शिवभक्त आचार–विहीन होतील, ते पाखंडी असतील, सुरापान करतील, जटाभस्म धारण करणारे असे हे मूर्ख लोक तुझे भक्त होतील आणि इन्द्रादिकाबरोबर तुला हविर्भाग मिळणार नाहीं, अशा प्रकारचें वर्णन भागवतात येतें. शैव संप्रदायात वरील प्रकारच्या अनाचारास अवकाश आहे किंवा होता हें या पंथाचा इतिहास जाणणाऱ्यास सागावयास नको. ही वास्तव घटना असता त्यावर पाघरूण घालण्याकरिता भागवतकारानी दक्षाच्या तोंडी वरील शाप घातला आहे. वस्तुस्थिति अननुकूल किंवा काहीशी गौण असतेवेळी ती समंजस वाटावी याकरिता पुराणिक शापाचा किंवा वराचा उपयोग करीत असतात. कुंतीला झालेल्या संततीबद्दल विचित्र वाटूं नये म्हणून दुर्वासाकडून तिला वर मिळाल्याची एक कथा पुराणकर्त्यांनी तयार केली. यदु–तुर्वसुवंशीय काही शाखा अजूनपर्यंत मद्यमासभक्षक होत्या. पण तें लोकाना सह्य होण्याकरिता ययातीच्या शापाचें निमित्त पुढें करण्यात आलें. पुराणलेखनातील हें तंत्र लक्षात घेतां, शैव अनाचारी होतील असा जो दक्षाचा शाप म्हणून भागवतात सागितलेला आहे त्याचें खरें रहस्य समजेल. त्याचा अर्थ एवढाच की, शैवात तशाप्रकारच्या आचार–विचाराची मंडळी होती.

शाक्तसंप्रदायी लोक आत आल्यानंतर शैवात अशाप्रकारचे अनाचार

बोकाळले असण्याचा संभव आहे. योनि–लिंगपूजक शाक्तसंप्रदाय शैवांहून निराळा असून तो कालातरानें शैवहि बनला असण्याचा संभव आहे. यामुळें मुळात शैव पंथ हा वैदिक संप्रदाय असणें शक्य आहे असें कोणी म्हणूं शकतील, पण शिव हा शब्द मुळात संस्कृत नसून आर्येतर द्रविडवर्गीय भाषेतून आलेला आहे. याकरिता शिव देवता आणि शैवपंथ हा वैदिकमार्गाहून निराळा आहे असे म्हणणे जरूर वाटतें. वेदात रुद्राचे आणि पुराणातून शिवाचें वर्णन वाचले असता तो आर्यपक्षपाती देव आहे असे धैर्यानें सागणें शक्य नाहीं.

## रुद्र आणि शिव हे एकाच अर्थाचे दोन भिन्न शब्द

सायणाचार्य वेदभाष्यात रुद्र शब्दाची सहा प्रकारें व्युत्पत्ति सागतात. एकापेक्षा अधिक व्युत्पत्त्या सागण्याची आवश्यकता का उत्पन्न होते? कोणतीहि एक समाधानकारक वाटत नसल्याची ती खूण नव्हे काय? अलीकडील तुलनात्मक भाषाशास्त्रज्ञाच्या प्रयत्नानें या शब्दाची निश्चित व्युत्पत्ति कळणें शक्य झाले आहे. रुद्र म्हणजे ओरडणारा, भीकर शब्द करणारा या प्रकारच्या अर्थापेक्षा आर्यभाषावर्गाच्या तुलनेने कळून येणारी रुद्–rUddy, रुधिर ही व्युत्पत्ति जास्त समंजस वाटते. यामुळे रुद्र म्हणजे ताबडा असा मूळ अर्थ निश्चित ठरतो. ‘असौ यस्ताम्रोऽरुण उत बभ्रुः सुमङ्गलः।’ (वा. सं. १६ ६) रुद्राच्या या वर्णनात त्याच्या ताबडेपणाचे विविध प्रकार सुव्यक्त होत आहेत. “रुद्रोवा एष यदग्निः।” हे तैत्तिरीय संहितेतील (५. ४. १.) वचनहि वरील विधानास पोषक आहे. ताबूस हा रुद्र शब्दातील मुख्यार्थ असून पुढें त्याला निराळे आनुषंगिक अर्थ येत गेले.

रुद्राला पुराणकाली शिव असें नाव सर्वत्र रूढ झालेले दिसून येते. पण वेदात शिव हा शब्द देवतावाचक नाही. तथापि रुद्राला शिव हे विशेषण लावण्याची प्रथा प्राचीन आहे. ‘शतरुद्रीया’त शिव शब्द अनेक ठिकाणी येतो. रुद्र-शिव असें जोड नाव नंतर रूढ झालें. वीरशैवात मुलाना शिवरुद्रप्पा हें नांव ठेवण्याची चाल आहे. रुद्र आणि शिव हे दोन्ही शब्द एकाच देवाची नावें असून ते शब्द मात्र निरनिराळ्या भाषातून आलेले आहेत. पहिला (रुद्र) शब्द आर्यभाषावर्गातील तर दुसरा आर्येतर पत्तिजनाच्या तथाकथित द्रविड भाषा-वर्गीतील आहे.

## चंद्रमस्‌चा विचार

शिव शब्दाचा मूलगामी विचार करण्यापूर्वी चंद्रमस् शब्दाचा थोडा छडा लावणें जरूर आहे. चंद्र आणि मास् असे त्यात दोन शब्द असल्याचे मागें एकवार सांगितलेंच आहे. प्रा. वैजनाथ काशीनाथ राजवाडे यानीं चंद्र-शब्दविषयक आपल्या लेखात वेदातील पृथुश्चंद्र, हरिश्चंद्र, अधिश्चंद्र, गुरुश्चंद्र, विश्वश्चंद्र वगैरे उदाहरणावरून सुचलेला एक महत्त्वाचा शोध नमूद केला आहे. All this leads me to the conclusion that the original word was श्चद्र in the pre-Vedic times, that by the time of Rigveda, it had shed its श् and that it showed its original spelling in some cases but its absence in others (अभिचंद्रान्, सचंद्र. etc) shows that चंद्र had become popular and that no attempts could dislodge it. This is the only explanation intelligible to me (Proceedings of the Fifth Oriental Conference Vol I, page 273).

आज रूढ असलेला चंद्र शब्दाचा मूळ उच्चार वेदपूर्वकाळात श्चंद्र असावा असा तर्क प्रा. राजवाडे यानी केलेला असून तो अगदीं बरोबर आहे.

चंद्र शब्दाचा अर्थ मॅक्डोनेल आणि कीथ असा देतात :—" चंद्र appears to denote gold in certain number of passages from Rigveda onwards (Vedic Index Vol. I, p. 254) ऋग्वेदांत उषेला चंद्र हें विशेषण लावलें आहे. उषा ही आधी ताबूस पण येतायेता पाढरेपणाकडे झुकणारी आहे हें सागणें नकोच. चद्र शब्दाला सुवर्णासारखा रंग असा अर्थ मॅक्डोनेल सागतो. सुवर्णाच्या रंगांत ताबूस पिवळसर आणि किंचित् पाढरेपणाहि सामावलेला आपण पाहातो यामुळें चंद्र शब्दाला पुढें पुढें पाढरा असा अर्थहि आला असल्यास नवल नाहीं. चंद्र शब्दाला सुवर्ण आणि कापूर असे अर्थ कोशांत आढळतात. चंद्र शब्दामधील 'च'काराचा शकाराशीं संबंध असलेला अजून काहीं शब्दातून आपल्याला पाहावयास मिळेल. शिन्दूर शब्दाचा तद्भव कानडींत चेन्द्र झाला अशी जुन्या पंडिताची समजूत आहे. तेथें चकाराचा शकाराशीं संबंध असलेला पुरावा तर मिळतोच, शिवाय चेन्द्र–शेन्द्र याचा

मूळ अर्थ काय असावा याचा सुगावा लागतो. ‘ चेन्द्र ’ किंवा शेन्दूर हें तांबडें असतें हें जाणण्यास आज कोणत्याहि ग्रंथाच्या आधागची आवश्यकता नाहीं, ही एक ( प्रत्यक्ष प्रमाण असल्यामुळें ) समाधानाची गोष्ट आहे. यावरून चेन्द्र आणि शिन्दूर यांतील साहचर्य पटण्याजोगें आहे. कर्णाटात शेन्दूराला चेन्द्र म्हणतात. महाराष्ट्रानें शिन्दूर या शब्दातील प्राचीन काळाचा शकारयुक्त उच्चार कायम टिकविला तर कर्णाटकात त्या पुढील काळातील ‘ च ’कार युक्त उच्चार रूढ आहे.

चन्द्र शब्दाचा उच्चार वेद-पूर्व काळी श्चन्द्र असा असावा या प्रा. राजवाडे याच्या तर्कास शिन्दूर आणि चन्द्र असे हे एकाच अर्थाचे उच्चारसादृश्याचे दोन शब्द बळकटी आणीत आहेत. अशाच तऱ्हेचा आणखी पुरावा दुसऱ्या काही शब्दांतूनहि मिळूं शकतो. उदाहरणार्थ चंपक शब्दच घ्या. चंपक या नावाचे औचित्य आपणास केवळ संस्कृत भाषेवरून कळणें शक्य नाहीं. पाचव्या प्रकरणात आरंभीं सुचविल्याप्रमाणे या शब्दातील ‘ चेन् ’ किंवा ‘ शेन् ’ या मूळ शब्दाचा अर्थ लक्षात घेतल्यास चेन्पक शब्दात सामावलेल्या अर्थाचें स्वारस्य आपल्यास कळणार आहे. चेन् किंवा शेन् म्हणजे सुवर्णासारखा रंग हा अर्थ पत्तिजनाच्या सर्व भाषातून आजहि निरनिराळ्या स्वरूपात आढळतो. चेन्पक म्हणजे सोन्याच्या रगाचे फूल—चाफा, या फुलात मुळातच हा अर्थ असूनहि तो मराठी भाषिकाच्या लक्षात येत नसल्यामुळे त्याला सोनचाफा म्हणण्याची पाळी आली! चेन्पक शब्दाला कानडीत ‘ सन्पगे ’ हा प्रतिशब्द आहे. ‘ चेन्पक ’ शब्दाचा तद्भव ‘ सन्पगे ’ अशीच समजूत आहे. पण असा उच्चारभेद असलेल्या शब्दाना तद्भव म्हणणे योग्य होणार नाही. एकाच शब्दाचे हे दोन भिन्न उच्चार आहेत.

पत्तिजनाच्या मूळ भाषेत ‘ च ’ कार आणि ‘ श ’ कार या दोन्हीचाहि उच्चार असलेले एक अक्षर त्या वर्णमालेंत असावे. हे आज तमिळ भाषेंतील अशा प्रकारच्या विशिष्ट अक्षरावरून ठरविणें शक्य आहे: ‘ ச ’ या अक्षराचा उच्चार तमिळ भाषेत ‘ श ’ आणि ‘ च ’ असा दोन प्रकारें केला जातो. प्रा राजवाडे यांनीं सूचविल्याप्रमाणें वेदपूर्वकाळीं ‘ श ’ व ‘ च ’ मधील उच्चार शेन्दुर—चेन्द्र, सन्पगे—चेन्पक, अशासारख्या शब्दातून स्वतंत्र दोन अक्षरात आज रूढ झालेला

दिसतो. पुढील काळात कर्णाटक-महाराष्ट्रातून यातील एकेक उच्चारच प्रचलित राहिलेला दिसतो. “ हे आम्हासी कानडे ’ अशी वृत्ति धारण केल्यास चेन्द्र, चेन्नक, शेन्दूर या शब्दातील औचित्याच्या आनंदास आम्ही पारखे होऊं. मराठीशी आपले कर्तव्य काय म्हणून दुर्लक्ष केल्यास कानडी शब्दाचा पूर्वेतिहास, त्याच्या अर्थाची वाढ, उच्चारातील बदल वगैरे कळणे मुष्किलीचें होईल. प्रा. राजवाडे याना पतिजनाच्या भाषाचा परिचय नसल्यामुळें त्याच्या लेखात या महत्त्वाच्या शोधाबरोबर एक मोठी गोमहि पण नकळत तशीच राहिली आहे. प्रा. राजवाड्याच्या मतें चन्द्र आणि मास् हे दोन्ही शब्द आर्यभाषावर्गीयच आहेत. ते लिहितात :—

“ चंद्र and मा: both meaning the Moon belonged to two separate groups of the Aryan race As in course of time these groups merged into one big race, so did their languages or dialects Hence the existance of synonyms. Some of these synonyms came unconsciously to be combined. Hence the origin of tautological compounds as चंद्रमा: ( चंद्र + मास् ). One comes across such instances in Marathi, though by their very nature, they number very few. ” ( page 277. )

वरील अवतरणांतील चंद्र आणि मास् हे दोन्ही शब्द आर्यवर्गीय भाषेमधील आहेत असा जो राजवाड्यानीं तर्क केला आहे तो मात्र निराधार आहे. कारण इंडोजर्मानिक् दुसऱ्या भाषेमध्ये चंद्र शब्द आढळत नाहीं. मास्-Moon, Mehn अशा प्रकारचे मासच्या लगतचे ( एकाच कुळीचे ) शब्द तेथें आहेत. वाल्डे आणि पाकर्नींच्या इंडोजर्मानिक कोशात चद्र शब्द मिळत नाहीं. संस्कृतांतसुद्धा चंद्र शब्दाला आरंभी आजचा ( चद्र=Moon ) हा अर्थ नव्हता. या विषयी मॅक्डोनेल आणि कीथ याचे मत विचारार्ह आहे. चंद्र, चंद्रमस् are the names of the Moon, the latter occuring onwards from the Rigveda, the former being first used in this sense by the Atharvaveda Very little is said about the Moon in Vedic literature, except as identified with Soma both alike being described as waxing and waning. ”

चंद्र शब्द विशेषणाप्रमाणें ऋग्वेदांतून वगैरे आरंभीं वापरला आहे. प्रा. राजवाडे यानीं सुचविल्याप्रमाणें दोन भिन्न भाषिकाचा संबंध रूढ होत जातो तसे दोन भिन्न भाषामधील समानार्थक शब्द मिळून एक सामासिक शब्द बनतो अशीं उदाहरणे सर्वत्र आढळतात. प्रा. राजवाडे यानीं सांगितल्याप्रमाणे मराठींत असे जोडशब्द महानुभाव साहित्यात आणि ज्ञानेश्वरीत सांपडतात. चक्रधराच्या लीळाचरित्रात नुसता कोल (काठी) शब्द वापरलेला आहे. कोल हा मराठी भाषेंतील शब्द नव्हे. नंतर त्याचा अर्थ मराठी लोकाना कळणें ज्ञानेश्वराच्या वेळी कठिण झालें असावे. तेव्हा कोल याचा अर्थ कळण्याकरिता मराठीतील काठी हा शब्द पुढे माडणे अवश्य झाले. ज्ञानेश्वरीत कोल–काठी हा शब्द आपणास पाहावयास मिळतो. याचप्रकारे ओली–शेला हें एक दुसरे उदाहरण होय. वल्ली हा शब्द कानडींत पाघरण्याचें वस्त्र या अर्थी आजहि सामान्यजनाच्या भाषेत रूढ आहे. ओली हा शब्द लीळाचरित्रात येतो, पण नरेंद्रकृत रुक्मिणी स्वयंवरात ओली–शेला हा जोडशब्द दृष्टीस पडतो. चंद्रमस् शब्दहि अशाचप्रकारें रूढ झाला असावा.

## रुद्रहि तांबडा, तर शिवहि तांबडा

चंद्रमस्प्रमाणें रुद्र–शिव हाहि जोडशब्द आहे असें मला वाटते. वेद-पूर्वकालीन पत्तिजनाचा देव शिव असून वेदात शिव शब्दाचें भाषांतर होऊन शिवानें रुद्र हें संस्कृत स्वरूप धारण केले असावे. शिन् किंवा चेन् या शब्दाला मुळात तांबडा असा अर्थ असल्याचे मागें सांगितलेंच आहे. ‘चेन्बु’ म्हणजे तांबडें भांडे–तांब्याचे भांडे–असा अर्थ आहे. तांब्या (ताम्र) प्रमाणे ‘चेन्बु’ (चेन्) शब्द अर्थपूर्ण असून चेन्बु म्हणजे तांब्यासारखें भांडें अशाच अर्थानें हा शब्द दक्षिणेत रूढ आहे. यावरून संस्कृत मानलेल्या शंभु शब्दातील खऱ्या अर्थाची सूचना आपणास मिळत आहे. शिव आणि शंभु या दोन्ही शब्दाच्या मुळात शिन् शब्द आहे. शंकराचाहि असाच अर्थ लागतो. शेन् (मंगल) करणारा–शंकर. शिन् याचा अर्थ तांबडा असा होतो. यामुळे या शब्दाचे औचित्यहि जास्त खुलून दिसतें. आपल्या देवताच्या मूर्ति निर्माण करण्यांत बरीच सांकेतिक भाषा वापरली आहे यात शंका नाही. देवतामूर्तींतील संकेताचा निश्चित अर्थ कळण्यास अजून निश्चयात्मक पुरावा पुढें आलेला नाही. मूर्तींतील

संकेतहि काहीं निरर्थक नाहींत. त्या संकेतात काहीं विशेष अर्थ आहे असें निश्चितपणें सागतां येईल आपल्यातील या संकेताचा अर्थ सागणारी परंपरा नष्ट झाल्यामुळें त्या सकेतापासून आज आपणास काही बोध होणें कठिण झालें आहे. शिवाच्या मूर्तीला (तिसरा) अग्निनेत्र का, याचा उलगडा अजून कोणी केलेला दिसत नाही. तसेंच शिवावरील चंद्र हें कशाचें सूचक हाहि एक तर्काचा विषय होऊन बसला आहे. आर्यांनी अग्निस्वरूपात शिवाला पाहिलें. 'रुद्रोवा एष यदग्निः' (तैत्तिरीय ५.४.१) शिवस्वरुपाचीं अशी वर्णनें आहेत. आर्यांना अग्नीत शिव दिसला, तर शेन्, चेन्, केन्–चंद्र हा शिवाचा प्रतीक होऊन पत्तिजनाना दिसला असावा. या कारणानें अग्नि व चंद्र हे दोन्ही सकेतरूपानें रुद्र–शिव–रूप रचण्यात समाविष्ट झाले आहेत. चंद्रवार हा अजूनहि शिवाचा वार म्हणून बहुजन समाजाकडून मानला जातो. सोम–प्रदोष शैवव्रतातील एक महत्त्वाचें व्रत आहे. सोम (चंद्र) वार हा शिवाचा वार समजला जातो तें काही निष्कारण नव्हे.

## शिव म्हणजेच मंगलकारक

रुद्र हा उग्र अशी आर्यांची कल्पना, आणि त्याचा उग्रपणा कमी करण्याकरता त्याला शिव हें मगलकारक विशेषण लावले गेले असावें अशी एक समजूत आहे. पण शिव शब्दातील रहस्य निराळेंच आहे. शिवकुळीचे (Cognates) सर्व शब्द लक्षात घेता तें रहस्य चागलें लक्षात येईल. शिन् किंवा शेन् हा शब्द केन् आणि चेन् अशा स्वरूपातहि पत्तिजनाच्या निरनिराळ्या भाषातून रूढ आहे. शेन्, चेन्, केन् या तीन्ही शब्दाचा मूलार्थ ताबडा हाच आहे. केन्पासून केन्पु हा शब्द लाल या अर्थी कानडीत रूढ आहे. चेन् किंवा चिन् यापासून निष्पन्न झालेले पुष्कळ शब्द कानडीत आजहि रूढ आहेत. चेन्न याचा अर्थ छान असा आहे. मला वाटतें मराठीतील छान हा कानडींतील चेन्न याचेंच एक रूप आहे. आधुनिक मराठींतील छान हा शब्द जुन्या मऱ्हाटीत 'चाग' या रूपानें वावरत असलेला आढळतो. 'महानुभाव साहित्य' 'ज्ञानेश्वरी' वगैरे ग्रंथातून 'चाग' हा शब्द हरघडीं येतो. महाराष्ट्र शब्द कोशांत 'चाग' शब्दाचा कानडी 'चेन्न' (सुंदर) या शब्दाशीं संबंध दाखवितात. पण छान हा शब्द अरबी भाषेतून आला असावा असे त्यांना

वाटतें. तें काहीं असो, चांग शब्द तरी चेन्न शब्दाच्या जवळचा आहे यांत शंका नाहीं. चेन्न म्हणजे चागला असा व्यावहारिक अर्थ असून, मुळात त्याचा ताबडा असा अर्थ आहे.

आर्य आणि पत्तिजनाच्या दृष्टिकोनातील काहीं एक विशिष्ट फरक या ठिकाणी स्पष्ट होत आहे. आर्यांना शुभ्र वर्ण प्रिय, तर पत्तिजनाचा ताबडा रंग आवडता आहे. गौरी ही आर्यांची सौंदर्यदेवता. गौरवर्ण असलेली ती गौरी. गोरेपणा हे आर्यांत सौंदर्याचें लक्षण मानलें जातें. शुभ आणि शुभ्र हे एकाच धातूपासून निष्पन्न झालेले शब्द आहेत. आर्यांना शुभ्र रंग शुभसूचक वाटतो. यामुळें आर्यांच्या वर्णनात शिव कर्पूरधवल ‘ गौराग ’ झाला, पण रुद्राध्यायातील वर्णनावरून हा मुख्यतः कोणत्या जनाचा देव हें कळून येण्याजोगे आहेः ‘ पत्तीना पति ’ ( रुद्र ). शिव हा मुळात ‘ गौराग ’ नव्हे, कारण शिव म्हणजे लाल, ताबडा असा तेथे अर्थ आहे. आधुनिक तज्ज्ञ रुद्र शब्दाचाहि ताबडा असाच अर्थ करतात. ‘चागला आहे’ असें म्हणावयास कानडीत ‘ चेन्नागिद्दाने ’ असें म्हणतात. ‘ चेन्न ’ आणि ‘ केन्न ’ हे दोन्ही एकच शब्द आहेत. ‘ चेन्नागिद्दाने ’ याचा अर्थ लालसर, रक्तवर्णयुक्त असा होतो. लालपणात पत्तिजनाना सौंदर्य साठविलेलें दिसत असे. लक्ष्मीच्या सौंदर्याचें वर्णन करतेवेळीं ‘ तप्त–काचनसन्निभाम् ’ आणि ‘ सूर्याभाम्, चंद्राभाम् ’ असे म्हटलेले आहे. कानडीत मुलीच्या सौंदर्यसूचक वर्णाबद्दल बोलताना ‘ केंपगिद्दाळे ’—लालसर आहे, गव्हासारखा ताबूस रग आहे असे अजूनहि म्हणतात, तर ब्राह्मणात ती गोरी आहे असे सागण्याची चाल आहे. यावरून या दोघाच्या सौंदर्याच्या कल्पनातील मूळ फरक लक्षात येईल. छान–चाग म्हणजे लाल असा अर्थ आता निश्चित ठरतो. सुंदर, शुभकारक म्हणजे चागलें, तेंच ताबडे; हाच अर्थ शिव शब्दात सामावलेला आहे. बाहेरून त्याला मंगलकारक असा अर्थ चिकटविण्याची जरूरी नाही. तर मुळात धात्वर्थच तसा आहे.

शिवदर्शन होणें म्हणजे त्याच्या धात्वर्थाप्रमाणे लाल दर्शन होणें. ध्यानावस्थित योगिजनाना ज्योतिस्वरूपात होणाऱ्या दर्शनाला शिवसाक्षात्कार झाला असें मानण्याची परंपरा आहे. अंतश्चक्षूंस होणाऱ्या या साक्षात्काराप्रमाणें बहिश्चक्षूंस होणाऱ्या दर्शनाचेहि काही चमत्कारिक प्रकार आहेत. सृष्टवस्तूंतील

तांबूस रंगाचे पदार्थ-विशेष त्याना जास्त आवडते झालेले दिसतात. ‘ सु-वर्ण ’ हें अशापैकींच एक आहे सुवर्णाला कानडींत चिन्न असा अर्थ आहे. चिन्न हा शिन्-चिन् या शब्दाच्या वर्गातील होय. ‘ कोल्ह्याचे तोंड पाहणें ’ हे शुभदायक आहे अशी एक जुनी समजूत आहे. कोल्हा या शब्दानें या रुढींतील मर्म लक्षात येणें शक्य नाही जंबुक किंवा शंबुक असे दोन पर्याय शब्द कोल्ह्यास संस्कृतात आढळतात. शिव म्हणजेहि कोल्हा. कोल्हा दिसणें म्हणजे तांबडे ( चांग ) दर्शन. जंबुकेश्वर नावाची शिवालये बऱ्याच ठिकाणी आहेत. शंबु ( शंभु ) आणि जंबु शब्द तुलनीय आहेत.

गणपति हा शिवपुत्र हे सुविख्यात आहे. गणपतीच्या अंगाला सेंदूराची उटी का याचें मर्म यावरून कळण्याजोगें आहे. वेदातून मरुताना ‘ रुद्रीय ’, ‘ रुद्रपुत्र ’, असे संबोधलेले आहे. नारदीयपुराण पूर्वभाग ( ७९-३५३ ) यात मारुति हा रुद्रांश असें वर्णन केलेलें आहे. मारुति रुद्रपुत्र असल्याचें दर्शविण्याकरिताच त्याच्या सर्वांगाला शेंदूर फासण्याची प्रथा महाराष्ट्रात पडली नसेल ना ? बिभीषणकृत असें प्रसिद्ध असलेल्या ‘ हनुमत्स्तोत्र ’ यांत ‘वडवानल हनुमान् देवता’ ‘महावीर रुद्रावतार’ अशी विशेषणें आहेत. मारुतीच्या अभिषेकाचे वेळी रुद्राध्यायातील मंत्र म्हणण्याची प्रथा आहे. समर्थ रामदासकृत—“ भीमरूपी महारुद्रा... ” हे स्तोत्र सुविख्यात आहे. यातील महारुद्रा हा शब्द मननीय आहे.

‘ कालाग्नि, ’ ‘ कालरुद्राग्नि ’ हीं विशेषणेहि लक्षात घेण्याजोगी आहेत. श्रीसमर्थांच्या या वर्णनात वेदकाळापासून या रुढींत सामावलेल्या शिवरुद्रातील मूळ लालपणाच्या अर्थाचा पुरेपूर साक्षात्कार घडत आहे. “ असौ यः ताम्र अरुण उतबभ्रुः ” असें सांगून पुढे जें सुमंगल पद वापरलें जातें तें ‘ शिव ’ शब्दाचा अर्थ विशद करणारें विवरणात्मक भाष्य आहे. शिव म्हणजे लालसर. असें लालसर दर्शन आकस्मिक रीतीनें घडणे हे शुभसूचक, मंगलकारक असें मानलें जातें. चंद्राप्रमाणे शिव हा शिन्-चेन् या मूळ शब्दापासून बनलेला शब्द हे जर निश्चित ठरेल तर ज्या पत्तिजनाच्या भाषेतील हा शब्द, त्या पत्तिजनाचाच तो मूळ देव असावा हें स्वतःसिद्धच होईल.

## हट्टिकारांचा हाटकश्वेर

पत्तींच्या जिवाभावाचा देव म्हणूनच शिवाला 'पत्तीनाम् पति' असें वैदिक ऋषींनीं संबोधिलें आहे यात शंका नाहीं. पत्तिजन पुढें हट्ट किंवा हटगार या नावानें ओळखले जाऊं लागल्यानंतर त्याच्या देवाचेंहि तशाच प्रकारचें नामांतर झालें असल्यास नवल नाहीं. पत्तींचा पति तसें हट्टांचा पति–तो हाटकेश्वर होणे साहजिक आहे. नाशिकच्या त्र्यंबकेश्वराला हाटकेश्वर असें पर्याय नाव एकेकाळी होते हें मागे सागितलें आहेच. हाटकेश्वराची क्षेत्रे दक्षिणापथात ( नर्मदा ते कावेरी ) अनेक आहेत. गुजराथेंत वडनगर येथें हाटकेश्वराचें प्राचीन प्रसिद्ध देवस्थान आहे. श्रीशैलमल्लीनाथालाहि हाटकेश्वर असें नाव असल्याचें यापूर्वी आले आहे. पेशवे दप्तरातून गोकर्णाला हाटकेश्वर म्हटल्याचे आढळतें. या प्रदेशाना गोपराष्ट्र किंवा गोराष्ट्र अशीं नावें काहीं काळ होती. गोवा या नांवाचे शहर गोकर्ण भागातच आहे. नाशिकच्या भोवतालच्या प्रदेशाची महाभारतकाळी गोपराष्ट्रात गणना होत होती. या भागातील गोदा नदी त्या प्राचीन गोपराष्ट्राच्या नावाची ग्वाही आजहि देत आहे. ( वैद्यकृत महाभारताचा उपसंहार, नकाशा पहा. १९१८. ) गोदानदी, गोपराष्ट्र आणि त्र्यंबकेश्वराला असलेले हाटकेश्वर असे पर्याय नाव या तीन्ही गोष्टी या भागातील प्राचीन हट्टिकार वसाहतीची स्पष्ट साक्ष देत आहेत.

वऱ्हाट ( मरहट्ट ) हे नाव हट्टिकारवरून आले असले पाहिजे; या पूर्वी केलेल्या विवेचनाला त्र्यंबकेश्वराचे हाटकेश्वर हे नाव पुष्टि देत आहे. हट्टिकारजन एकेकाळीं येथें प्रामुख्यानें वसाहत करून राहिले होते म्हणूनच या प्राताला 'हाटक हे नाव रूढ झालें असलें पाहिजे हें निराळे सागण्याची गरज नाहीं. मागें सुचविल्याप्रमाणें रामदासाच्या एका आरतींत आलेला 'हाटक' देश तो हाच !

नाशिक खानदेशांतील कानड गवळ्यांच्यासंबंधीं मागील प्रकरणीं विवेचन आलें आहे. आता या भागांतील वीरगळाविषयी आणखी एकदोन गोष्टीची येथें आठवण देणे अप्रस्तुत होणार नाहीं. वीरगळ हें प्राचीन हट्टिजनांचें वैशिष्ट्य आहे. या प्रकारच्या स्मारक शिला तेलगू किंवा तमिळात नाहींत. श्री. पी. टी. श्रीनिवास अय्यंगार व डॉ. एस्. कृष्णस्वामी अय्यंगार यांनीं अनुक्रमें

History of Tamils आणि Some Contributions of Southern India to Indian Culture या ग्रंथात हे वीरगळ वडुकराचें म्हणजे कर्णाट (महाराष्ट्र) जनाचें वैशिष्ट्य होय असें प्राचीन तमिळ साहित्यातील आधारावरून विवरण केलें आहे. हट्टिकार गौळि याचे वैशिष्टय दाखविणारे हे वीरगळ नाशिक जिल्ह्यात पुष्कळ आहेत असे तेथील गॅझेटियरवरून कळतें.

कर्णाटात तर या प्रकारच्या स्मारक शिला नसलेले जिल्हेच आढळणार नाहींत. या शिलाच्या खालीं एकदोन ओळीच कोरलेल्या असतात "...तुरुवं मगुळ्चि पगेयं कोंदु मग्गमं संदोन्" अशा प्रकारचें वाक्य त्या शिलवर असतें. "अमुक गांवच्या गौडानें आपल्या गावच्या गाई पळवून नेणाऱ्या शत्रूचा संहार करून त्या परतवून आणून येथें स्वर्गारोहण केलें," अशा प्रकारें कोरलेल्या या वाक्यावरून हे वीरगळ (स्मारक शिला) कोणाचे आणि कशाकरिता रोंवले गेले असावेत यावर चागलाच प्रकाश पडतो. नाशिक जिल्ह्यातील या शिला (वीरगल्लु) हट्टिकार वीराच्या धैर्य-शौर्याचे, त्यागाचें व आत्मबलिदानाचें अमर स्मारकच होत. या वीराबरोबर काही ठिकाणी त्याच्या सतीनीं सहगमन केलेलें असतें. अशा सतींच्याहि स्मारक शिला कर्णाटात जागोजाग आढळतात. याना "मा(हा) सती कल्लु" (महासतीचा दगड) अशी संज्ञा आहे. अशा कांही ठिकाणी देवीची कल्पना करून जत्राहि भरत असते. वीर (देव) पूजेचा हा प्रकार थोड्या निराळ्या तऱ्हेनें धनगर-मराठ्यात आजहि प्रचलित आहे. टाकाची पूजा हा प्रकार कर्णाट-महाराष्ट्रात या जनात आहे. स्मारकावर शिवलिंग स्थापून देवालयेंहि बाधलेली आढळतील. नाशिक जिल्ह्यातील वीरगल्लु व खानदेश नासिक, नगरकडील कानड गौळी वगैरे गोष्टींवरून त्या भागास हट्टिकाराचें माहेरघरच म्हणणे अयोग्य होणार नाहीं, आणि म्हणूनच याला हाटक देश असे नाव आलें. नाशिक खानदेश विभागात हट्टिकार जनच प्रमुख, प्रबळ व बहुसंख्य असावेत. यामुळेच या जनावरून त्याच्या आराध्यदेवतेला हाटकेश्वर असें नाव मिळाले असणें शक्य आहे.

## कालेश्वर-कल्लेश्वर

या संदर्भानें शिवाच्या आणखी एका नावाच्या अर्थावरहि नवीन प्रकाश

पडत आहे. कर्णाटाच्या खेड्यापाड्यातून तेथील शिलालेखात उल्लेखित "मूल-स्थान कल्लेश्वरा" ची देवालयें आढळतात. "कल्लय्या" हे नाव कर्णाटकात फार रूढ आहे. 'कल्लु' म्हणजे दगड हा अर्थ येथें नसावा असें वाटते. हीं स्वयंभू स्थानें आहेत असे पुष्कळ ठिकाणी सागितले जातें. या स्वयंभू शिवाच्या स्थानाविषयीं सर्वत्र–सामान्य अशी एक कथा सागितली जाते : गुराख्यानीं गाई चरावयास नेल्या असता रानात एका वारुळाशेजारी किंवा एका दगडावर गाईस पान्हा फुटून दुधाची धार येणें, या गोष्टीनें आश्चर्य वाटून गुराखी किंवा गावकरी यानी ती जागा शोधून पाहणे आणि तेथें स्वयंभू शिवाचें जागृत स्थान आहे असे आढळून येणे, अशाप्रकारची दतकथा असलेली शिवालयें गावोगाव पुष्कळ ठिकाणीं दिसतात. या स्वयंभू शिवाचा याप्रमाणें दुधाशी येत असलेला संबंध चिंत्य आहे. कल्–कळ् हा कंदमिळ वर्गातील प्राचीन शब्द आहे. हा रसार्थक शब्द असून 'पालु' प्रमाणे याचा दूध असा अर्थ आहे. कल् यावरून कल्लेश्वर म्हणजे दुधाचा देव. हट्टिकाराचा देव या अर्थाचा हा आणखी एक शब्द. कर्णाट व तमिळ देशाच्या प्राचीन इतिहासात 'कळ्ळर्' 'कळवर्' जन व या नावाचे एक राजघराणेहि होतें याविषयी पुरावा मिळतो.

शिलालेखातून आढळणाऱ्या "मूलस्थान कल्लेश्वरा" ची देवळे डोंगरावर किंवा पर्वतावर आढळली असतीं तर कल्लु याचा अर्थ दगड असा करणें सयुक्तिक झालें असते. पण बळ्ळारी विजापूर वगैरे भागात शिलालेखात आढळणारा कल्लेश्वर डोंगरावर नसून साध्या जमिनीवर आहे. 'कल्लेश्वर' नावाची आणखी काहीं रूपे आढळतात. "कल्मेश्वर" यात याचे संस्कृतीकरणाचा प्रयत्न दिसतो. कल्मेश्वराला 'कल्लिनाथ' असे नाव वीरशैव वचनातून वगैरे येतें. जुन्या वीरशैव काव्यातून हें नाव आलें आहे. 'कल्लेश्वर', 'कालेश्वर' वगैरे नावे ठेवण्याची प्रथा दक्षिणेंत रूढ आहे. कल्लय्य नावाच्या व्यक्ति वीरशैवात पुष्कळ आहेत. कल्लप्पा हें सर्व जातीच्या लोकात रूढ आहे. कल्लची काल, काळ ही रूपें होत. कालेश्वर, काळेश्वर, हें नाव उज्जयिनीच्या (महान्) काळेश्वराची आठवण आणून देतें. आणि हा कालेश्वर हट्टिकाराचा कुळदेव असणें संभवनीय आहे.

ईंदूर, खानदेशाच्या पंचक्रोशीत प्राचीन काळी हट्टिकाराच्या शाखेपैकीं

कण्ण नामक जनांची ( नट किंवा राष्ट्रिकाचे संबंधी ) वसाहत होती आणि खानदेश या नांवांत कण्णजनाचा निर्देश आहे हें मागील प्रकरणीं दाखविलें आहे. Nattar (नाट्टर) the title of certain castes as कळ्ळर् etc. असें थर्स्टन सांगतो. या कण्ण शब्दाचें 'कळ्ळ' हें पूर्वरूप आहे. कानडी बोलींत ळ ' काराचा ' ण ' कार होतो. ( उदा:-मुळुगु-मुणुगु, सरपळी-सरपणी, वगैरे ). यावरून कण्णजनाचें जुनें नाव ' कळ्ळ असे होते हें सिद्ध होतें. कळ्ळर् व कळवर् जनाच्या अस्तित्वाविषयीं वर लिहिले आहे. ' कळवर् ' ' कळभ्रर् ' या नावाचें घराणें इतिहासात नमूद आहे ( History of Tamils page 536 ). वातापी चालुक्यानी कळभ्राचा पाडाव केल्याचे इतिहास सागतो.

कळ्ळ-हे कण्णचे प्राथमिक रूप असून पुढें ' ळ ' काराचा ' ण ' कार होऊन ' कण्ण ' रूप सिद्ध झाले. धारवाड जिल्ह्यात व म्हैसूरकडे कण्णेश्वराचीं देवालयें आहेत. कण्णेश्वर नावामुळें काही संशोधकाना या कण्णाचा कृष्णाशीं संबंध जोडण्याचा मोह उत्पन्न झाला. कण्णेश्वराचें कृष्णेश्वर असे नामांतर सुद्धा झालें. पण हा घोटाळा साक्षेपी तज्ज्ञाच्या लक्षात आल्याविना राहिला नाहीं कण्णचें संस्कृतीकरण होऊन कर्ण होऊं शकतें; कृष्ण होणे शक्य नाहीं. कृष्ण व्हावयास कण्ह असें मूळ रूप असावयास पाहिजे ( Ep. Carnatica IX. HR 30, & XI Dg. 94, 96, 103 etc ). कन्न शब्दाचा कृष्ण शब्दाशी काही संबंध नाही असें डॉ. ल्युडर्स यानीं स्पष्ट विवरण केलें आहे. " the Kanarese equivalent is कन्नर where as both कन्न and कण्ण represent the Sanskrit कर्ण " (Ep Ind. IV p. 336 ). कन्न ( कण्ण ) चा कण्हशी घोटाळा केल्यानेंच खानदेशाचा कृष्ण देश बनविण्याची चूक झाली आहे. असो.

उज्जयिनीचा कालेश्वर या भागातील अतिपुरातन कळवर्-कण्णरजनाचें अस्तित्व दर्शविणारा देव आहे असें वरील विवेचनावरून दिसून येईल.

## लिंग आणि शिव भिन्न आहेत

शिव ही देवता वेदपूर्वकालीन म्हणजे पत्तिजनांची आहे हा विचार बऱ्याच विद्वानाना मान्य आहे. पण शिव आणि लिंग हे एकच अशी कल्पना

अजून बरीच सार्वत्रिक असलेली दिसते. मोहेंजोदारो, हराप्पा वगैरे ठिकाणीं मिळणाऱ्या लिंग आणि योनिप्रतीकाचा संबंध शैव पंथाशीं लावण्याचा प्रयत्न बऱ्याच विद्वानानी केला आहे. पण यांत वैचारिक गोधळ दिसतो. मुळात हे दोन्ही पंथ निरनिराळे असून कालक्रमानें त्याचा समन्वय करण्याचा प्रयत्न झालेला आहे. हरि आणि हर यामध्यें ऐक्य दाखविण्याकरिता हरिहर देवता प्रचारात आली. तसाच प्रकार लिंग आणि शिव या देवतामध्येंहि झाला असावा. वेदपूर्वकाळीच, शिव आणि लिंग हे दोन्ही अभिन्न स्वरूपात प्रचारात असल्यास, वेदांत शिवरुद्राचें वर्णन करतेवेळी त्याच्या लिंगरूपाचाहि उल्लेख यावयास पाहिजे होता. पण वेदातून तसें वर्णन कुठेच आढळत नाहीं. पुराणात हा प्रकार दृष्टोत्पत्तीस येतो. वेदातील " शिश्नदेवाः " ( ७. २१. ५ ) या वाक्यात लिंगपंथीयाविषयीं तिरस्कार ध्वनित होतो असे पुष्कळ आधुनिक विद्वानाचें मत आहे. रुद्रशिवाविषयी थोडीतरी आत्मीयता वैदिक साहित्यात आढळते. पण पुराणकाळपर्यंत लिंगमाहात्म्य वर डोके काढू शकले नाही; तोपर्यंत ते गुप्तपणें आत दबूनच होतें. लिंग शब्दाची व्युत्पत्ति संस्कृतात मिळत नाहीं. तो शब्द आस्ट्रो–एशियाटिक् भाषेतून आला असे काहीं विद्वानाचें मत आहे:–
" It is clear from what has been written, that the history of a word like **Linga** is not without importance for the study of religion A series of study meant to prove that a certain number of myths, legends and tales of Aryan India, have been borrowed from Astro-Asiatic people ( Pre–Aryan and Pre–Dravidian pages 8-15 )

लिंग शब्द ज्या भाषेतून आला त्या लोकाकडूनच हा पंथ उचलला गेला असणें शक्य आहे. हिंदुधर्मातील समन्वयाकडील आत्यंतिक प्रवृत्ति लक्षात घेतां निरनिराळ्या देवाचे एकीकरण कसें होत गेलें हे चटकन् लक्षात येईल. कर्णाटकात शिवाचे आत्यंतिक वीरभक्त आहेत, त्याना वीरशैव असें नांव आहे. यानाच लिंगवंत असेंहि दुसरें एक नाव रूढ आहे. एकाच विशिष्ट जातीला एकापेक्षा अधिक नावें आली असल्यास त्याच्या मागील कारणपरंपरा अभ्यसनीय असते. कारणाशिवाय कोणतीहि गोष्ट रूढ होत नसते. या पंथास रूढ असलेलीं हीं दोन नावें लिंगपथ व शिवपंथ हे दोन निराळे मार्ग असल्याचें

सुचवीत आहेत. या दोन्ही पंथाचा समन्यय झाल्यानंतर त्या जातीला तीं दोन्ही नावें प्रचारात आली. आजच्या वीरशैव उर्फ लिंगायतांत दोन कडवे पक्ष आहेत. एक पक्ष आपणास पंचाचार्यांचा म्हणवितो; दुसरा श्री बसव अल्लमांच्या शून्य सिंहासनाच्या पंथात मोडतो. पहिल्या पंथात आराध्यब्राम्हणहि आहेत. ते काहीं होम हवनें सुद्धा करतात. पण दुसऱ्यास वैदिक आचार बिलकुल खपत नाहींत. जुन्या काहीं ग्रंथातून 'लिंगिनः' याच्याबद्दल जितका तिरस्कार दाखविला आहे तितका शैवाच्याबद्दल नाही. तसें जर असतें तर वेदातून रुद्रशिवाचे वर्णन आलेंच नसते. भागवतातील शैवपंथीयाविषयींचा तिरस्कार, लिंग आणि शिव या दोन्ही पंथाच्या ऐक्यानंतरचा असला पाहिजे. वेदात रुद्राविषयी इंद्र–अग्नीइतकी आपुलकी दिसत नसली तरी शिश्नदेवाइतका तिरस्कार खचित नाहीं.

पण कालप्रवाहात ओघाओघानें आपण आधी तिरस्कारानें टाकलेल्या गोष्टी स्वीकारण्याची पाळी येते. वेदकाळी रुद्रशिवाला जवळ करून लिंगपंथ दूर केला. श्वेताश्वतरोपनिषदात रुद्राचे आत्यंतिक वर्णन आलें आहे. पण त्या काळापर्यंतहि शिवाला लिंग असें व्यक्तपणें कुठेहि म्हटलेलें नाही. वैदिक साहित्यात शिव या अर्थी लिंग शब्द कोठें आढळत नाहीं. पण "वह्नेर्यथा योनिगतस्य मूर्तिः न दृश्यते नैवचलिंग नाशः (१. १२). या श्लोकात श्वेताश्वतरोपनिषद कर्त्यानें लिंग आणि योनि हे दोनहि शब्द फारच सूचक रीतीनें व बहारीनें योजिलेले आहेत. काष्ठगर्भात सूक्ष्मरूपानें असलेला अग्नि, दृष्टीस पडत नसला तरी लिंग (संकेत) रूपांत तो असतो. लिंगस्य–सूक्ष्मरूपस्य, असा शांकरभाष्यात लिंग शब्दाचा अर्थ केलेला आहे. श्वेताश्वतरोपनिषदातील काष्ठयोनि व अग्निलिंग या शब्दयोजनेत बरेंच मार्मिक कौशल्य दाखविलेलें आहे. त्याकाळीं लिंगयोनिपंथ (शाक्तपथ) अस्तित्वात होता हें या विशिष्ट उल्लेखावरून कळण्याजोगें आहे. पण तो पंथ शिष्टमान्य असा अजून झालेला नव्हता. त्याकाळी अजून बऱ्याच शुद्ध शैवपंथीयांना, लिंगरूपात शिवाची आराधना पसंत नसावी. यामुळेंच शिवाला लिंग म्हणण्याचें धाडस या उपनिषत्कर्त्यास झालें नाहीं. "अंतः शाक्तः बहिः शैवः" हा प्रकार शंकराचार्यांच्या काळापर्यंतहि दिसतो. योनिलिंगपंथ हा गौणमार्ग आहे–वाममार्ग आहे अशी त्या काळींच काय अजूनहि समजूत

आहे. पण योनिलिंगपंथहि क्रमाने वरचढ झाला. अशावेळीं शिव हाच प्रत्यक्ष लिंग असें सागून या पंथाला शिष्टमान्य करण्याचा प्रयत्न झालेला आहे.

## मल्लय्या–मल्हारी

मराठे मुळात शिवभक्त. खंडोबा मराठ्याचा मोठा आवडता देव. या देवाचें खंडोबा हें नाव अर्वाचीन आहे, पण त्याचे प्राचीन नाव मल्हारी–मार्तंड असे आहे. खंडोबाच्या जत्रेंत 'येळुकोटी' बरोबर 'हरहर महादेव', 'जय मल्हारी' अशा गर्जनाहि ऐकूं येतात. महाराष्ट्राच्या प्राचीन साहित्यात खंडोबा हे नाव मिळत नाही. मल्हारी हा शब्द महानुभाव साहित्यात आढळतो. महाराष्ट्रात या देवतेस मल्हारी, भैराळ, मल्हारी–मार्तंड म्हाळसा-मार्तंड वगैरे निरनिराळी नावे आहेत.

खंडोबा–मल्हारी हा शिवाचेंच दुसरे रूप आहे, अशी भाविक लोकाची श्रद्धा आहे. पण खडोबाची मूर्ति पाहिली तर त्यात शिवाच्या स्वरूपाशी संलग्न अशा महत्त्वाच्या दोन गोष्टीचा अभाव उठून दिसतो. शिवाचे वाहन नंदी, पण खंडोबाचे वाहन घोडा! शिव हा त्रिशूलधारी, तर खंडोबा खड्गधारी! खंडोबा हा वीराचा देव असें समजलें जातें, शिव हा भोळा शंकर, केवळ वरदान करण्यात प्रख्यात असलेला देव आहे. शिवाय असुराचा संहारक तर नव्हेच. मणि–मल्लासुराचा खंडोबा (मल्हारी) ने नाश केल्याचें पुराणात वर्णन येतें. विरोधकांच्या संहाराकरिता शिव पुढे आलेला क्वचितच आढळतो. तशा वेळीं वीरभद्र किंवा सेनानी षण्मुखाची तशा कामावर योजना केली जाते. यामुळें खंडोबा हा शिवाचाच अवतार असणें कसे शक्य आहे अशी शंका वाटून जाते.

## खड्गधारी खंडोबा हा कार्तिकेय नव्हे

खंडोबाचा संबंध 'स्कंद' शब्दाशीं कांहींजण लावतात. 'स्कंद' असें षण्मुखाचें एक नाव आहे. या दोन्ही शब्दातील साम्यावरून खंडोबाला 'स्कंद' (कार्तिकेय) बनविण्याची खटपट कांहींनी केली आहे. ओपर्टनामक साहेबाकडून असा प्रयत्न प्रथम झाला असें दिसते. ते आपल्या ग्रंथात म्हणतात : " He (कार्तिकेय) is everywhere revered as household deity and

numerous temples are erected for his worship The shepherds claim him as tutelary deity. He is most frequently represented as riding on horse-back, attended by a dog and accompanied by his wife म्हाळसा, another form of पार्वती. As he generally carries in his hand a big sword, his name is popularly derived from *khande* ( sword ),(डॉ. ए. पी. करमरकर याच्या Religions of India या ग्रंथावरून उद्धृत. खंड १, पा. १६४ ).

ओपर्टनीं शेवटच्या वाक्यात खंडोबा हें नाव त्या देवतेच्या हातातील खड्गावरून आल्याचें नमूद केलेंच आहे. शिवाला त्याच्या धनुष्यावरून ‘ पिनाकी ’ किंवा ‘ त्रिशूली ’ अशीं निरनिराळी नावें आली आहेत. पण शिव खड्गधारी होता अशी परंपरा पुराणात आपल्याला आढळत नाही. तर मग खड्गधारी आणि अश्वारोही अशी ही कोणती देवता असावी ?

ओपर्टसाहेबाना, या देवाला कार्तिकेय म्हणजे खंडोबा असे म्हणतांना खरोखर दोन गोष्टीची अडचण भासावयास हवी होती. त्याच्याच वरील अवतरणात या दोन विसंगती उघडपणे नमूद आहेत. पण त्या त्याच्या ध्यानात आल्या नाहीत. कारण त्याना पूर्वपरंपरा इतक्या सूक्ष्मपणें माहीत असणे शक्य नाहीं. पण आपल्याकडील विद्वानहि त्याचीच री ओढतात तेव्हा मात्र त्याची कींव येते. कार्तिकेयाचें वाहन मयूर. पण ओपर्टनी ज्याला खंडोबा ठरविले तो अश्वारोही आहे. शिवाय, खंडोबासमवेत असलेल्या स्त्रीमूर्तीचे नाव म्हाळसा असें तेच स्पष्ट सागतात ! आणि ही म्हाळसा म्हणजे पार्वतीचे दुसरे स्वरूप असे ते स्वतःच पुढे म्हणतात. आता पहिली गोष्ट : कार्तिकेय हा ब्रह्मचारी आहे. स्त्रीयानी कार्तिकेयाचे दर्शनहि घेऊं नये अशी पूर्वापार चाल आहे. तशात खंडोबाबरोबर असलेली स्त्री पार्वती, कार्तिकेयाची पत्नी म्हणणे तर अत्यंत विसंगत आहे ! पार्वती ही स्कंदाची–कार्तिकेयाची आई होय. याकरिता खंडोबा म्हणजे स्कंद–कार्तिकेय, असे भारतीय परंपरा जाणत असलेला कोणीहि म्हणूं धजणार नाहीं.

मल्हारी-खंडोबाला कार्तिकेय म्हणणें श्री जाधवरावानाहि पसंत नव्हतें. ‘ किर्लोस्कर ’ मासिकाच्या एका अंकात लिहिलेल्या ‘ खंडोबा ’ वरील लेखात

त्यानीं याकरिताच खंडोबा शब्दाला दुसरी व्युत्पत्ति सुचविली आहे, असें मला स्मरतें. शिवाला 'खंडपरशु' असें पर्यायनाव असून त्याचाच पर्याय खंड्या, खंडोबा झाला असावा, असें त्याचे मत आहे. पण खाडेय किंवा खंडोबा हें नाव त्याच्या खड्गावरून आले असल्याने या व्युत्पत्त्याच्या परिश्रमाचें कारण राहात नाही.

महानुभाव–साहित्यातून वगैरे आढळणाऱ्या जुन्या 'मल्हारी' या नावाच्या ठिकाणी खंडोबा हे नाव कसें पुढे आले असावे ? या देवतेच्या हातातील खड्गावरून हे नाव रूढ झाले असणे शक्य आहे, नव-रात्रात महानवमीच्या दिवशी आयुधपूजा करण्याची चाल आहे, त्यात खड्गास असलेल्या महत्त्वामुळे या दिवसाला 'खडेनवमी' असे म्हणण्याची रूढि आहे. महानुभाव भास्कर कवीच्या 'रुक्मिणीस्वयंवर' काव्यात एके ठिकाणी 'खाडेबाहो' असा प्रयोग येतो. खंडोबा हे नाव कसे प्रचारात आलें असेल याची सूचना वरील 'खाडेबाहो' या वाक्प्रचारावरून मिळण्याजोगी आहे. 'खाडेबाहो' मल्हारी हा पुढें 'खडोबा' असा ओळखला जाऊं लागला असणे शक्य आहे.

## कर्णाटांत मल्लय्या : महाराष्ट्रांत मल्हारी

खंडोबा हें नाव कर्णाटात प्रचारात नाही. खंडोबाऐवजी मल्हारी जास्त रूढ आहे. पण कानडी लोकात याहूनहि काहीसे निराळे 'मल्लय्या' असे नाव सर्रास प्रचारात आहे. खडेराव, मल्हारी किंवा मल्हारराव ही नावें ब्राह्मणवर्गात किंवा मराठ्यातच आढळतील. कानडी ब्राह्मणात मल्हार हे नाव आहे, पण खडो हे नाव केवळ मराठी भाषिकातच रूढ आहे. यावरून कर्णाट व महाराष्ट्र हे एकमेकापासून दूर झाल्यानंतर, महाराष्ट्रात या देवाला खडो हे नाव प्रचलित झालें असले पाहिजे. पण मल्हार हें नाव याहून प्राचीन आहे. हे दोनहि प्रात अजून अलग नसताना–कर्णाटात महाराष्ट्रीकरण चालू असल्यावेळी या प्रदेशात मल्हारी हे नाव लोकप्रिय झाले असले पाहिजे. देशस्थ ब्राह्मणात (देशस्थ म्हणविणारे या दोनहि प्राताचे आहेत) मल्हारी हे अनेकाचे कुलदैवत आहे. आणि कर्णाटकात ही घराणी तुंगेच्या उत्तरेस विशेष दिसतील.

कर्णाटकीयात महाराष्ट्रीकरण चालू असतेवेळी हे नाव नर्मदेच्या दक्षिणेस प्रचारांत आले असावे. या विधानास पुष्टि देणारी काही कारणे आहेत. कर्णाटातील मूळ जनाची ज्यानी परंपरा राखिली आहे असे म्हणता येईल, त्या लोकांत मल्हारी हें नाव रूढ नाहीं. लिंगायतात व कुरुब ( कानडी धनगर ) वगैरेंमध्यें मल्लय्या, मल्लप्पा, मल्लेश, मल्लिनाथ, मल्लिकार्जुन अशीं नांवेंच आढळतील. मल्लप्पा नावाचे काही ब्राह्मणहि आत आत खेड्यात गेल्यास मिळतील, पण मल्हारी नाव कानडी जनात मिळणार नाही. हे लोक या देवास 'मल्लय्या' या नावानेच भजतात.

अशा प्रकारें या देवतेस जुनीं दोन नावे झाली : मल्लय्या व मल्हारी; आणि हीं नावे कर्णाटाचे व महाराष्ट्राचे वैशिष्ट्य दाखविणारी आहेत हेंहि निदर्शनास आलें. या नावाचा अर्थ जाणला असता या प्रांताचेंच हें वैशिष्ट्य कां याचाहि बराच उलगडा होणार आहे.

मले + अय्य असे दोन शब्द मिळून मल्लय्य हे पद बनले आहे. मूळ पत्तिजनाच्या भाषेंत मले म्हणजे पर्वत. 'अय्या' हे पद सन्मानार्थी आहे. मलयदेव म्हणजे पर्वत–देव. यावरून मूळ कानडी लोकाचे पूर्वज पर्वतपूजक होते असें दिसते. मल्लय्य याप्रमाणें पर्वतप्प, गुड्डप्प, गिरियप्प वगैरे याच अर्थाचीं निराळीं नावे या जनात लोकप्रिय आहेत. पर्वतरूपानें याची ही शिवपूजा आहे. आपली गुरेंढोरे चरण्याकरिता व आश्रयाकरिता जागा देणाऱ्या पर्वताना हट्टिकार-गोपालक देवतास्वरूप मानून पूज्यभाव दाखवितील हे स्वाभाविक आहे. रुद्राला 'गिरीश', 'गिरित्र' वगैरे विशेषणें यजुर्वेदात आली आहेत. यामुळे मल्लय्य, गुड्डप्प, पर्वतप्प, गिरियप्प वगैरे हीं सर्व शिवाचींच पर्यायनावें ठरतात. रुद्राला ही नावें असल्याचे वेदात आले असले तरी ब्राह्मणवर्गात हीं विशेष प्रचारात आलेलीं नाहींत. शतकानुशतकें या नावाचा वारसा ज्यानी जतन करून ठेवला त्या जनाचाच हा मूळ देव असें म्हटल्यास चूक होईल काय ?

मारुति व हनुमंत या नावांचा विचारहि वरील विधानास पुष्टि देत आहे. कर्णाटांत मारुति असें नाव वापरीत असलेले विशेषतः महाराष्ट्रीयच होत. मराठे किंवा ब्राह्मण यांशिवाय, अस्सल कानडी घराण्यात मारुति शब्द ऐकावयासहि मिळणार नाहीं. ते हणमंत या नांवानेंच संबोधतील. यांशिवाय

आणखी एक गोष्टहि विचारार्ह आहे. वैदिक परंपराभिमानी महाराष्ट्रीयांत मरुत् परंपरेच्या मारुति या नावाला प्राशस्त्य आहे हें खरें; तरी देशावर ब्राम्हणात चुकूनहि मारुतिभट किंवा मारुतिराव मला तरी आढळले नाहींत. हणमंतराव आहेत, पण ते नावहि कर्णाटाकडून आलेलें असेच आढळेल. मरुत् हा परिवारगण, सेवक वर्ग, अर्थात् अब्राह्मण. भूतबाधा वगैरे अरिष्ट निवारणार्थ हा देव पूजिला तरी त्याचें स्थान तेवढेंच.

## मल्हारी इंद्र असावा

मल्लय्य हा शिव ( रुद्र ) तर मग मल्हारी कोण ? 'मल्हारीमाहात्म्य' नांवाचें पुराण आहे. मल्लाचा नाश केल्याने या देवतेस 'मल्हारी' असें नाव प्राप्त झाल्याचें वर्णन त्यात येते. हे मल्ल कोण ? मलयवासी ते मल्ल. हे मल्ल आर्यांना विरोध करणारे असावेत. अगस्तीच्या चरित्रात विंध्यपर्वताच्या विरोधाची कथा येते. अगस्तीनें विंध्याला नमविल्याचें सांगितलें जातें.

ऋग्वेदात पर्वतदेवता येते. पण यजुर्वेदीय ( वाजसनेय ) संहितेप्रमाणे पर्वताचा रुद्राशी स्पष्ट संबंध सांगितला नाही. ऋग्वेदात इंद्राबरोबर तीन वेळां पर्वताचे नाव येते. तेथे 'इंद्रा–पर्वता' ही जोडदेवता उल्लेखिली आहे ( १, १२२, ३; १३२ आणि ३, ५३.१ ). या ठिकाणी पर्वत ही देवता आहे ( Here Parvata seems to be a Mountain God ) असें मॅक्डोनेल् यानी आपले मत नमूद केले आहे (Vedic Mythology, p 154 ).

ऋग्वेदात येणाऱ्या वर्णनातून ऐतिहासिक वास्तव घटना कोणत्या, याचा निश्चित तर्क करणें फारच बिकट आहे. यदुतुर्वशासारख्या ऐतिहासिक वाटणाऱ्या जनाविषयीचे उल्लेख घेतले तरी त्यात काव्यमय स्वर्गीय भराऱ्या जागोजाग मध्ये येतात. इंद्राचा रथ भूमीवर चालतो आहे असे म्हणावयाच्या आत तो अंतरिक्षात उड्डाण करतो ! ऐतिहासिक गोष्टी अशा प्रकारे काव्यात्मक रीतीनें वर्णावयाचा हा साहित्यप्रकार भारतीयानी पुढेसुद्धा चालू ठेवला. व्यास–वाल्मीकीनी लिहिलेल्या भारत–रामायणातील घटना ऐतिहासिक आहेत असें सर्वांना वाटत असलें तरी ते ग्रंथ, इतिहास म्हणून स्वीकारण्यास कोणीहि तयार होणार नाही. कालिदास, पंप वगैरे कवींनीहि ऐतिहासिक काळात हीच

प्रथा पुढें चालविली. रामाला साहाय्य करणारा मारुति ( मरुताचा वंशज ) मानव असावा असें बहुतेक संशोधकाना वाटतें. पण त्या वर्णनात मानवोचित वास्तव भाग किती व कविकल्पना किती याचें पृथक्करण करणें फार गुंतागुंतीचें आहे.

तें काहीं असले तरी, अशा प्रकारच्या वर्णनामागे काहीं अंशी वास्तव घटना असते. तशा घटनेवर कवि पुढे आपल्या प्रतिभेनें रूपकें रचतात. अगदीच निराधार, केवळ कविकल्पनेची वर्णनेहि थोडीं असूं शकतात. पण काही वास्तव घटनेवर रचलेला काव्यभाग कोणता हें जाणणे अगदींच अशक्य नाहीं. रुद्राचे अनुयायी मरुत् यांना ' पृष्णिमातरः ', ' रुद्रपुत्र (रुद्रिय) ' असें वर्णिलेलें आहे. रुद्राविषयीची त्याची आत्यंतिक ' वीरभक्ति ' सुविख्यात आहे. वेदात याना 'वीराः' असें काही ठिकाणीं म्हटले आहे. भूलोकातील कोणाशीच दुरूनसुद्धा या रुद्रभक्त मरुताचें साम्य नाही असे म्हणता येत नाहीं. वेदातील मरुत् झंझावाता-प्रमाणें आकाशगामी आहेत खरे, पण त्या वेळी काही जन तरी रुद्रोपासक होतेच ना ? तशाच्या सोयरीकसंबंधाची पुसट पुसट तरी आठवण देणारी त्या जनांची पिढी आज अगदींच नामशेष झाली असेल काय ? कर्णाटा-तील वीरशिवभक्त आपली पूर्वपरंपरा वेदपूर्वकालापर्यंत असल्याचें सागतात. सर्व वीरशैव हे आर्यपूर्व जनाचे वंशज म्हणणे ही परमावधीची अतिशयोक्ति होईल. पण त्या त्याच्या म्हणण्यात काहींच तथ्य नाहीं असे म्हणून तें मुळातच खोटें ठरविणें समंजसपणाचें होणार नाहीं. वीरशैवदीक्षा घेतलेल्या बाहेरच्या अनेक जनाचा यात प्रवेश झाला आहे यात शंका नाहीं. पण मुळात या पंथाची पूर्वपरंपरा वेदकालाइतकी तर खासच जुनी आहे. आपण शिवपुत्र ( शिवाचीं लेकरें ) अशी याच्यात आजहि जिवत श्रद्धा आहे. वृषभ ( बसव ) हा आपला माता-पिता ( पृष्णिमातरः ) असाहि त्याचा विश्वास आहे. शिवाविना अन्य दैवतास (' एको हि रुद्रः ') ते भजत नाहींत. शिवगणापैकीं आपण आहोत अशी त्याची भावना आहे. या जनाच्या स्वभावातील उत्साह, कडवेपणा, तीव्रता पाहिली तर रुद्रगणाची अंधुक छाया याच्या रीतिरिवाजात दिसते. हिंदु-स्थानांत (मरुत्पुत्र) मारुतीची विशेष उपासना व देवळें कर्णाट व महाराष्ट्राबाहेर नाहींत. रामायणकालीन किष्किंधा याच भागांत असल्याचें संशोधक सांगतात.

ऋग्वेदातील पर्वताविषयींचीं वर्णनेहि अशी वास्तव-अवास्तवतेच्या मिश्रणानें गुंतागुंतीचीं झालीं आहेत. इंद्राने पर्वतावर हल्ला करून त्याचा फडशा पाडल्याची वर्णनें जागोजाग येतात. पण ऋग्वेदात ढगाना त्याच्या रूपसादृश्यावरून पर्वत असें म्हटलेलें अनेक ठिकाणीं दिसतें:

त्वं तमिंद्र पर्वतं महामुरुं वज्रेण वज्रिन् पर्वशश्चकर्तिथ।
अवासृजो निवृताः सर्तवा अपः
सत्रा विश्वं दधिषे केवलं सहः॥ १. ५७. ६

"हे वज्रधारी इंद्रा, तूं त्या मोठ्या आणि विस्तीर्ण पर्वताचे तुकडे तुकडे करता झालास. त्यानें अडवून ठेवलेल्या उदकाना वाहण्याकरिता तूं खाली सोडता झालास. खरोखर, सर्व बळ तुझ्याच ठिकाणीं एकवटलें आहे" (सिद्धेश्वरशास्त्री, ऋ. भा.). अशा प्रसंगी पर्वताना 'मेघ' असा अर्थ जरूरच आहे; पण हा अर्थ सर्वत्रच लागू होत नाही. 'इंद्रापर्वतौ' या जोडदेवतेंत 'पर्वत' देवतवाचक आहे.

इंद्र पुराचाहि वैरी आहे. पुरेंसुद्धा वेदात पर्वतांप्रमाणे रूपकेंच आहेत. तरी पण या लौकिक घटना असाव्यात असे मानणे चुकीचें होणार नाहीं. कवि आपल्या उपमानोपमेयाकरितां जे शब्द वापरतो त्यामागे त्याच्या भावना दडलेल्या असतात. पुरे आणि पर्वत याविषयी ऋषीना आपुलकी नव्हती, त्याविषयी विरोधच असावा, आणि त्याचा तो विरोध त्यानीं आपण रचलेल्या रूपकातून पर्यायाने व्यक्त केला असावा, पुढील काळच्या पौराणिक कथा वगैरे परंपरागत गोष्टींची पुष्टि मिळत असल्याने, अशा प्रकारच्या तर्काला बराच अवकाश आहे.

या दृष्टीने मल्लासुर म्हणजे पर्वतेयाचा नाश करणारा देव म्हणजे तो इंद्रच असावा, असे वाटते. इंद्र व पर्वत याच्या विरोधाचे पडसाद भागवतपुराणात (१० वा स्कंध) एके ठिकाणीं कानी पडतात. यादवांनीं (आर्यीकरणांत) इंद्रपूजा करण्यास आरभ केला होता. पण श्रीकृष्णानें पर्वतपूजेची जुनी परंपरा चालू ठेवण्याचे मनांत आणलें आणि यादवांना पर्वतपूजा करण्यास सागितलें, यामुळें इंद्रास राग आला. अशा प्रकारची एक कथा भागवतात येते. या व

वर उल्लेखिलेल्या अगस्तीच्या कथेतील भाग एकत्र आणला असता ऋग्वेदातील रूपकात इंद्रानें पर्वताचा नाश केल्याच्या वर्णनातून व्यक्त होणाऱ्या त्या दोघातील वैरामार्गे भूलोकातील काही वास्तव घटनाहि असाव्यात असे वाटते.

झल्लोमल्लाच्या यादीत नट-करणाच्याबरोबर ' मनुस्मृतींत ' या मलेय-मल्ल जनाचें नाव आहे. हे व्रात्य क्षत्रिय होते, असें ' मनुस्मृति ' सागते. नट–करणाप्रमाणें आर्यीकरणात याचा क्षत्रियकुलात समावेश झाला असावा. यावरून या मलेय-जनाची प्राचीनता कळून येते. हरिहराप्रमाणे ' इंद्रा पर्वता ' ही जोडदेवता ऋग्वेदकालीन आर्य व पर्वतेय अशा दोन निरनिराळ्या पंथाच्या समेटाचें प्रतीक असणें शक्य आहे.

मल्हारीची मूर्ति अश्वारोही असून तिच्या हातात खड्गासारखे आयुध आहे, यावरूनहि हा देव इद्र असावा असा तर्क वाहतो.

## महाराष्ट्र-कर्णाटांच्या ऐक्याचें प्रतीक

भक्तानी आपल्या भावनेच्या बळावर बनविलेला देव हे त्या भक्ताच्या स्वभावादिकाचेंच एक उदात्त दिव्य भव्य रूप असते. असें म्हणणें काहीं भाविक श्रद्धाळूंना आवडत नसेल, तर देवासारखा भक्त असे म्हणण्यास हरकत नाही. मल्लय्य व मल्हारी या देवताच्या भक्ताच्या स्वभावविशेषाचें थोडे निरीक्षण केलें असता या देवताच्या मूळ स्वरूपाचा आराखडा लक्षात येण्यास मदत होणार आहे. या जनाच्या स्वभावाविषयीं आजच्या कोणाच्या अभिप्रायापेक्षा प्राचीन उल्लेख मिळतील तर तें जास्त प्रशस्त होय. या दृष्टीनें सुमारे इ. स. ९०० पेक्षा पूर्वीच्या अपभ्रंश-काव्यत्रयीतील उतारा फार महत्त्वाचा आहे. मरहट्टे याविषयी ' ...अभिमानान् कलहशीलान् च " असे उदगार त्याने काढले आहेत. कर्णाटकीयाविषयी तो तेथे म्हणतो : ' उत्कटदर्पान् पदरौद्रान् पतंग-वृत्तीन् च ". याचप्रमाणे त्यानें आणखी काही प्राताच्या जनाची वैशिष्ट्यें वर्णिली आहेत. प्रत्येकाचे गुण-दोष सागताना त्याने शक्य तो समतोल बुद्धि ठेवली आहे असे म्हणावें लागतें. मरहट्टे यांचा अभिमान व आपल्या कार्याकरिता ते दाखवीत असलेली भाडखोर वृत्ति आजहि भारतखंडाते प्रसिद्ध

आहे. त्याच्या अभिमानी स्वभावाने व रगेलपणाने त्याच्या भाषेचा व देशमर्यादेचा विस्तार झाला. याउलट, कर्णाटकीय हे शूर, उत्कट दर्पाचे, काहीशा वैयक्तिक अहंकाराचे, आवेग–उद्वेगाच्या चक्रात नेऊन सोडणारी भावनाप्रधान वृत्ति यांनीं युक्त असल्याने, त्याच्या स्वभावात पतंगवृत्ति दिसून येते. जें आकर्षक वाटेल तिकडे पतंग धावलाच! स्वभावात स्थैर्य, दृढता कमी. कर्णाटाच्या उत्कर्षाचें आणि ऱ्हासाचे गमक यांतच आहे.

कर्णाटात मरहट्टे याना ‘आरिय’ असें नाव आहे. आरियाचा-आर्यांचा देव इंद्र, तर कर्णाटकीयाचे दैवत शिव. इंद्र हा युद्धप्रिय, शत्रूवर तुटून पडणारा, आपल्या जनाचा अभिमानी व त्याच्या रक्षणाकरिता सदैव सिद्ध. या तुलनेने पुराणातरी चित्रिलेलें शिवाचे चित्र पाहा : विरागी, बायकोचीहि आस्था नाही, स्वानंदात मग्न, कोणाच्या शीलगुणाच्या चौकशीत न शिरता प्रार्थील त्याला प्रसन्न होऊन वरदान देणारा, आपण दिलेला वर आपणास जाचक होईल याचीहि पर्वा नसणारा— भोळा शंकर!

मल्हारी किंवा खंडोबा हा वीराचा देव गणला जातो. कुमारव्यासाच्या ‘भारता’त ‘रण-मल्हार’ असा वाक्प्रचार (९ ६४) आला आहे. ‘मैराळ भाऊ’ असा एक जुना वाक्प्रचार असून त्याचा अर्थ ‘काटक बलवान इसम’ असा आहे. मल्हार मैलार-मैराळ अशी या शब्दाची व्युत्पत्ति आहे हें लक्षात न आल्यानें, कोशकारानीं ‘हा अर्थ या नावाच्या कोणा एका व्यक्ती-वरून आला असावा’ असा तर्क बांधला आहे. कुमारव्यासाच्या ‘रण–मैलार’ वाक्प्रचावरून ‘मैराळ भाऊ’चा अर्थ विशद होत आहे. मराठे वीरांना खंडोबा-मल्हारी हा युद्धातील स्फूर्तिदाता देव होता. महाराष्ट्राच्या इतिहासात या नावानें झळकणारे अनेक सेनानी व वीर होऊन गेले. शिव हा रणधुमाळीत रमणारा देव या स्वरूपात त्याची उपासना केली जात नाहीं. “तूं आमच्या शत्रूंचा नाश करावयास ये” अशी रुद्राची काही ठिकाणी प्रार्थना आहे खरी; पण दस्यूंचा संहार करण्यास तो इंद्राप्रमाणे धावून आल्याचा कोठेंच उल्लेख नाहीं. इंद्राच्या शौर्याची व तो आपल्या सरक्षणाकरिता धावून आल्याची चित्रें रंगविणाऱ्या वैदिक ऋषीच्या कुंचल्यातील रगाची छाया रुद्राच्या वर्णनातहि पडली असण्याचा संभव आहे. किंवा काही विद्वानाच्या मताप्रमाणें, मूळ कोणा

एका वैदिक देवतेवर आर्येतर रुद्र ( शिव ) देवतेचें कलम केलेलें असणेंहि शक्य आहे. कारण रुद्राच्या चित्रणात असे काही थोडे मिश्रण दिसते खरें.

इंद्राप्रमाणें रुद्र जरी रणरसिक देव नव्हे तरी 'इंद्रापर्वता' देवतेचें खालील वर्णन पाहाः-" हे इंद्र-पर्वतहो, पुढे होऊन लढणारे तुम्ही, आमच्याशीं लढूं इच्छील त्याला त्याला ठार करा, त्याला त्याला वज्रानें मारा; जें वज्र नष्ट झालेल्यासहि मारूं इच्छितें तें गहन स्थलीहि जातें. हे शूरा, तूं आमच्या शत्रूंना सर्व बाजूंनीं विदारून टाक, सर्व बाजूंनी विदारून टाक " (ऋ. १.१३२ ६-सिद्धेश्वरशास्त्री, ऋ. भा.). या वर्णनावरून हा शत्रुसंहारक वीर, वीराचा देव आहे हे उघड दिसते. " अस्माकं शत्रून् परि शूर विश्वतो दर्मा दर्षीष्ट विश्वतः " या वाक्यात 'हे शूर !' या संबोधनात त्या सयुक्त देवतचे ऐक्य ( एकत्व ) व्यक्त होतें. मल्हारी-मल्लय्या असे जोडनाव प्रचारात असलें तरी या निराळ्या देवता असें मानले जात नाही. कानडी लोकाना यात शिवाचे दर्शन होतें, तर महाराष्ट्रीयाना तेथे मल्हारी ( इंद्र ) दिसतो. हें त्याच्या स्वभावविशेषास अनुसरूनच आहे.

मल्हारीची पत्नी ती म्हाळसा. चक्रधर-'लीळा-चरित्रा' त एका व्यक्तीस 'माल्हाबाईची आण' घातल्याचा उल्लेख आढळतो. गदोनायकाच्या बायकोचे नाव म्हाळसाई होतें. माळप्पा, माळव्वा हीं नावे कर्णाटकीयात फार जुनीं आहेत. पर्वत किंवा डोगर या अर्थाचे मलय-माड-माळ हे शब्द आजहि रूढ आहेत; यावरून 'माळव्वा' चें सस्कृत भाषातर पार्वती होय. तसेंच 'माळव्वा'चे संस्कृतीकरण होऊन 'महालसा' किंवा 'म्हाळसा' असें झाल्याचें निराळें सिद्ध करावयास नको.

मल्लय्या-मल्हारी या नावाची देवता तमिळ देशात नाहीं. तेलंगणातहि या देवतेचे भक्त क्वचितच आढळतात. कर्णाटक-महाराष्ट्रातून तेथे गेलेल्या कांहींचा हा देव आहे. कर्णाटक-महाराष्ट्रात नर्मदा ते गोदावरी आणि पूर्वेस श्रीशैल येथपर्यंतच्या प्रदेशातील जनाची ही मुख्य देवता आहे. मल्हारी-मल्लय्या, मल्लिनाथ, मल्लिकार्जुन, गुड्डप्प, पर्वतप्प वगैरे निरनिराळ्या नावाखाली ही देवता पूजिली जाते. या देवतेचें नाव आणि आरत्या, 'एळुकोटी' वगैरे गर्जना यांचा एकत्र विचार केला असता मल्लय्य ही देवता मुळांत पत्तिजनाचीच

असावी असें म्हणावें लागतें. नंतर इंद्रा-पर्वता या स्वरूपांत या दोन्ही देवताचा 'कूडल-संगम' (आर्य-द्रविड) झालेला दिसतो. तेलगु, तमीळ या दुसऱ्या कोणत्याहि जनापेक्षा कर्णाटीयाशींच महाराष्ट्राचा जिव्हाळ्याचा संबंध दाखविणारी ही देवता आहे. विठ्ठल, दत्त, व्यंकोबा यासारख्या देवता बाराव्या शतकानंतर पुढें आल्या. त्यानंतर त्या कित्येकाच्या कुलदेवता बनल्या. पण मल्हारीच्या भक्ताची परंपरा मात्र या दोन प्रांतांत फार पुरातन आहे. दोनहि प्रांताना अशी निगडित करणारी ही देवता या प्रांताच्या एके काळच्या ऐक्याचें प्रतीकच नव्हे काय ?

## मल्हारी-मार्तंडांत सूर्योपासनेचा अवशेष

कर्णाटकातील बहुजनसमाजाच्या पूजनात मार्तंड नाही. काही ब्राह्मणाचें कुलदैवत मात्र या नावाचें आहे. मार्तंड म्हणजे सूर्य. 'इंद्रा-पर्वता' हें संयुक्त नांव जसे निरनिराळ्या दोन देवता एकत्र आल्याचें दाखविते, तसें मल्हारी-मार्तंड हे आणखी दुसऱ्या दोन देवाच्या निरनिराळ्या उपासना-मार्गाचें संमीलन किंवा एकीकरण होऊन एक देव बनला असल्याचे निदर्शक आहे. एकाच देवतेंत निरनिराळ्या पुष्कळ देवता येऊन शिरलेल्या आपणास दिसतात. (रुद्र) शिव याचें मूळ शुद्ध स्वरूप लाल ताबूस ही कल्पना बाजूस राहून, पुढील काळात पुष्कळच निरनिराळ्या देवताच्या कल्पना शिवावर आरोपित झालेल्या तज्ज्ञांनीं साधार सिद्ध केल्या आहेत. डॉ. कीथ यानीं 'Syncretism of different beliefs' याविषयीं लिहिताना आपले हे मत नमूद केलें आहे (The Religion and Philosophy of the Vedas and Upanishads, p. 148). भक्ताच्याकरिता शिव स्मशानवासी बनला. शिव आणि यम हे दोन्ही जवळ जवळ एक अशी भ्राति निर्माण होण्याजोगी वर्णनें आली, भव, शर्व, महादेव वगैरे आणखी निरनिराळ्या प्रकारच्या देवता शिवात अंतर्भूत झाल्याचे संशोधकांनी सप्रमाण सिद्ध केले आहे (डॉ. कीथ याचा वरील ग्रंथ पाहा). लिंगहि शिवांत तादात्म्य पावल्याचें आपण मागें पाहिलेच आहे. त्याप्रमाणेंच मल्हारी-मार्तंडात मार्तंड या रूपानें सूर्योपासना 'इंद्रापर्वता' च्या पंथांत विलीन झालेली आहे.

सूर्योपासना ही काहीं आपल्या देशात नवीन नाही. वैदिक लोक सूर्योपासक होते. पण वेदकालीन अग्नि व सूर्य याच्या उपासनेची तऱ्हा निराळी

आणि इ. स. चौथ्या--पाचव्या शतकाच्या सुमारास, भारतात प्रसृत झालेल्या सूर्योपासनेची रीत निराळी. पूर्वी सूर्याची मूर्तिपूजा नव्हती. गुप्त-वाकाटकाच्या वेळीं सूर्याच्या मूर्तिपूजेस आरंभ झाला. ही मूर्तीची कल्पना परकीय असल्याचे डॉ. आळतेकराचें मत आहे ('Vakataka-Gupta' By R C Mujumdar & Dr. Altekar) सूर्योपासनेची ही लाट हिंदुस्थानाबाहेरून आली असावी असे सूर्याच्या तत्कालीन निरनिराळ्या मूर्तीवरून निश्चितपणें सागता येईल. चौथ्या–पाचव्या शतकातील सूर्याच्या मूर्ति कोटबूट घातलेल्या आढळतात. पण हिंदुस्थानात अशा तऱ्हेचा पेहराव असलेली दुसऱ्या कोणत्याहि देवतेची मूर्ति नाही हा परकीय प्रभाव आहे हें जाणण्यास कोणत्याहि विशेष परिश्रमाची किंवा बुद्धिमत्तेची जरूरी नाही.

हा प्रभाव कशाचा असावा ? आपल्यात प्रत्येक देवतेला एकेक पुराण असणें हे ठरलेलेंच आहे आणि त्या पुराणातून पुष्कळ महत्त्वाच्या गोष्टी सूक्ष्म संकेताने सुचविलेल्या आढळतात. मल्हारी हें नाव का आले असावें याचा उलगडा मल्हारीच्या पुराणातच होतो. मल्लासुर नावाच्या दैत्याचा संहार केल्यामुळे या देवतेस मल्हारी नाव आले असे त्यात वर्णिलें आहे. या मल्लाचा (म्हणजे मलय--पर्वतेयाचा) वैरी हा मल्हारी (इंद्र) हें ठीक झाले. त्याच पुराणात 'मणि' या नावाच्या आणखी एका दैत्याचा उल्लेख येतो. मणि हें काय प्रकरण आहे, याचा उलगडा करण्याचा प्रयत्न अजून झालेला दिसत नाहीं. माझ्या मतें मणीचा संबंध मल्हारीशी नसून मार्तंडाशी विशेष येतो. मल्हारीबरोबरच मार्तंड असे जें नाव जोडलें जाते तें सूर्योपासनेचें निश्चित सूचक आहे.

तिसऱ्या शतकात इराणमध्ये मित्रपंथ (Mithraism) विशेष प्रबळ होता. या मित्रपंथाचा 'मणि' या नावाचा एक मोठा प्रचारक त्या काळात होऊन गेला. त्याने त्या देशातील विरोधास न जुमानता मित्रपथाचा म्हणजे सूर्योपासनेचा प्रचार केला. विरोधकाकडून शेवटीं त्यास मरणहि प्राप्त झाले, तरीहि त्याच्यानंतर त्याचा पंथ जगांतील निरनिराळ्या देशातून प्रसार पावला. तेथील धर्मावरदेखील या मणिपंथाचा फार दूरवर परिणाम झाल्याचें सागतात. तिसऱ्या शतकात उदय पावलेल्या मणिपंथीय सूर्योपासनेचा प्रचार गुप्ताच्या

काळातील परकीय स्वाऱ्याबरोबर भारतातहि झाला असणें अशक्य नाहीं. कारण त्या काळातील सूर्याच्या मूर्ति म्हणजे या स्वाऱ्यांचे जणूं काय प्रतीकच !

जेव्हा जेव्हा दुसऱ्या पंथाच्या वर्चस्वापुढें आपला टिकाव लागत नाहीं असे स्पष्ट होते, तेव्हा तेव्हा आपल्या पूर्वपरंपरेस विशेष विसंगत न होईल अशा रीतीने त्या पथातील महत्त्वाचा भाग आत्मसात् करून घेणे हे हिंदु-धर्मांचे सनातन वैशिष्ट्य आहे. आजपर्यंतच्या समन्वयाचे प्रकार याच धर्तीवर झालेले आहेत, आणि ते याच मनोवृत्तीचे निदर्शक आहेत. आपल्या देशात पूर्वकाळी सूर्योपासना होती. नित्य पठणात असलेला गायत्रीमंत्र सूर्योपासनेचाच एक प्रकार होय. मणिपंथाकडून सूर्योपासना घेतली तरी त्यातला मणि–राक्षस मारून टाकला! परकीयाच्याकडून कोणतीहि गोष्ट घेतली असें म्हणणें स्वाभिमानास बोंचक ठरतें. मल्लासुराबरोबर मणि हा दैत्यहि त्या पुराणात मारला गेला, पण सूर्याची मूर्तिपूजा आपण पत्करली. राष्ट्रकूटाच्यावेळी कर्णाट–महाराष्ट्रात पुष्कळ सूर्य–देवालयें होती. त्रैपुरुष देवालयाचा उल्लेख प्राचीन शिलालेखातून येतो. देवळात ओळीनें तीन गर्भागारे ( गाभारे ) असून शिव–विष्णूंबरोबर तिसरी देवता ब्रह्मा किंवा सूर्य ही स्थापिलेली असे. या देवतेत एक श्रेष्ठ, एक कनिष्ठ अशी उच्चनीचतेची कल्पना अद्याप प्रसृत झालेली नव्हती, हे या सर्व देवता एकाच पंक्तींत बसविलेल्या असत यावरून स्पष्ट होतें. भानापूर, भास्करपूर, सुरेबान ( सूर्यबन ) वगैरे ग्रामनामे एकाकाळच्या सूर्योपासनेच्या लोकप्रियतेची साक्ष पटवितात. सातव्या–आठव्या शतकातील जिवत कानडी बोलीत रूढ असलेल्या सूर्यवाचक ‘ नेसर् ’ वरून आलेली नेसरिगेसारखीं ग्रामनामें कर्णाटात आजहि आहेत.

## कांहीं देवी : महिषासुरमर्दिनी–जगदंबा

जगदंबा हें नाव बरेच संदिग्ध आहे. कोणत्याच विशिष्ट देवीचा या नावापासून बोध होत नाहीं. लोकजननी महामाता, एवढाच यापासून अर्थबोध होतो. सिंहवाहिनी, महिषासुरमर्दिनी, परमेश्वरी किंवा वैष्णवी, लक्ष्मी, या दोघीहि त्या त्या भक्ताच्या दृष्टीनें जगदंबाच. पण जगदंबा नांवानें यापैकीं कोणी एक विशिष्ट देवता असा अर्थ होत नाहीं. हिंदूंतील समन्वयी मनोवृत्ति

पुन्हां येथे स्पष्टपणें दिसून येते. कोल्हापूरच्या देवीला महालक्ष्मी म्हणण्याचा प्रघात आहे. गोधळात, कोल्हापूरची अंबाभवानी असें नांव कानी येतें. आजच्या वीरशैव आणि वीरवैष्णवाच्या दृष्टीनें शैव–वैष्णव नावाचा असा हा गोधळ माजलेला वाटेल; पण मागे एके काळीं हरिहरात भेद मानला जात नव्हता याचें हें प्रत्यंतर आहे. इ. स. १०४९ सालचा शिरूर ( तालुका—बागलकोट ) गावचा शिलालेख प्रसिद्ध झाला आहे. त्यात पुढील वाक्य आलेले आहे :—

" रुद्रार्धांगोत्संगनिवासिनी, सिंहवाहिनी, श्रीमत् कोल्हापूर पीठाधिष्ठिते श्रीमन् महालक्ष्म्या देव्याः पादपद्मोपजीवी पाशुपताचार्य प्रभुराजवर्मन् ॥ (Bombay Karnatak Inscriptions ). येथें त्या कोल्हापूरच्या देवीला लक्ष्मी आणि पार्वती या दोनहि नावानी संबोधिलेले पाहावयास मिळते. पण प्रस्तुत जगदंबा म्हणजे महिषासुरमर्दिनी या स्वरूपातील देवतेचाच येथे विचार कर्तव्य आहे.

या देवीच्या नावातील महिषासुरमर्दिनी हें विशेषण येथे चिंत्य आहे. यापूर्वी विद्वान् संशोधक श्री. वि. का. राजवाडे यानी आपल्या प्रतिभेनें सुचविल्याप्रमाणे या देवीनें मारलेला महिषासुर हा सांकेतिक शब्द आहे. एके काळी महिष-जन या देशात फार माजले होते. या देवीच्या वरप्रसादाने काहीनी या जनाचा नाश केला. म्हणून ही देवता महिष जनाचा नाश करणाऱ्या या लोकाची कुलस्वामिनी बनली ( राजवाडे लेखसंग्रह ३ : पृ. २४६–२५४ ). मल्लासुराचा नाश करणारा देव जसा मल्हारी तशी महिषाचा नाश करणारी देवी ती महिषासुरमर्दिनी. ही पूर्वपरंपरा मल्हारीइतकी प्राचीन दिसत नाही, कारण मल्लजनाइतके महिषजन पुरातन नसावेत. ( " शालिवाहन शकाची पूर्वपीटिका " ले. प्रा. मिराशी, ' नवभारत ' १९५१ जानेवारी, या लेखात महिषजनाविषयी माहिती आहे. )

म्हैसूर राजघराण्याची कुलदेवता महिषासुरमर्दिनीच आहे. म्हैसूरचे राजे आपला संबंध यदुवंशाशी लावतात. शिवछत्रपतीची कुलदेवता महिषासुरमर्दिनीच होती नवरात्रोत्सव म्हणजे या महिषासुर मर्दिनीचाच उत्सव होय. विजयनगरच्या राज्यात त्या राजांच्याकडून महानवमी उत्सव फार भव्यपणें साजरा केला जात असे. ' महानवमी दिब्बा ' या नांवानें प्रसिद्ध असलेली टेकडी अजून प्रवाशाना

तत्कालीन वैभवदर्शन करीत उभी आहे. त्या दिब्बावर दरबार भरत असलेली जागा वगैरे भव्य स्थळें तेथें दाखविण्यात येतात. पंपभारतात ( इ. स. ९३२ ) भगवतीच्या ( स्थापना ) उत्थापनाचा उल्लेख एकीकडे येतो. एकूण या देशातील राजघराण्याची कुलदेवता तीच होती असे म्हणण्यास हरकत नाहीं. "महानवमी दिवाळी" हा वाक्संप्रदाय पंपभारतात आला आहे. एक बाई एका खेडुतास नर्म विनोदात म्हणते : 'आहा! तूं आलास! तर मी महानवमी-दिवाळी केल्याविना कशी बरे राहूं ?" "साधु संत येती घरा, तोचि दिवाळी दसरा" हे तर महाराष्ट्रात सर्वश्रुत महावाक्य बनलें आहे. या प्रकारच्या वाक्प्रचारातून महानवमीचा उत्सव, राजापासून रंकापर्यंत कर्णाट-महाराष्ट्रात सर्वांचाच होता हे सिद्ध होते.

प्रा. मिराशीचे संशोधन जमेस धरल्यास महिषक व हट्टिकार गवळी यांचीं घर्षणे दक्षिणेंतच झाली असली पाहिजेत. हे जर खरे असेल तर महिषासुर-मर्दिनी ( काली ) देवी येथूनच गौड ( गौळ ) देशास गेली असणे शक्य आहे. बंगालचा आजचा राष्ट्रीय उत्सव नवरात्रच आहे. बंगालच्या सांस्कृतिक इतिहासात द्रविड प्रभाव विशेष आहे असे त्या देशाचे विद्वानच लिहितात. महाराष्ट्र-कर्णाटकातच महिषासुर मर्दिनीचे माहात्म्य विशेष आहे ही गोष्टहि, बंगालमधील तथाकथित 'द्रविड' म्हणजे कोण यावर चांगलाच प्रकाश पाडणारी होईल. "द्रविड" या संदिग्ध शब्दाने न होणारा अर्थ येथे स्पष्ट होईल. श्रीरामदासानी स्तविलेली हाटकदेवी गौडदेशीं गेली तर शाक्तांची 'गौडबंगाली' विद्या ( त्यानी तिबेट, चीनकडून स्वीकारलेली ) कर्णाट-महाराष्ट्रात आली असा हा संस्कृतीचा विनिमय झालेला दिसतो. अकरा-बाराव्या शतकातील नाथपंथीय कानफाट्याबरोबर चेटुक-माटुकाच्या गौडबंगाली विद्येचे वारे इकडेहि वाहात आले

कर्णाट-महाराष्ट्रात हट्टिकारजनातून राजघराणीं पुढे आल्याबद्दल मागे सुचविलेंच आहे. पत्तिजन हे गोपालक होते हे पुन्हा सांगण्याचें कारण नाही. पत्तिजनाच्या पूर्वापार चालीवरून पूर्वी महिषकात आणि गोपालक हट्टिजनात हाडवैर असावे असें दिसते. आज 'गवळी' हें नाव सर्रास रूढ असले तरी ते महिषपालकच असल्याचे आपणास दिसेल. हटगार मराठे यानी गाईच्या

दुधाशिवाय दुसऱ्या दुधास स्पर्शहि करिता कामा नये अशी चाल एकेकाळीं वऱ्हाडकडे रूढ होती असें रसेल लिहितो. कर्णाटातहि हटगारात काहीं घराणीं गाईशिवाय कोणतेंहि दूध न विकणारी आढळतात हट्टि व दन हे शब्द गाई बैलाचेच निदर्शक आहेत. ब्राह्मण ग्रंथातून यजनक्रियेस गाईचेच दूध तूप लागतें. म्हशीचे पवित्र समजले जात नाही असे, सूत्रकालीन समाजव्यवस्था-विषयक ग्रंथात श्री. व्ही. एम्. आपटे लिहितात. वसुबारसासारखे सण अजूनहि जिवंत आहेत. म्हशींची पूजा कधी कोठें चुकूनहि केली जात नाही. उलट रेडा बळी दिला जातो आपल्या देशात महिषजन एकेकाळी होते असा खन्नित पुरावा मिळतो. कर्णाटक-महाराष्ट्रात म्हैसवाडी, म्हैसूर, एम्मिगनूर, कोणनतंबिगे, कोणनकेरे (कोण=रेडा) वगैरे गावें या जनाचें एकेकाळचें अस्तित्व सुचवितात. कर्णाटकातील धनगरात 'एम्मेनवरु' असा एक गट आहे. महाराष्ट्रात म्हसे असे आडनाव मिळतें (नवभारत, १९५१ फेब्रुवारीचा अंक, पान ५२). वर उल्लेखिलेला गाई-म्हशीविषयक तीव्र पंक्तिप्रपंच लक्षात घेता या देवीच्या महिषासुरमर्दिनी या स्वरूपातील रहस्य चागलें स्पष्ट होईल. एकेकाळी गोपालक (हटगार) आणि महिषक याच्यात तीव्र विरोध होता हे स्पष्ट आहे. महिषासुरमर्दिनीच्या कृपेने या गोपालक हट्टिकारांनीं महिषकावर विजय मिळविला खरा पण महिषानी हार खाऊनहि मात केली आणि हटगारानी जिंकूनहि हार खाल्ली. जेते जित झाले आणि जित जेते झाले!! हटगार नावाला गवळी राहिले आणि घरी सर्व म्हशीच आल्या!! हाच प्रकार मल्हारी देवतेबद्दलहि झाला. शिवाचें नाव राखलें पण आत आला नाव बदलून इंद्र!!

महिषासुर मर्दिनीला "कोलासुर भयंकरी" असेंहि एक विशेषण पुराणांत आढळतें. कोल-मुंडांचा हिने संहार केला. कोल-मुंड हे फार प्राचीन जन आहेत. कोल-कोल्ल व मुंड हीं नावे आरंभीं असणारीं गांवें कर्णाट-महाराष्ट्रांत पुष्कळ आहेत. विशेषतः कोल नावाच्या गावातून बरींच प्रसिद्ध अशीं देवीचीं क्षेत्रें आहेत. उदाहरणार्थ : कोलार, कोल्लूर, कोल्हापूर वगैरे. आपल्यांतील देव-देवताच्या या प्रकारच्या नांवांवरून आपल्या संस्कृतीच्या वाढीच्या इतिहासावर बराच नवीन प्रकाश पडतो.

## श्रीदेवी-लक्ष्मी

शतपथ ब्राह्मणांत श्रीदेवीचें नाव येतें. श्रीचा उल्लेख ऋग्वेदांतहि आहे. पूर्वी लक्ष्मीचें मुख्य नाव श्री असेंच असावें. लक्ष्मीपेक्षा श्री या नावाने देवीची पूजा विशेष चालते. शाक्त पूजेंत श्रीचक्राची उपासना येते. लक्ष्मी हें नाव अलीकडे जास्त प्रचारांत आल्यामुळें श्री हें नांव मागें पडले.

देवी भवानीची पूजा मुख्यतः दोन कारणाकरितां केली जाते. एक तर अरिष्टनिवारणार्थ किंवा संपत्ति–संतति–प्राप्त्यर्थ. श्री मंगळागौरीच्या पूजेचा प्रकार हा पहिल्या वर्गात मोडतो. ती देवी साधारणपणें मंगळादेवी अशी ओळखली जाते. अमंगळ निवारण व्हावें हा यात हेतु, यावरून मगलकर्ती देवी अशा अर्थानें हें नाव आलें असावे असा तर्क होण्याचा संभव आहे. पण अमंगळ, अशुभसूचक म्हणून प्रसिद्ध असलेल्या मंगळ ग्रहावरून नाव प्राप्त झालेल्या मंगळवारी मुख्य पूजन होत असलेल्या देवीचें हें नाव आहे. मंगळाईची देवस्थानें आढळतात. मंगळूर, मगळापूर, मंगळगट्टी, मंगळवाड ( वेढे ) वगैरे मंगळावरून आलेली स्थलनामें होत. मंगळूरला मंगळादेवीचें मोठें देवालय आहे.

गोकर्ण–मंगळूर प्रवासात मला एक विशेष आढळून आलें : त्या भागातील पुष्कळ कुणबी वगैरेंची नावे वाराचीं ( ग्रहावरून आलेली ) असतात. आपल्याकडे ही प्रथा लुप्त झाली आहे. काही थोडीं नावे तशी प्रचारात आहेत. तेथें शुक्र, शनि, बुध अशी नावेहि मिळतात. शनियप्पा = तनियप्पा झालेला आहे. त्याप्रमाणें शुक्राप्पाचें तुकप्पा रूप होतें. महाराष्ट्रात तुका हे नाव रूढ आहे. पण त्याचें मर्म मात्र स्पष्ट झालेलें दिसत नाही. प्रसिद्ध तुकारामावरून हें नाव रूढ झाले असें समजून तुका म्हणजे ( तुकणें = जोखणें ) वाणी असा अर्थ त्याच्या जातीवरून काहींनी कल्पिला आहे.

तुळजापूरच्या भवानीला तुकाई असें नांव आहे. तुळजापूर-कोल्हापूर येथें शुक्रवार हा मुख्य पूजेचा दिवस आहे. लक्ष्मीचा पति विष्णु ( बालाजी ) त्याचाहि वार म्हणून शुक्रवार प्रसिद्ध आहे. यावरून तुक हें नांव मुळात शुक्र याचा तद्भव असून हें अंबाभवानीचें पर्यायनाम ठरतें. अंबण्णा, अंबप्पा,

अंबादास वगैरे नावें अंबाबाईच्या भक्तीचीं सूचक आहेत. तसें तुकप्पा, तुकोबा नांवहि कुलस्वामिनी देवीचे सूचक आहे.

**श्रीदेवीचा** संबंध पुन्हा चंद्राशींच येऊन भिडतो. "हिरण्यवर्णाम्, हेममालिनीम्, हिरण्मयीम्" अशाप्रकारें तिचे वर्णन श्रीसूक्तात केलें आहे. या देवीचें चंद्राम् असेंहि विशेषण तेथें आढळतें. देवजुष्टाम् हें विशेषण तर विचारार्ह आहे. चंद्रातील अमृत घेऊन उरलेला चंद्र असा कांहींजण याचा अर्थ लावतात. श्रीदेवीचा चंद्राशीं संबंध सुचविणारा हा अर्थ आहे. "चंदला-परमेश्वरी" नांवाची देवता पुष्कळ घराण्यांचें कुलदैवत आहे. निजाम हैदराबादकडे या देवीचें मोठें क्षेत्र आहे.

श्रीसूक्तांतील वर्णनावरून श्रीदेवीचा हिरण्यवर्णाशीं विशेष संबंध आहे हें निदर्शनास येतें. यामुळें श्री शब्द हा यापूर्वी विवरण केलेल्या शिन् शब्दापासून निष्पन्न झाला असावा असें मानण्यास जागा आहे. आर्यांच्या देवात स्त्री देवताना महत्त्वाचें स्थान नाहीं असें तज्ज्ञाचें मत आहे. ऋग्वेदात आज आपण पूजीत असलेल्या लक्ष्मी, पार्वती वगैरे देवताचा मागमूसहि नाहीं. राका, सिनीवाली गुंगूसारख्या कांहीं देवताचीं नांवें येतात; पण त्याना वेदात काहीं महत्त्व असल्याचें दिसत नाहीं. वरीलपैकी सिनीवाली हें नांव अभ्यसनीय आहे. 'Siniwali looks to me like a foreign word' असे उद्गार लोकमान्य टिळकांनीं आपल्या एका लेखात काढले आहेत (Bhandarkar Commemoration, Vol. page 40). सिनीवाली हा संस्कृत शब्द नव्हे. या शब्दातील पूर्व भाग सिनी याचा त्याच्या रूप व अर्थ–सादृश्यावरून, शिन्, या पूर्वोल्लेखित पत्तिजन भाषेतील धातूशीं संबंध आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. सिनीवाली याचा अर्थ पाहिला म्हणजे 'शिन्' शींच याचा निश्चित संबंध आहे असें स्पष्टपणें म्हणावेसें वाटतें. अमावास्येच्या आदल्या दिवसाचा (चतुर्दशीचा) चंद्र असा अर्थ सिनीवाली या शब्दाला आहे. 'सिनी चंद्रकला' असें भानु दीक्षित यानी आपल्या अमरकोशाच्या टीकेंत सागितलेलें आहे.

यदुतुर्वसु चंद्रवंशीय असें सागण्यात पुराणिकांचा कांहींतरी हेतु असावा असें दिसतें. कारण चंद्राची पूजा या जनातील आजच्या पिढीपर्यंतहि चालत आली आहे. सर्व महिन्याच्या पौर्णिमा या सणासारख्या महत्त्वाच्या आहेत.

'शिन्' शब्द सिनीवालीशीं संबंधित असेल तर ही चंद्रपूजा भारतीयांकडून बाहेरच्या देशात गेलेली आहे, असें परदेशात चंद्राशीं संबंधित असलेल्या रूढि-प्रघातांना पाहून म्हणावेसें वाटते. Sabbath ह्या शब्दाच्या उत्पत्तीविषयीं एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिकात ( 11th Ed. ) असें म्हटलें आहे : The word has nothing to do with fasting in the sense of enjoying repose The grammatical form of Sabbath suggests a transitive sense, 'the divider' and apparently indicates Sabbath as dividing month याचा अर्थ महिन्याचे पंधरा पंधरा दिवसाचे दोन भाग झाले. कोणती विशिष्ट तिथि चंद्रपूजेची मानावी याबद्दल ( पौर्णिमा, चतुर्दशी, प्रतिपदा वगैरेसंबंधीं ) वाद असला तरी चंद्राचा संबंध या Sabbath शीं आहे असे तज्ज्ञ सागतात. "Sinai" ( The Biblical Mountain ) याचा संबंध चंद्राशींच येतो. As sin means 'moon', this fast has been connected with the name of sinai असें काहींचें मत आहे. पण काही विद्वानाना हें संमत नाहीं. ( पहा Encyclopidia Britanica XI Edition ) Sabbath चा मूळ अर्थ महिन्याचे दोन भाग आणि त्या काळचा व्रतोपवास असा असल्याचें तज्ज्ञांचें मत आहे. म्हणजे वद्य चतुर्दशीच्या चंद्राची पूजा आणि उपवास यात ध्वनित होतात. हिंदूंत प्रत्येक महिन्याच्या वद्य चतुर्दशीलाच शिवरात्र म्हणण्याची पद्धत आहे; माघ महिन्यातील वद्य चतुर्दशीला महाशिवरात्र म्हणतात. चतुर्दशी म्हणजे शिनीवाली, अर्थात् शिनीवालीचा संबंध शिवाशी आला. शिन् शब्दाचा संबंध शिवाशी आल्याचें मागें सागितलेंच आहे. शिन्, चेन्, केन् या शब्दाच्या परस्परसंबंधाकडेहि येथे लक्ष देणें जरूर आहे. "सर्वमंगलमांगल्ये **शिवे** सर्वार्थसाधके" असे श्रीचे केलेलें वर्णन योग्यच आहे. सर्वमंगल म्हणजे चागलें ( चाग=छान्=चेन्=ताबूस हे मागे दिलेले अर्थ येथे लक्षात घ्यावे म्हणजे शिव शब्दाचा अर्थबोध होईल. )

वरील उताऱ्यावरून चंद्राशी संबंध असलेल्या या देवतेची उपासना पत्तिजनापासून आर्यांनी घेतली असली पाहिजे असे म्हणणे चुकीचें होईल काय?

**एकवीरा-एल्लम्मा**

परशुरामाची आई, जमदग्नीची पत्नी रेणुका हिची पूजा कर्णाट-महाराष्ट्रांत

सर्वत्र आहे. पण निरनिराळया ठिकाणीं या देवीला निरनिराळीं नावें आढळतात. कांहीं ठिकाणी एल्लम्मा तर काहीं ठिकाणी रेणुका अशा स्वरूपात ही देवी दृष्टीस पडते. या दोन प्रातातच या देवतेच्या पूजेचा प्रसार इतका कां असावा हा एक विचाराचा प्रश्न आहे. केवळ जमदग्नीची पत्नी म्हणून काही हिची पूजा होत नाहीं. कदाचित् परशुरामाची आई म्हणून पूजिली जात असेल तर त्यात थोडें तथ्य आहे. एकवीरा हे नाव याचे सूचक असावे.

कर्णाटकात रूढ असलेल्या एल्लम्माच्या पूजाप्रकारावरून या उत्सवात रेणुकेपेक्षा भूमातेची पूजाच अभिप्रेत दिसते. चैत्रपौर्णिमेस होणाऱ्या उत्सवात ही देवी सुवासिनी होते आणि मार्गशीर्ष पौर्णिमेस ती विधवा होते अशी समजूत आहे. मार्गशीर्षात पिकाची कापणी वगैरे होऊन भूमीचे सौभाग्य नष्ट होते. तर चैत्रमासापासून वसंतऋतूची पालवी फुटते. यात ऋतूंची, निसर्गाची पूजाच मुळात असावी असे दिसते. आणि या ऋतूंच्या पूजेचा आरोप या देवीवर केलेला दिसतो.

एल्लम्माचे सर्व उत्सव नेमके पौर्णिमेसच असतात हा केवळ काकतालीय न्यायच असेल का ? तें काही असो, हे उत्सव म्हणजे कर्णाट-महाराष्ट्राचे वैशिष्टय आहे; हा या दोन जनातील जुन्या मैत्रीचा अवशेष आहे. यल्लम्मा या शब्दाचा अर्थ आज बऱ्याच जणाना उमगत नसेल. यल्ल म्हणजे सर्व, अम्मा म्हणजे माता; यल्लम्मा म्हणजे सर्वांची माता—जगदंबा. लीळाचरित्रात काऊळगावी एकवीरा असल्याचा उल्लेख आहे. यल्लु आई हे नाव महाराष्ट्रात आजहि आढळते. कर्णाटकातील यल्लम्माच्या क्षेत्रास वऱ्हाडपर्यंतचे भक्त येतात. श्री चक्रधराच्या शिष्यात यल्हंभट आणि यल्हाई असल्याचे लीळाचरित्रावरून दिसतें. श्री. चक्रधराचें वास्तव्य अस्सल महाराष्ट्रातच होतें असें त्याचे चरित्रकर्ते अभिमानानें सागतात. त्या प्रातातील शिष्टमंडळींतहि यल्हंभट, यल्लु-आई या नावाची मंडळी होती हे निश्चित होतें. लोकप्रिय देवाची नावें मुलाना टेवतात हें लक्षात घेता ही देवता वरहाट—खानदेशीं बरीच वर्चस्वी व प्रबळ होती असे म्हणावें लागतें. अंबा ( देवी ) तुका ( देवी ) प्रमाणें यल्लु ( देवी ) वरून स्त्रियाचीं तर खरेंच, पण पुरुषाचीहि नावे महाराष्ट्रात खुद्द वरहाट प्रातीं रूढ होतीं; आणि तीं ब्राह्मणांपर्यंत येऊन पोंचलीं होतीं असें श्री. चक्रधर शिष्याच्या नांवांवरून

दिसते. कर्णाटकात यल्लंभट हे नाव अजून रेणुकाभक्तात रूढ आहे. यल्लम्माच्या ऐवजीं संस्कृत नाव एकवीरा, हे पुढें प्रचारात येऊं लागलेलें दिसते.

अशाप्रकारे कर्णाट-महाराष्ट्रातील मर्गजा ( मरगव्वा ), मरी आई ( मारेम्मा ) वगैरे आणखी काही देवताचा उल्लेख करता येईल. पण सध्या विस्तारभयास्तव येथेच थाबणे बरे.



: ७ :

# धर्मपंथ

महाराष्ट्रांतील निरनिराळ्या संप्रदायाचा अभ्यास विशेष आस्थेनें अलीकडे चालला आहे. पण ऐतिहासिक कालानुक्रमाने भिन्नभिन्न मताच्या तुलनात्मक अभ्यासास अजून आरंभ झालेला नाही. त्यामुळें महाराष्ट्र सस्कृतीतील या विषयीची काहीं स्थळे अजून तशीच संदिग्ध राहिलीं आहेत. उदाहरणार्थ मुसलमानाचा महाराष्ट्रातील धर्मपंथाशी आलेला संबंध हें एक अजून न सुटलेले कोडें आहे. श्री जनार्दन स्वामींना मुसलमान अवलियाच्या रूपानें दत्ताचा साक्षात्कार झाला अशी एक दंतकथा आहे. पण हिंदु देवानें मुसलमान अवलियाचे रूप धारण करून दर्शन देणे, हे आजच्या मुसलमानाबद्दल असलेल्या तिरस्काराच्या दृष्टिकोनामुळे काहीं पंडिताना आश्चर्यजनक वाटते व त्या उद्वेगात ते काहींतरीच भरमसाट लिहीत असतात. कानफाटे म्हणून तिरस्कृत ठरलेले नाथसंप्रदायी ज्ञानेश्वरासारख्याचे गुरु कसे होतील ही शंका बलवत्तर होऊन काहीनीं ज्ञानेश्वराचे गुरु असलेले नाथच निराळे असा वाद उत्पन्न केला आहे. हीं अशीं कोडीं बरीच आहेत. त्या सर्वांचा निर्देश करण्यापेक्षा, ऐतिहासिक पार्श्वभूमीवरून विहंगावलोकन केल्यास हीं कोडी आपोआपच सुटलेलीं दिसतील.

## गुरुदत्त मार्ग

महाराष्ट्रात महानुभाव पंथ, वारकरी संप्रदाय, श्रीरामदास पंथ वगैरे पंथ, कालाच्या ओघात निरनिराळ्या नांवानी पुढें आलेले आहेत. आपापल्या पंथाचीं वैशिष्ट्यसूचक अशींच त्याचीं ती नावें आहेत खरें; पण "गुरुदत्त मार्ग" असें या सर्वांना लागू होणारे जास्त अन्वर्थक व समावेशक नाव सुचविता येईल. गुरूंनी दिलेला आणि शिष्यानीं पुढें चालविलेला असा हा "गुरुदत्त मार्ग" होय. *

## श्रीगुरुदेवदत्त

"श्रीगुरुदेवदत्त" या शब्दाबरोबर काही एका विशिष्ट देवाची मूर्ति डोळ्यासमोर उभी राहातें. तीन तोडाच्या श्रीदत्तमूर्तीचे चित्र महाराष्ट्रांत तर सुविख्यात आहे. या चित्रातील तीन तोडें ही ब्रह्मा, विष्णु, महेश्वराची, असे सागितले जाते. काषायाबर धारण केलेल्या या त्रिमूर्तीजवळ एक गाय उभी असते आणि बाजूस चार कुत्री चितारलेलीं दिसतात. गोमाता ही पृथ्वीची सूचक अशी एक समजूत आहे. पण बाजूस उभ्या असलेल्या या कुत्र्याचा अर्थ काय ?

बाजूस असलेल्या या चार कुत्र्याना पाहिले असता, दत्त ही देवता वैदिक संप्रदायाची कशी असेल अशी एक शंका मनास चाटून जाते. कुत्रा हा वैदिकाना न आवडणारा अपवित्र प्राणी. त्याचा स्पर्श झाला असता सचैल स्नान करावे अशी धर्मसूत्रात आज्ञा केलेली आहे.

'शुनोपहतः सचैलोऽवगाहेत' तसेंच,
शुना दष्टस्तु यो विप्रो नदी गत्वा समुद्रगाम्
प्राणायामशतं कृत्वा घृतं प्राश्य विशुध्यति ॥

---

* हें नाव कसें सार्थ आहे हें प्रथम नवभारतमधील एका लेखात मी स्पष्ट केलेलें आहे. ( पहा : नवभारत, सप्टेंबर १९४९.) 'गुरुमार्ग' हें नाव डॉ. सौ. इरावतीबाई कर्वे याच्यासारख्या चिकित्सक विचारवंतांनाहि मान्य झाल्याचे कळतें. ( मराठी लोकाची संस्कृति, पा. २५२, ५३. )

सुवर्णरजताभ्या वा गवा शृंगोदकेन वा ।
नवैश्च कलशैस्स्नात्वा सद्य एव शुचिर्भवेत ॥
( बोधायन धर्मसूत्र. १२४–१२५ )

हें धर्मसूत्र क्रि. पू. ५०० ते २०० च्या सुमारास रचलें गेलें असावे असे तज्ज्ञाचे मत आहे.

अग्निहोत्री वगैरे श्रद्धाळु वैदिक मतानुयायी मंडळीत ही परंपरा अजूनहि रूढ आहे. कुत्र्यासारख्या अपवित्र प्राण्यास जवळ बाळगणारा देव आणि त्यातूनहि संन्यासी ! हा वैदिक मार्गी असणें शक्य आहे का ?

दत्ताच्या चित्रातील ती कुत्रीं, कुत्रीच नव्हेत, तर कुत्र्याच्या रूपाने वेद दत्ताला अनुसरीत आहेत असे सागितलें जातें. पण कोणत्याहि वैदिक देवतेच्या पाठीशी कुत्री ( वेद ) आहेत असें सुचविलेले आढळत नाही. मल्हारी मार्तंडाजवळ कुत्रे आहे. पण तें कुत्रें वेदसूचक आहे असे सागितलेले ऐकिवात नाही. आणि मल्हारी मार्तंड ही देवता मुळात ( मल्लयदेवता ) आर्यांची नसून पत्तिजनाची आहे. पत्तिजनाचा कुत्रा हा आवडता प्राणी आहे. तमिळ साहित्यात वडुकर हट्टिकार यांचें वैशिष्ट्य म्हणून त्याच्या गल्लमिशा व त्याचीं कुत्री याचें वर्णन येते (Some Contributions of South India) विदर्भात वाघमारे कुत्रे ( माचलः ) असल्याचे वर्णन जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणात येतें (Vedic Index Vol II p. 297) हटगार–धनगराना कुत्र्याची आवश्यकता किती असेल ही सहज जाणता येणारी गोष्ट आहे. ‘ श्वपतिभ्यः ’ हें रुद्राचें वर्णनहि येथे आठवावे. यावरूनहि रुद्र–गिरिश आर्येतराचाच देव हें पुनः निदर्शनास येत आहे.

वेद हे अपौरुषेय; त्या वेदाना संपूर्ण अनुसरणे ही वैदिकाची निष्ठा आहे. असें असता वेदच अनुयायी होऊन, अवधूत, निरंजन अशा दत्तामागें कुत्र्याप्रमाणें पाठीस लागावेत या सकेतामध्यें (Symbolism) काही तरी विशेष खोंच खास आहे. छायेप्रमाणे येथें वेद पाठीमागें जातात; पण वेदास अनुसरून हा देव जात नाहीं असाच ध्वन्यर्थ या चित्रातून निघत नाहीं काय ? त्रिमूर्ति दत्ताच्या कल्पनेमागें ब्रह्मा, विष्णु, महेशाच्या ऐक्याची सूचना आहे. पण त्या देवाला तीन तोंडें होतींच अशी काहींची समजूत आहे.

पण पुराणांत या कल्पनेला आधार मिळत नाहीं. श्रीभागवतादि पुराणांत दत्ताचे नांव येते. वेदांतून दत्ताचा उल्लेख नाहीं. पुराणांतून येणाऱ्या दत्ताची कथा अशी आहे : अत्रिऋषीपासून अनसूयेस दहा पुत्र झाले. त्यापैकीं दत्त हा एक; ब्रह्मा, विष्णु, महेश याच्या अंशानें अत्रीस झालेल्या एकेका मुलात–– ब्रह्मा–सोमरूप, विष्णु–दत्तरूप, व रुद्र–दुर्वासरूप, असे निरनिराळे तीन पुत्र जन्मास आले. यावरून दत्त हा केवळ विष्णूचा अवतार हें स्पष्ट होतें. असें असता आज सर्वत्र प्रसिद्ध असलेल्या दत्ताच्या चित्रात त्रिमूर्तींना एकत्रित केलेलें दिसतें. हें असें का ?

## गुरुदत्त आणि यतिपंथ

दत्त हा एक यति म्हणून सर्वश्रुत आहे. यतिपंथ मुळात वैदिकमार्गी नसावा असें म्हणण्यास पुष्कळ जागा आहे. अग्निपूजा हे आर्यांचे वैशिष्ट्य आहे. पण यति हे निरग्नि आहेत. अग्नि म्हणजे शिखी. ब्राह्मणाची शिखा ही ब्राह्मणाच्या शिखी–(अग्नि)च्या उपासनेचें सूचक आहे. शिखा नष्ट झाली की द्विजत्व नष्ट होतें. यति होण्याने ब्राह्मणाची शिखा व यज्ञोपवीत या दोन्हीं-वरहि घाड येते. निरग्नि हा शब्द शिवीप्रमाणे वैदिक वापरीत असत. शिखा व उपवीत हे दोन्ही संकेत झुगारून अशाप्रकारे निरग्निपणा स्वीकारावयास साग-णारा पथ वैदिक असणे शक्य आहे का ?

इन्द्र हा यतीचा वैरी होता असें तैत्तिरीय संहितेवरून कळतें ( ६. २–७–५ ). इद्रानें यतींना मारुन लाडग्यास चारलें ( ऐतरेय ब्राह्मण ७–२८ ). काहीं यति शरण आल्यानें इंद्राने त्याचें संरक्षण केलें, अशा प्रकारचाहि एक उल्लेख मिळतो. यावरून पुढे जरी यतिपंथाला वैदिकानीं जवळ केले असले तरी पूर्वी तो मार्ग वैदिकाना संमत नव्हता हे चागलेंच ध्वनित होत आहे.

‘ यतिसंप्रदाय अवैदिकाचा होय असें श्री. रमाप्रसाद चंदा यानीं, मोहेंजोदारोविषयक आपल्या एका लेखात प्रतिपादिलें आहे.

The later Vedic literature–repeatedly refers to a legend which shows that the Yatis incurred the hostility of Indra and were destroyed as a consequence. The Yaties were not originally priests of the Vedic cult like the Bhrigus and

Kanwas, but non-Vedic rites were practised by the indegenous pre-Aryan population of the Indus Valley. In the legend of the slaughter of the Yatis by Indra we probably hear an echo of the conflict between native priesthood and intruding Rishis in the proto-historic period As applied to a priest, Yati can only mean a person engaged in religious exercises such as tapas, austerities and Yoga Von Schroeder understands by the term a magician priest or a Shramana The marble statuette of Mohenjo-Daro, with head, neck and body quite erect and half shut eyes fixed on the tip of the nose, has the exact posture of one engaged in practising Yoga These Yatis primarily the Yogis receded into the background, were gradually reduced to the condition of the out-caste religious mendicants or Viatyas. (Survival of the Prehistoric Civilization of the Indus Valley, Memoir of the Archaeological Survey of India No 41 of 1921).

शुद्ध वैदिक मार्ग, यतिपंथाशी विरोधी आहे. कारण यज्ञसंस्था वैदिक मार्गाचा पाया आहे आणि अग्निहोत्री हा गृहस्थाश्रमीच असावा लागतो. पूर्व मीमासा ही कट्टर वैदिक मतानुयायी आणि संन्यासपंथाविरुद्ध आहे. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद याच्या नंतरच्या काळी उपनिषदे पुढें आली. उपनिषदांत तत्त्वज्ञानाला काहीं निराळीच दिशा लागली. उपनिषदे यतिपंथाला पोषक आहेत. यातील तत्त्वज्ञान वेदातील विचारापेक्षा भिन्न आहे. हा औपनिषदिक संन्यासमार्ग म्हणजे यज्ञसंस्थेच्या उत्कर्षाच्या वेळी काहीं काल मागें पडलेला वेदपूर्वकालीन यतिपंथच होय. वैदिक यज्ञयागादीचें महत्त्व कमी होतांच पुनः त्या यतिधर्मानें डोकें वर उचललें. यतिपंथ हा संपूर्णपणें यज्ञसंस्थेच्या विरुद्ध असल्यानें आर्यांनीं बराच काळपर्यंत यतींना यज्ञभूमीच्या आत पाऊल टाकूं दिलें नाही. पण आपल्या देशांतील समन्वय बुद्धि अशा वेळीं केव्हांहि पुढे सरसावत असते. 'यज्ञ' शब्दाच्या अर्थामध्यें बदल करून यज्ञ म्हणजे केवळ अग्निक्रियाच नव्हे तर त्यात याहून पुष्कळ गोष्टींचा समावेश होतो, असे प्रतिपादन होऊं लागलें. कौषीतकि वगैरे उपनिषदातून अशा

प्रकारचीं मते प्रतिपादिलेलीं आपणांस पाहावयास मिळतील. या यज्ञ शब्दाचा अर्थ किती व्यापक झाला आहे याचा पुरावा भगवद्गीतेमध्यें चागलाच मिळतो.

अशा प्रकारें यज्ञ शब्दाचा अर्थ बदलून घेण्याची आवश्यकता का उत्पन्न झाली असावी ? अग्नींत आहुति घालणें वगैरे प्रकारानेंच यज्ञ होतो असें नव्हे तर जगात चाललेल्या सर्व क्रियाहि यज्ञपरच आहेत, असें प्रतिपादण्याची एका काळीं आवश्यकता उत्पन्न झाली. आपल्यातून जुन्या पद्धतीच्या यज्ञसंस्थेचा तिरस्कार करून बाहेर फुटून जात असलेल्या मडळींना काहीसे समाधान देऊन आपल्यातच ठेऊन घेण्याचा हा प्रयत्न होता. वेदातून विवरण केलेल्या पद्धतीनें होमहवन करण्याचे सोडले तरी तुम्ही ईश्वरार्पण बुद्धीनें जें करीत आहा ते सर्व काही यज्ञच होय, असें म्हणून विरोधी पक्षाचें सात्वन करण्याची पाळी यावी यात यतिपंथाचा विजय झाला हे कबूल केलेच पाहिजे. "वेदवादरताः" "त्रैगुण्य-विषया वेदाः" हीं गीतेंतील वाक्यें कट्टर वैदिकमार्गीय पूर्वमीमांसेवर टीका करणारीं आहेत. हे उल्लेख यतिपंथाच्या विजयाचे निदर्शक आहेत.

यतिपंथ हा शैव पंथीयाच्या कडून आर्यांना उचलावा लागला असे वाटतें. ब्राह्मणातील सन्यासपंथास अनुकूल मनोवृत्तीचे लोक शैव पथीयातच विशेष आहेत. यति पंथ हा अतिपुरातन काळापासून वैदिक मार्गातील एक महत्त्वाचें अंगच जर असते तर ब्राह्मणातील सर्व वर्गाकडून सारख्याच रीतीनें त्याचा स्वीकार केला गेला असता. पण आज तशी स्थिति दिसत नाहीं. ब्राह्मणांतील माध्व आणि श्रीवैष्णवात सर्रास कुणालाहि सन्यास घेण्याची परवानगी नाही. विरक्ति उत्पन्न होताच संन्यास घेण्यास हरकत नाही अशी शैवात रूढि आहे. मोक्षाकरिता शेवटी संन्यास घेण्याची चाल शैवात जशी सर्रास एकेकाळीं होती, तशी माध्वात आणि श्रीवैष्णवात कधीच नव्हती. या दोन्ही पंथात पीठाधीश मात्र संन्यासी असतात. आपल्या पंथाच्या रक्षणार्थ आणि प्रसारार्थ शाकरमठाच्या नमुन्यावर ही पीठे अस्तित्वात आलेली आहेत. अशा कांहीं मठाव्यतिरिक्त माध्व आणि श्रीवैष्णवात कोणी व्यक्तिशः संन्यास घेण्याच्या प्रवृत्तीस कोठेंहि उत्तेजन दिलेलें दिसत नाही. यामुळें हा संन्यास–पंथ शैवांच्या कडूनच रूढ झाला असावा असें म्हणणें जरूर वाटतें. आणि तो वेद–पूर्वकालीन असावा हेंहि अनुषंगानें सिद्ध होतें. संन्याशाच्या शाटीचा काषाय

रंग हें शैवाचें ( शिव=लाल ) वैशिष्ट्य आहे. कट्टर द्वैती, शैव–शाक्त–विरोधी व पंचकृष्णास परम दैवत मानणाऱ्या चक्रधरानीं काळें वस्त्र आपल्या पंथाचा संकेत असें ठरविलें. दिगंबर जैनात श्वेतांबर आहेत. बौद्धाचे वस्त्र पिवळे आहे. औपनिषद तत्त्वज्ञान, यज्ञविरोधकास पचवून घेण्याच्या दृष्टीने आवश्यक झालें तरी पुढे जैन आणि बौद्ध धर्माचा प्रसार झाला तो झालाच. जैनानीं आणि बौद्धानी काहीं काळ आपलें वर्चस्व गाजविले. पण पुनः गुप्त राजाच्या वेळी यज्ञसंस्थेचें पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न झालेला इतिहासात नमूद आहे. अश्वमेधादि यज्ञ पुनः होऊं लागले. तरीपण या प्रयत्नाना यावे तसे यश आले नाही आणि ते येणे शक्यहि नव्हतें. यज्ञसंस्थेचा बोजवारा गीतेच्या वेळीच उडालेला होता. आपण हरलो नाही हे दाखविण्याकरिता चातुर्वर्ण्य आणि यज्ञसंस्था याचे कसेबसे नाव राखून विरोधी मतास आपल्यात जागा करून देणे हिंदु धर्मास अवश्य झाले. यति धर्मास चतुर्थाश्रम म्हणून मान्यता मिळाली.

मूळ खरे आश्रम तीनच असे दिसतें. आर्यांना तीन आकडा विशेष प्रिय आहे. त्रयी विद्या त्रिवित्करण, वगैरे उदाहरणे पाहावी. वर्णहि आधीं तीनच. चौथ्या शूद्राचा समावेश शेवटी झाला. तसे ब्रह्मचर्य, गृहस्थ व वानप्रस्थ हे तीनच आश्रम. चौथ्या संन्यासाश्रमास "अत्याश्रम" असें नाव आहे. अत्याश्रम म्हणजे आश्रमधर्मापलीकडचा असा अर्थ होतो.

यतिपंथ वर्णाश्रम मानीत नाही. म्हणजे तो वर्णाश्रमसंस्थेला विरोधी आहे. देवास सर्वस्वीं शरण जाऊन परमेश्वराचा दास किंवा सेवक या भावनेनें यावज्जीव आयुष्य कंठणें यतिपंथाचें मुख्य लक्षण आहे. यतिपंथाचा प्रसार समाजात जसा जास्त झाला तसा लोकाचा यज्ञपंथावरील विश्वास उडाला. यामुळेंच जैन व बौद्ध मताचा सर्वत्र फैलाव होण्यास अवसर मिळाला.

यज्ञसंस्थेचें पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न फसल्यानंतर वैदिक धर्माने, संन्यासमार्गास आपल्या विचारात सामावून घेऊन जैन व बौद्ध पंथ हाणून पाडण्याचा प्रयत्न केला आणि त्याचें चिह्न म्हणजेच योगमार्गीय अवधूत 'दत्त पंथ' होय.

## श्रीशंकराचार्य आणि यतिपंथ

चातुर्वर्ण्याचें वावडें असलेला यतिपंथ आत्मसात् करण्याचा प्रयत्न श्रीशंकराचार्यांसारख्या मेधावी महापुरुषानें मोठ्या खुबीनें केला आहे. त्यांच्या दिग्विजयावरूनच प्रतिपक्षास त्यानीं हाणून पाडले हें सांगावयास नको. पण शांकर दिग्विजय ग्रंथातील एक गोष्ट फार सूचक अशी आहे, ती कथा वाचताना श्रीशंकराचार्यांच्या सबंध कार्याचा डोलारा हादरल्यासारखा वाटतो. ती गोष्ट अशी : काशीस गंगास्नान करून श्रीशंकराचार्य परत येत होते. वाटेंत समोरून एक अस्पृश्य गृहस्थ त्यांना धडकून निघाला. तो जवळ येताच श्रीशंकराचार्य "शिवशील" असे म्हणाले. तें ऐकून तो हरिजन म्हणाला, "ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः" अशा तऱ्हेचे तत्त्वज्ञान प्रतिपादन करणाऱ्या आपल्या तोंडी शिवाशीव, विटाळ ही भाषा कशी ?"

या पेचातून श्रीशंकराचार्यांनी कशी सोडवणूक करून घेतली याचे यथार्थ वर्णन—वास्तव सत्य त्या चरित्रलेखकाने नमूद केलेले नाहीं. अंगावर शेकणाऱ्या अशा प्रकारच्या प्रतिकूल पेचप्रसंगातून निसटण्याकरिता काही तरी "चमत्कार" (अघटित घटना) घडून आल्याचे सांगण्याची क्लृप्ति लढविण्याची प्रथा पौराणिकानीं बऱ्याच जुन्या काळापासून रूढ केली आहे. प्रस्तुत प्रसंगी पुराण लेखक मोठ्या अडचणीत आलेला आहे. यतिपंथीय तत्त्वज्ञानास अनुसरून भेदाभेद न करिता अस्पृश्यास श्रीशंकराचार्य शिवले, असे म्हणावे तर वर्णाश्रम धर्माचा पाया खचणार ! श्रीशंकराचार्यांनी अस्पृश्यास आपल्या सावलीसहि उभे राहूं न देता त्याला दूर हाकललें असेल, तर श्रीमत् शंकराचार्यांनी काश्मीर ते रामेश्वरपर्यंत प्रवास करून ज्या तत्त्वज्ञानाचा डंका पिटविला, त्याच्या अगदी विरुद्ध त्यांचे वर्तन केल्याचा आरोप त्यांचेवर येणार ! या कैचीतून निसटण्यास, श्रीशंकराचार्यांच्या समोर परीक्षेकरिता उभी ठाकलेली व्यक्ति अस्पृश्य नसून प्रत्यक्ष काशी विश्वेश्वरच तो वेष धारण करून तेथे आल्याची बतावणी करणे, पुराणिकास जरूर झालें. श्रीशंकराचार्य याप्रसंगीं कसे वागले हें, तेथें आलेला गृहस्थ श्रीविश्वेश्वराचा अवतार असें सांगण्याने काही स्पष्ट होत नाहीं. पण ज्ञानी सिद्ध पुरुष अशावेळीं चातुर्वर्ण्याची बंधने पाळीत नसत असाच आजपर्यंतचा इतिहास आहे.

निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः" अशा तऱ्हेच्या वचनावरून चातुवर्ण्यव्यवस्था न पाळण्याची ज्ञानी सिद्धांची वृत्ति उघड होत आहे. आणि बृहत्स्तोत्ररत्नाकरांत दिलेल्या श्रीमत् श्रीशंकराचार्यकृत मनीषापंचकांतील "चांडालोस्तु स तु द्विजोस्तु गुरुरित्येषा मनीषा मम" या श्लोकावरून श्री शंकराचार्यांनीं त्यावेळीं अस्पृश्यता पाळली नाहीं असेंच म्हणावे लागतें.

सनातनी वैदिक मताला, यतिपंथास दूर सारणें अशक्य झालें. धरलें तर चावतें, सोडलें तर पळतें, अशी अवस्था येऊन ठेपली. या प्रसगातूनहि हिंदूंच्या समन्वयबुद्धीनें वाट ही काढलीच. यतिपंथाला सोवळें करून आश्रम व्यवस्थेंत शेवटीं जागा दिली. आणि सिद्ध–बुद्धांना मुक्तावस्थेंत वर्णाश्रमाचे कोणते नियम बंधनकारक होत नाहींत असा नियम सांगून त्याना अपवादात गणलें.

## गुरुमार्ग

वैदिक संप्रदाय आणि यतिपंथ यातील आणखी एक महत्त्वाचा भेद लक्षांत ठेवण्याजोगा आहे. वैदिक मार्ग, विचार–स्वातंत्र्यवादी आहे. बुद्धीची उपासना येथें मुख्य आहे. वैदिकाच्या नित्य उपासनेंतील गायत्री मंत्रात "धियो यो नः प्रचोदयात्" अशी प्रार्थना केली जाते. वैदिक मार्गात 'धी' (बुद्धी) ची उपासना मुख्य आहे. विवेकाला–विचाराला पटेल अशाच गोष्टी मान्य करण्याची प्राचीन ऋषीची आज्ञा आहे. "यान्यनवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि नो इतराणि । यान्यस्माकं सुचरितानि तानि त्वयोपास्यानि नो इतराणि" ॥ (तै. उ.) या आज्ञेत शिष्यानें सतत जागृत बुद्धि ठेवावी व गुरूपासून ग्राह्य तेवढेंच घ्यावें, असे स्पष्ट बजावले आहे. डोळे मिटून गुरूने सागितलेलें एकूण एक आचरण्याचा आदेश दिलेला नाहीं. गुरूची थुंकी झेलणें वैदिक संप्रदायास मान्य नाहीं.

'श्रद्धा ही एकमेव उद्धारक शक्ति आहे. गुरूचें वाक्य हेंच वेदवाक्य. गुरुमुखाशिवाय कोणालाहि ज्ञान होणें शक्य नाहीं. गुरूहून श्रेष्ठ दुसरें कोणी नाही' अशी यतिपंथाची विचारसरणी आहे. "गुरुर्ब्रह्मा, गुरुर्विष्णुः, गुरुर्देवो महेश्वरः ॥ गुरुस्साक्षात् परब्रह्म" अशा तऱ्हेची दृढ श्रद्धा असणें या मार्गाचे

वैशिष्ट्य आहे. "शिष्यादिच्छेत् पराजयम्" या तऱ्हेच्या मनोवृत्तीला या मार्गांत कुठेंहि थारा नाहीं.

गुरु हेंच दैवत मानणारा तो गुरुमार्ग. एके काळीं हा पंथ निरीश्वरवादी असावा असें मानण्यास पुष्कळ जागा आहे. या मार्गांत गुरुच देवतेचें स्थान बळकावतो. गुरु हा देवाचा प्रतिनिधि असें सांगितलें जातें.

गुरुः पिता गुरुर्माता गुरुरेव परः शिवः ।
शिवे रुष्टे गुरुस्त्राता गुरौ रुष्टे न कश्चन ॥

गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुः गुरुर्देवो महेश्वरः
गुरुरेव परं तत्त्वं तस्मात् गुरुमुपाश्रयेत् ॥

हें गुरुमाहात्म्य बुद्धिप्रधानाना कधींच पटणे शक्य नाहीं. बुद्धिप्रधानाचे मत कोणा एका व्यक्तीस सर्वगुणपरिपूर्ण, अनंतगुण युक्त, पूर्ण-प्रज्ञ मानण्यास तयार नसतें. सार्वकालिक सर्वव्यापी अशा अव्यक्त शाश्वत तत्त्वाकडे त्याच्या मनाचा कल असतो. भावनाप्रधानाना अव्यक्त अमूर्त तत्त्वाचे आकलनच होऊं शकत नाहीं; त्याचा कल विशेषेकरून साकार, सगुण, चालत्या-बोलत्या वस्तुविशेषाकडे असतो. अव्यक्त महान् तत्त्वाला फार तर "सहस्रशीर्षा पुरुषः" असे काहींसे व्यक्त रूप कल्पून धीमान् आपल्या भावनाचें समाधान करीत असतो. पण भावनाप्रधान व्यक्ति मर्त्य वस्तूंतच अव्यक्त महान् तत्त्वाना आवाहन करून आपल्या बुद्धीला तेथेंच गुगवून ठेवते. पहिला तत्त्वज्ञानी, तर दुसरा भक्तियोगी. पहिला ज्ञानमार्गी, तर दुसरा गुरुमार्गी.

गुरुसंप्रदायात, आपण मानलेल्या गुरूंत किंवा वीरांत देवत्व कल्पून त्याच्या प्रतीकाची, समाधीची पूजा करणें हें एक महत्त्वाचे अंग समजलें जाते. समाधीवर लिंगाची किंवा मूर्तीची स्थापना करून तेथें देवत्वाचा आरोप केलेला पुष्कळ ठिकाणीं आपणास पाहावयास मिळतो. "वीरगळ" (वीरगल्लु) व टाक हें याच प्रकारचें आणखी एक उदाहरण आहे. धी-उपासक वैदिक मार्गांत अशा प्रकारे समाधि-पूजेचें प्रस्थ माजविलेले कोठेंच आढळणार नाही. वशिष्ठ विश्वामित्रादि प्राचीन वैदिक ऋषींच्या (ते जर यति असते तर)

समाधीचे अवशेष कोठे ना कोठे नाममात्र तरी असलेले आपणास पाहावयास मिळाले असते. बुद्ध–महावीराच्या पंथाप्रमाणें एकाच गुरूच्या परंपरेनें उदय पावलेला हा वैदिक मार्ग नव्हे. अनेक ऋषींच्या दर्शनाचे सम्यक् फळ म्हणजे वेद होत. पूर्वसूरींचें चागलें तेवढे घेऊन भविष्याकडे आशावादी होऊन मार्गक्रमण करणारा हा वैदिक मार्ग आहे. या विजिगीषु वृत्तीनें पुढें सरसावणाऱ्या मनोवृत्तीच्या या लोकात, वाटेंत येईल ते विरोध पचवून पुढे पाऊल टाकण्याची युयुत्सुवृत्तिहि टळकपणे दिसून येते. समाधिपूजेला, भूतपूजेला त्याच्या विचारात थारा नाही.

पण गुरुमार्गात तर " गुरुपरतें अन्य दैवत नाहीं " हे दाखविण्याच्या उद्देशानेंच दत्ताचें अर्वाचीन चित्र पुढे आलेले आहे. त्या प्रतिभाशाली चित्रकारानें निरनिराळ्या संकेतानी त्यात संपूर्ण गुरुमहिमा वर्णिलेला आहे हें चित्र म्हणजे जसें काही गुरुचरित्राचें सारच आहे. भागवतादि पुराणातून मुळात दत्त हा विष्णूचाच अंश असें स्पष्ट असता गुरु हाच विष्णु, गुरु हाच ब्रह्मा, गुरु हाच शिव एवढेंच काय गुरु म्हणजेच परब्रह्म वस्तु असे ध्वनित करण्याची त्या चित्रकाराची इच्छा त्यातील प्रत्येक प्रतीकातून पूर्णपणें व्यक्त होत आहे. दत्ताला दाखविलेली ब्रह्मा–विष्णु–महेश–सूचक तीन तोंडे, दत्तमूर्तीजवळच कृपा याचीत उभी असलेली पृथ्वीरूपी गाय, गुरूच्या तोंडून येईल ते वेदवचन हे सुचविण्याकरिता गुरूच्यामागें सावलीप्रमाणे (कुत्र्यासारखे) धांवणारे चार कुत्रे हे वेद, आणि केवल आत्मानंदाकरिता संसारबंधनांतून बाहेर पडलेला हा गुरु हे सुचविणारी त्याची भगवी कंथा, झोळी व कुबडी हे सर्व संकेत अर्थपूर्ण नाहीत असे कोण बरे म्हणेल ?

कालचक्रात परस्परविरोधी विचाराच्या समन्वयाची आवश्यकता उत्पन्न होऊन परिस्थिति अनिवार्य झाल्याने, वेद कुत्र्याप्रमाणें गुरूच्या मागें धावतात असें दाखविणाऱ्या चित्राची, कट्टर सनातनी घरातून पूजा होत असलेली आपण पाहात आहों ! अशाच प्रकारें समाधिपूजा ( भूतपूजा ) हीहि आमच्या डोक्यावर बसलेली आज आपणास दिसत आहे.

धर्मसंप्रदायांची ही पूर्वपरंपरा, पार्श्वभूमि माहित नसल्यास आपल्या देशातील ऐतिहासिक काळांतील निरनिराळ्या धर्मपंथाच्या उलाढालींचा सरळ

अर्थ करणें शक्य नाहीं. महाराष्ट्रांतील महानुभाव वगैरे धर्मपंथांचा आढावा घेण्यापूर्वी त्याहून आधीं झालेल्या काही धार्मिक चळवळींचा इतिहास जमेस धरणें जरूर आहे. नवव्या–दहाव्या शतकाच्या सुमारास सबंध भरतखंडात सिद्ध किंवा नाथ संप्रदायाचे फारच मोठें वर्चस्व होतें. महायान बौद्ध पंथ मागे पडून यांतून पुनः एक नवीन लाट निर्माण झाली. बौद्ध धर्माच्या शेवटच्या या अवस्थेंत तो जवळ जवळ हिंदु धर्माचें दुसरे स्वरूपच बनला; किंवा हिंदु धर्मानें बौद्ध धर्म पचविण्याकरितां काहीसा कायापालट केला असे म्हटलें तरी चालेल. यामुळे सिद्ध किंवा नाथपंथ हा लोकास परकीय वाटला नाहीं. मत्स्येंद्र–गोरख प्रणीत हा पंथ हिंदुस्थानभर पसरला होता. या पंथांत गुरूचे स्थान काही और आहे. हिंदु देवदेवतांना त्या मतप्रणालीत कोठेच थारा नाही. वर्णाश्रम धर्म किंवा जातिभेद ते मुळींच मानीत नाहीत. आत्मसाक्षात्कार हेच जीवनातील एकमेव साध्य आहे, संसार केवळ माया, आत्मसिद्धीस विरागी (बैरागी) होणे कर्तव्य आहे, अशी ही नाथ संप्रदायाच्या विचाराची दिशा आहे. आत्मदर्शनाकरिता योगसाधन करण्यास हा पंथ सांगतो. हठयोगाची देह–शुद्धीकरिता जरूरी आहे; पण हा हठयोगच काही साध्य नव्हे. किंबहुना 'मनोलययोग' हेच या पंथाचें सार आहे.

उत्तरकालीन बौद्धधर्माच्या पकडीतून बाहेर पडता पडता हिंदु धर्मास त्याचे काहीं परिणाम भोगावे लागले. त्यात काहीं बरे तर काहीं वाईट असणें साहजिक आहे. नाथ संप्रदायात जातिबंधन नसल्याने त्या पंथाचे योगी जगभर आपल्या योगमार्गाच्या प्रसारार्थ हिंडूं शकले. नाथ योग्यानी युरोपचा प्रवास सुद्धा केलेला आहे. या पंथानेंच तिबेटला भारतीय संस्कृति नेली. हिमालयांतील गुरखे गोरखनाथाचे शिष्य असे सांगितलें जाते. गोरखनाथाच्या काहीं अंतेवासी शिष्यानीं अफगाणिस्तान, खोरासान वगैरे प्रांतांतून आपल्या पंथास अनुयायी मिळविले होते. अफगाणिस्तानात त्यांनी आपले मठ स्थापून वतनें संपादन केलीं होती. यावरून नाथपंथात मुसलमान शिष्यांचाहि समावेश झाला होता, हें निर्विवाद आहे. (Gorakhnath & Mediaeval Mysticism).

नाथ संप्रदायाच्या या अखिल भारतीय लाटेनें, आध्यात्मिक दृष्ट्या

जातिभेद नाहींसा होऊन एकजिनसी देश होण्याची शक्यता आपल्या भरत-खंडांत दिसूं लागली. बंगाल ते सिंध व काश्मीर ते रामेश्वरापर्यंत या संप्रदायानें आपला प्रभाव गाजवला. त्या बरोबर जातिभेदातील तीव्रताहि कमी होऊन अध्यात्मसाधनात सर्व–मानव–ऐक्य शक्य आहे हें या नाथ पंथानें दाखवून दिलें. नाथ पंथाच्या या प्रभावाचे पडसाद अकराव्या शतकाच्या पुढील काळीं हिंदुस्थानच्या प्रत्येक प्रातातून निनादित झालेले त्या त्या प्राताच्या धार्मिक चळवळीच्या इतिहासात नमूद आहेत.

नाथ संप्रदायाकडून सर्व जाती मोडून एक जात करण्याचा प्रयत्न अभावितपणे झाला. तसेंच त्याच्या धार्मिक आचरणावर तत्पूर्वी होऊन गेलेल्या पुष्कळ धर्मपंथाचे परिणामहि झालेले दिसतात. नाथगुरूंच्या यादीत आदिनाथ, पारसनाथ वगैरे काही जैन परंपरेची नावें आढळतात. " मलधारण व्रता " सारखे काहीं जैनधर्मीय आचार बऱ्याच नाथयोग्याच्या नित्य आचरणात दिसून येतात. बौद्ध धर्माचा परिणाम तर याहूनहि विशेष आहे. मनोलय योग किंवा सहज योग–शून्यसंपादन हें या पंथाचें ध्येय असून नाथ-पंथाने ही साधना बौद्ध धर्मापासून घेतलेली आहे. सिद्ध ( नाथ ) आज जरी शैव व वैष्णव आहेत तरी त्यांचा जास्तींत जास्त वारसा बौद्ध धर्माकडेच पोचतो. तिबेटात हा पंथ बौद्ध धर्माचीच शाखा असे समजले जाते. पण त्यानें हिंदुस्था-नात किंचित् निराळे स्वरूप धारण केले, आणि हिंदुधर्मात जागा पटकावली.

आपल्या देशात नाथपंथात काही शैव तर काहीं वैष्णव असे दोन प्रकार दृष्टीस पडतात. शिव किंवा विष्णूचे हे उपासक असे समजले जात असले तरी गुरूहून श्रेष्ठ अन्य दैवत नाही हीच त्या पंथातील आत्यंतिक श्रद्धा आहे. मराठी नवनाथचरित्रात मत्स्येंद्राला गुरुसाक्षात्कार झाला, असे लिहिलें आहे. हा गुरु कोण ? तो आत्रेय दत्त गुरुच असेल का याबद्दल शंका वाटते. कारण नाथपंथाची पूर्वपरंपरा बौद्ध धर्माशी जाऊन भिडते.

अनसूयापुत्र आत्रेय दत्तापासून वैदिक मार्गातर्गत गुरुपंथास आरंभ झाला असावा. या दत्ताच्या आईचे नाव " अनसूया " असें मोठें अर्थगर्भ आहे. जैन व बौद्ध परंपरा आपल्यात पचवून वैदिक पंथास उचलून धरणारा हा गुरु दत्त असूयारहित अशा या आईच्या पोटींच जन्मला. अनसूयेचा हा पुत्र

गुरुकृपा 'दत्त' आहे, असें गुरुचरित्रातील याच्या जन्मकथेवरून कळून येण्याजोगें आहे. आत्रेय दत्त–मार्ग हा नाथपंथाप्रमाणेंच सर्वसंग्राहक वृत्तीचा आहे. मुसलमानात दत्तभक्त आढळतात. बाबा बुडणगिरी ( म्हैसूर ) हें दत्तक्षेत्र असून तेथील पुजारी मुसलमान आहे. यात्रेस हिंदु आणि मुसलमान दोघेहि जातात. आधुनिक काळात दत्ताचे अवतार समजले गेलेले अक्कलकोटचे महाराज व निजाम राज्यातील श्री माणिकप्रभु याच्या अनुयायी वर्गात मुसलमान शिष्य बरेच आहेत. हा गुरुमार्ग, अवधूत–निरंजन पंथ आहे. वैदिकाना अशा रीतीने अवधूत–निरंजन, दिगंबर गुरुमार्गहि शेवटीं जवळ करावा लागलाच ! "करतलभिक्षा तरुतलवासः" अशा वृत्तीच्या निरंजन पंथीय दिगंबर यतीना जात कूळ वगैरे कोणतीहि बंधने आडवी येत नाहीत.

आत्रेय दत्त पथापूर्वी एक निरंजन सिद्धपंथ रूढ होता. अनसूयेकडे भिक्षेकरिता येणारे यति या पंथाचेच होत. त्यानी अनसूयेकडे मागितलेल्या भिक्षेचा प्रकार हा शाक्त–सिद्ध पंथाचा आहे. गुरुमाहात्म्यात दत्तगुरूच्या "विकृत्याचरणाचें" वर्णन आले आहे. त्यावरून हा पंथहि मद्यादि पंच–मकार साधनेस प्रतिकूल दिसत नाही. पण आत्रेय दत्त पंथाने वैदिक परंपरेपासून फटकून दूर न जाता जवळ येण्याचे ध्येय ठेविल्याने तो पुढे कालक्रमनो आत्यंतिक सोवळा बनलेला आज नरसोबावाडी, गाणगापूर वगैरे ठिकाणी दृष्टीस पडेल.

नाथ पंथ व आत्रेय दत्तमार्ग याचा अवलंब करून या संसारातून लौकर मुक्त होण्याकरिता लाखो स्त्री पुरुष प्रांतोप्रांतातून बाहेर पडले. सामाजिक बंधनाची आडकाठी त्याना विशेष नसल्याने आणि मुमुक्षु वृत्तीने बाहेर पडलेली सर्व मंडळी सारख्याच उच्च दर्जाची असणे शक्य नसल्याने या गुरुमार्गाला लौकरच अवनतीची कळा आली. मनोविजय मिळविलेला पाहाण्याकरितां "विकृत्याचरण" करण्याची चाल या मार्गात एकेकाळी सर्रास रूढ झालेली दिसते. स्त्रीसंगात राहून निःसंग वृत्ति आपणात भिनलेली सिद्ध करून दाखविणे; अपेयपान, अभक्ष्यभक्षणादि सिद्धगुरूंच्या आचाराकडे त्या गुरूंतील काहीं शक्तिविशेषांना मान देऊन किंवा भिऊन दुर्लक्ष करण्याची संवय आपल्या लोकाच्या अंगीं भिनून गेलेली आहे. असे असताहि कानफाटे हा शब्द निंद्य

वर्तनाचा द्योतक झाला. यावरून त्या काळीं या मार्गीत किती अनाचार माजला असावा याची सूचना मिळते.

## गुरुमार्गाचे दक्षिणापथांतील विविध पर्याय

बाराव्या शतकाच्या मध्याला गुरुमार्गातील शैव शाखेनें काहींसें नवीन रूप धारण करण्यास आरंभ केला. त्याचेंच .पर्यवसान पुढें वीरशैव धर्माच्या पुनरुत्थापनात झालें. वीरशैव लिंगायत मतावर नाथ संप्रदायाचा प्रभाव बराच झालेला आहे. बाराव्या शतकाच्या उत्तरार्धात होऊन गेलेल्या बसवादि प्रथम गणाचा गुरु अल्लमप्रभु हे नाथ पंथातील एक योगी होते, असें हठयोग प्रदीपिकेंत नमूद केलेल्या गुरुपरंपरेच्या नावातील उल्लेखावरून कळून येते. हा अल्लमच निराळा असें काही वीरशैवाचे मत होते. पण अल्लमप्रभूंच्या चरित्रावरील प्रभुलिंग लीले" या कानडी काव्यग्रंथास समकालीन असा चौदाव्या शतकातील "नवनाथचरित्रमु" नावाचा एक तेलगू ग्रंथ उपलब्ध झाला आहे. तो मद्रास विश्वविद्यालयाकडून छापून प्रसिद्धहि झाला आहे. त्या तेलगू ग्रंथातील शैव नवनाथाच्या यादीत मत्स्येंद्र–गोरखाच्या बरोबर काही नांवानंतर पुढे अल्लमाचे नावहि येतें. आणि त्या ग्रंथात वर्णिलेले अल्लमाचे चरित्र कानडींत 'प्रभुलिंगलीले'त आलेल्या चरित्राहून काही निराळें नाहीं. यावरून लिंगायत मतोद्धारक अल्लम प्रभु हे पूर्वी नाथ संप्रदायातील एक योगी होते हें निश्चित होते.

वीरशैवाच्या साधनेचे परमध्येय "शून्य–संपादन" हे असल्याचे समजतें. शून्यसंपादन हा मनोलय योगाचाच एक पर्याय आहे. शून्याची परिभाषा बौद्ध धर्मात व नाथ संप्रदायात आहे. "निजलिंग न्याहाळिता" तत्स्वरूप होऊन परमसिद्धि मिळते असा श्री गोरखाचा उपदेश आहे. तोच उपदेश आणखी विविध रीतींनी व अर्थगर्भित सूत्रानी (कानडीत ज्याना 'वचन' (Aphorisms) म्हणतात) श्री अल्लमप्रभूंनी लिंगायताना केलेला आहे. लिंगायत वीरशैवानीं "षट्स्थल" पद्धतीची नवीन भर साधन–मार्गात घातली.

"निःशब्दं ब्रह्म उच्यते" असें श्री प्रभूंचें वचन आहे. त्यांनीं दगडाच्या व धातूच्या मूर्तिपूजेवर आणि निरर्थक तीर्थयात्रावर कठोर टीका केलेली आहे.

जीव, आत्मा व परमात्मा (किंवा महान् आत्मा) यातील शेवटच्या पदावर आरूढ झालेल्याना माहेश्वरसिद्धि मिळाली असे मानण्यांत येतें. महान् आत्म्याच्या अनुसंधानात विहरण करणाऱ्याना महात्मा असे म्हणण्याची रूढि असल्याचें प्रभुलिंगलीलेंतील वर्णनावरून कळतें. या अशा महात्म्यानाच वीरशैव पंथात आदर्श म्हणून गणलें जातें. ईश्वरार्पण बुद्धीने सर्वसमर्पण योग आचरणाऱ्याना "शिवशरण" असें नाव आहे. शिवशरणानी लिंग धारण करावयाचे असतें. शिवशरण हे मुक्तजीवी असल्याने पंचसूतकांचीं बंधनें त्याना लागू नाहींत. वर्णाश्रमधर्मातील जातीचे सूतक, जन्माचें सूतक (सुवेर), मरणाचे सूतक, विटाळशीचे (मासिक) सूतक असले शिवाशिवीचे प्रकार वीरशैव पाळीत नाहीत. वीरशैव धर्माला, या पंथाचे अभिमानी अभ्यासु श्री. सिद्धरामप्पा पावटे यानी "अतिवर्णषडाश्रम" असें दुसरे एक नाव सुचविलें आहे. आहे. रुद्रालाच सर्वश्रेष्ठ ठरविणाऱ्या श्वेताश्वेतरात "अत्याश्रमा"चे नाव येतें. अत्याश्रमी म्हणजे तीन आश्रमापलीकडचा–यति, संन्यासी. या पंथाला यतिपंथ असे म्हणणेहि योग्य होणार आहे. जंगम (यति) गुरूंचें स्थान या पंथात अद्वितीय आहे. "जंगमो जगदीश्वरः" अशा आत्यंतिक श्रद्धेने या गुरूंशी प्रत्येक वीरशैव लिंगायताने वागले पाहिजे असा दंडक आहे. गुरुपुत्र, गुरुपाद, मरी (पिल्लू किंवा पुत्र) अशा प्रकारची वीरशैवातील नावे त्याच्या गुरुभक्तीचीं सूचक आहेत. गुरुपादोदक-प्रसाद स्वीकारण्यात प्रत्येक भक्त धन्यता मानतो. संपूर्ण शिवव्रत घेतलेल्या भक्ताने जंगम गुरूंना आपलें धनकनकादि सर्वस्व अर्पून आपल्या जन्माचे सार्थक करून घ्यावयाचे असते. श्री बसवानी या प्रकारचें व्रत आचरल्याने ते गुरुपरीक्षेच्या दिव्यातून यशस्वी रीतीने बाहेर पडल्याचे बसवचरित्रात वर्णिलेले आहे.

शिवशरणानीं यावज्जीव "सर्वजीवस्नेहभावानें" जीवनयात्रा करणें हें या शिवानुभव मार्गाचें एक लक्षण आहे. श्री अल्लमप्रभूची इष्टदेवता "गुहेश्वर" किंवा "गुहेश्वरलिंग" असे त्याच्या प्रत्येक वचनातील शेवटच्या मुद्रिकेवरून कळते. गुहेश्वर हा शब्द श्री अल्लमांनी मोठा मार्मिक आणि अर्थपूर्ण असा योजिलेला आहे. नाशवंत स्थावर (शिव) लिंगाची पूजा करूं नये अशी शिवशरणाना आज्ञा आहे. चैतन्यमय जंगमलिंगाची–ज्योतिर्लिंगाचीच

उपासना त्यानीं करावयाची असते. प्रत्येक व्यक्तीच्या हृदयगुहेंत अंतर्हित असलेली ही चैतन्यमूर्ति, हिच्या मननिदिध्यासात आसक्त असणें, मग्न होण्याची साधना अविरतपणें चालू ठेवणें हें प्रत्येक शिवशरणाचें कर्तव्य आहे. अशाप्रकारच्या आत्मानुसंधानात असणाऱ्या साधकाना समाजात फार मोठा मान आहे. गुरु केल्यावाचून आत्मसिद्धि नाही अशी या पंथाची श्रद्धा आहे. गुरुवर्गाला किंवा आत्मज्ञान्यांना "शिवा" असे संबोधण्याची चाल आहे. ऋग्वेदातील "शिवाः" नावाचे जन आर्येतर असल्याचे तज्ज्ञाना आढळून आलें आहे. गुरुवर्गाला किवा आत्मज्ञान्याना "शिवा" म्हणण्याची वीरशैवातील ही चाल फार जुनी असावी यात शंका नाही. ऋग्वेदातील "शिवाः" हा शिवभक्त जंगम (परिव्राजक) वर्गच नसेल ना? ही विचार करण्याजोगी गोष्ट आहे.

वीरशैवाचे "त्रेसष्ट पुरातन" गुरु आहेत अशी एक परंपरा तमिळ देशातसुद्धा प्रसिद्ध आहे. पण वैदिक काळापासूनच्या त्या गुरूंची नावनिशीवार परंपरा विसरली गेली असली तरी या 'पुरातनाची' पूजा या पथात न चुकता चालते. "गणाराधना" हे याचे वैशिष्ट्य आहे. "गण" शब्द संस्कृतेतर (द्रविड) भाषेतील आहे असे डॉ. सुनीतिकुमार चतर्जींचे मत आहे. जंगम 'गणंगळूं' ची सामूहिक पूजा वीरशैवात आजहि आहे. हे शिव "गण" कोण असावेत हे ऋग्वेदातील एका ऋचेवरून चागले लक्षात येण्याजोगें आहे. शिवाचे वर्णन करतेवेळीं "त्रिषष्ठीः त्वा मरुतः" या मंत्रात शिवाच्या त्रेसष्ट मरुद्गणाचा उल्लेख येतो. परिव्राजक (=जंगम) पंथाचा उल्लेख छादोग्योपनिषदाइतका जुना आहे. याज्ञवल्क्य शेवटीं परिव्राजक झाल्याचें कळतें. अशी ही शैव "वीरां" ची परंपरा पुरातन असल्याचे धागेदोरे आपणास आजहि आढळतात.

शिवशरण बनून आत्मोद्धार करण्यास स्त्रियानाहि मुक्तद्वार आहे. याज्ञवल्क्यांनीं मैत्रेयीला दिलेलें आत्मज्ञान येथें नित्य आहे. श्री अल्लमाच्या अनुयायी वर्गात महदांबिका (महादेवि अक्का) म्हणून एक श्रेष्ठ शिष्या होऊन गेली. कल्याण शहरीं असलेल्या श्री अल्लमप्रभु व श्री बसवराज याचेकडे अनुभवसिद्धि मिळविण्याकरिता संसारांतून उठून अत्यंत आर्त मुमुक्षु

भावानें हिनें धाव घेतली; तिला त्या आर्त स्थितींत अंगावरील वस्त्राचीहि शुद्ध नव्हती. दिगंबर वेषांतच श्री प्रभूंकडे ती आली, अशीं वर्णनें आढळतात. श्री अल्लमानीं तिच्यावर उपरोधी टीका करून आल्या रीतीची जाणीव दिली; तिच्याशी चर्चा करून ती आपल्या परीक्षेत उतरल्यानंतर तिला गुरूपदेश दिला आणि भावसमाधि प्राप्त करून दिली. श्री अल्लमप्रभूंना केवळ कार्यसिद्धि किंवा अणिमादि अल्पसिद्धीच्या मागें लागलेल्या लोकाविषयीं अत्यंत तिटकारा असे. त्यानी आपल्या प्रवासात असल्या लोकाची चागलीच कानउघाडणी केली व अनेकाना सन्मार्गास लावले. महदाबा, नागाबा, मुक्ताईसारख्या योगिनी शिष्या व श्री बसव, चन्नबसवादीच्यासारखे अनुभावी शिष्य याच्या साह्याय्यानें अल्लमप्रभूंनी त्यावेळी मोठीच धर्मक्रान्ति घडवून आणिली. या कार्यात श्री बसवण्णा याचा भागहि फार मोठा आहे.

त्यावेळच्या समाजाला या क्रान्तीचा अर्थ कळला नाहीं. शिवचरणाच्या प्रेरणेने होऊं घातलेला जातिभेदाचा उच्छेद वर्णाश्रमीयाना बिलकूल खपला नाही. श्री अल्लम–बसवाच्या उपदेशाने ब्राह्मणाच्या मुलींचा अस्पृश्य मुलाशी राजरोस विवाह होण्यापर्यंत मजल गेली. त्यामुळे समाजात फार जोराची खळबळ उडून अराजकतेने डोके वर उचलले. राज्यक्रातिहि घडून आली. श्री बसवादि काहींनीं जलसमाधि घेतली व श्री अल्लमप्रभू, महदाबा, वगैरेंनीं श्रीशैल येथे “ कदळीबनी ” प्रवेश केला.

## महानुभाव संप्रदाय

वीरशैव चळवळीनंतर ( इ. स. ११६० ) सुमारें ६०–७० वर्षांनी महानुभाव पंथ उदयास आला. पहिल्या चळवळीचें उगमस्थान कल्याण तर दुसऱ्या चळवळीचें ऋद्धिपूर. कल्याण–चालुक्याच्या अस्तमानानंतर नुकतीच राजाची गादी बळकावून स्वतःची राजवट स्थापन करणाऱ्या महादंडनायक बिज्जळाच्या कारकीर्दीत पहिली चळवळ उदयास आली. त्या काळी राजधानी कल्याण हें दक्षिणापथातील अत्यंत महत्त्वाचे राजकीय आणि सास्कृतिक केंद्र बनलें होतें. त्याच्या तुलनेनें, ऋद्धिपुराचे महत्त्व काहींच नाही. श्री गोविंद प्रभूंच्या वास्तव्यानेंच महत्त्व पावलेलें ऋद्धिपुर हे वऱ्हाडातील एक सामान्य गांव आहे. श्री. चक्रधराच्या पंथास देवगिरी यादवांकडून शेवटी काहीशी मान्यता

मिळाली. महानुभाव पंथ, प्रा. कोल्ते म्हणतात त्याप्रमाणें, अस्सल महाराष्ट्राच्या गाभ्यात, वऱ्हाडात उगम पावला.

वीरशैवपंथ, तत्पूर्वकालीन सिद्ध, शाक्त, व काळामुख वगैरे पंथाना आपल्यामध्यें सामावून घेऊन विस्तार पावला. या पंथाच्या उपदेशानें, लोकात त्या वेळच्या शैवाचारातील, वाममार्गी शाक्त पंथातील अनाचार नाहींसे झाले; मद्य–मांसापासून लोकाना परावृत्त करून बहुजनसमाजाच्या राहाणीची पातळी उंच केली. कानडी भाषेंतच या धर्म–प्रचारकानी आपले ग्रंथ लिहून भाषेंत नवीन प्रकारचे साहित्य निर्माण केले. साहित्याचे काही नवे प्रकारहि पुढे आले. पण ब्राह्मण भिक्षुक आणि या नव्या चळवळीच्या अग्रभागीं असलेले जंगम (वीरशैव भिक्षुक) याच्या, समाजातील अनुयायी वर्ग आपल्याकडे खेचून आपलें वर्चस्व राखण्याच्या स्पर्धेमुळे या चळवळीच्या पार्श्वभूमीत काहींसें जातिद्वेषाचे बीज पेरलें गेले. नवमतस्थापनेच्या उत्साहाच्या आवेशात उत्पन्न होणाऱ्या कडवेपणाचें आरंभीचे बाळकडू वीरशैव धर्माच्या अनुयायी वर्गात अजूनहि आपला प्रभाव दाखवीत आहे.

महानुभाव पंथाच्या प्रसाराकरिता खटपट करताना श्री. चक्रधरानीं आपल्या आधी थोड्याच वर्षांपूर्वी झालेल्या वीरशैव चळवळीपासून काहीच धडे घेतले नसतील हें शक्य नाही. आधीच्या मतप्रचारकाकडून झालेल्या चुका आपल्याकडून न व्हाव्यात यासाठी बरीच दक्षता चक्रधरानी बाळगली असें म्हणावेसे वाटते. कारण जातिभेदनिर्मूलनात वीरशैवानी दाखविला तितका उत्साह, आवेश चक्रधरात दिसत नाही. चक्रधरानाहि वर्णाश्रमातील वैषम्य, जातिभेद मान्य नव्हते. तरीपण त्याची पाळेंमुळे उखडून टाकण्याकरिता त्यानीं चंग बाधलेला दिसत नाहीं. वर्णाश्रमात राहाणाऱ्यानाहि त्यानी आपल्या अनुयायी वर्गात अवकाश करून दिला. स्त्रियानी मासिक विटाळ पाळूं नये असें लिंगायताप्रमाणें श्री चक्रधरानाहि वाटत होतें; पण पाळूंच नये असा त्यानीं दंडक घातलेला दिसत नाहीं.

महानुभाव पंथातील काहीं पारिभाषिक शब्द आधी वीरशैवानी वापरलेले आहेत. महात्मा, अनुभाव, स्थळ, वचन, दासोऽहम् अशा प्रकारचीं काहीं उदाहरणें सागता येतील. श्री चक्रधरांनाहि श्री अल्लमाप्रमाणे मूर्तिपूजा

मान्य नव्हती. " दैवते पाटी भरूनि अवघी पाणियात घातली । मग तयासि बोधू झाला ॥" अशी चक्रधराची एक लीळा वर्णिली आहे ( उत्तरार्ध पान ६ ). याप्रमाणें दोघात कांही साम्य असलें तरी दोघाच्या तत्त्वज्ञानात पुष्कळच फरक आहे.

महानुभाव पंथावर बाद्ध व जैन मताचा प्रभाव बराच झालेला आहे. त्यातूनहि बौद्ध धर्मापेक्षा जैन धर्माची छाया नाथ संप्रदायावर विशेष आहे. ही गोष्ट, तज्ज्ञाच्या संमतीकरिता, मी नवभारताच्या पूर्वी उल्लेखिलेल्या अंकात प्रथम थोडक्यात पुढें माडली ( सप्टेंबर अंक १९४९ ) डॉ. पेंडसे यानीं " महाराष्ट्र संस्कृती " वर लिहिलेल्या आपल्या ग्रंथात ( प्रथम आवृत्ति ) महानुभावावर बौद्ध धर्माची छाया आहे असे आपले मत व्यक्त केले आहे. पण प्रा. सरदार यानी सह्याद्रि मासिकात या विषयावर सुंदर विस्तृत लेख लिहून महानुभाव पंथ जैन धर्माचा किती ऋणी आहे हे निदर्शनास आणून दिलें आहे ( सह्याद्रि १९५० ).

श्री. चक्रधरानी उपदेशिलेली अहिंसा जागोजागी जैनाच्या विचाराची आठवण करून देते. पारध्याकडून सशास जीवदान देवविणें, विंचू, साप अशा प्राण्यानाहि न मारता दूर सोडून देणे, अशा लीला श्री चक्रधराच्या चरित्रात वर्णिलेल्या आहेत. कोणाचाहि आत्मा तळतळूं न देण्याबद्दल श्री चक्रधर किती दक्षता बाळगीत हे सुप्रसिद्ध आहे. पण याहूनहि महत्त्वाची गोष्ट म्हणजे " पचन–पाचनातहि " हिंसा न व्हावी असें श्री चक्रधराचे मत होतें. जोग्यांनी लीसपूस करूं नये, घाणीने लिडबिडलेले असावे अशी त्याची आज्ञा होती. याप्रकारच्या मलधारण विधीत दोन उद्देश आहेत. एक म्हणजे लीसपूस करण्यानें कामुकता वाढेल, भोगेच्छा वाढेल अशी भीति; आणि दुसरा, अंगावरील घाणीच्या साफसुफीमध्येहि, जशी पचन–पाचनात हिंसा होते तशी सूक्ष्म जंतूंची हिंसा घडेल अशी शंका. महानुभाव पंथ द्वैत मताचा आहे. जीव–परमात्मैक्य त्याना मान्य नाहीं. देवदेवतामध्ये तारतम्याच्या पुष्कळ पायऱ्या केल्या जातात. याचे माध्व ( वैष्णव ) मतांतील तारतम्याशी बरेच साम्य आहे. ज्या अर्थानें शांकर मताला प्रच्छन्न बौद्ध म्हणता येईल, त्याच अर्थानें माध्व मताला प्रच्छन्न जैन म्हणणें योग्य होईल. माध्व ( वैष्णव ) मताचे प्रवर्तक

श्री मध्वाचार्य हे श्री चक्रधरानंतरचे आहेत. दोघांत एका पिढीचें तरी अंतर आहे. श्री मध्वाचार्यांचा जन्म १२२० किंवा १२५० इसवीच्या सुमारास झाल्याचें कळतें. यावरून श्री चक्रधर निःसंशयपणे आधींचे ठरतात. यामुळें द्वैतमताचे आद्य प्रवर्तक श्री चक्रधरच ठरतात. माध्व संप्रदायी मंडळींत विशेष प्रचारात असलेलें "आचार्य" हें उपपद हयग्रीवाचार्य, नागणाचार्य वगैरे महानुभावानी आधीं रूढ केलेलें आहे. महानुभावाच्या तत्त्वज्ञानात व माध्व मतात बरेच साम्य आहे. माध्वाची विचार-प्रणाली जैन विचारसरणीला जवळची आहे, तर महानुभावाची आचारपद्धति जैनाप्रमाणें आहे. द्वैतमतप्रवर्तक हे दोघेहि महापुरुष, जैनमताचा विशेष प्रभाव असलेल्या प्रदेशांतच जन्मले. गुजरात ही चक्रधराची जन्मभूमि तर कर्णाटक (उडुपी) हें मध्वाचार्यांचे जन्मस्थळ.

श्री चक्रधराना "नग्नदेव", "जिनवीर", "गोमटदेव", वगैरे पर्याय नावें होतीं असें त्याच्या चरित्रकारानीं लिहिले आहे. गोमट हें नाव श्रवणबेळगोळ (म्हैसूर) च्या भव्य जैन तीर्थंकर मूर्तीचें आहे, हें नव्याने सागण्याची जरूरी नाहीं. महानुभावानीं जैनापासून अहिंसा तत्त्व स्वीकारलें व दया–धर्मावर जोर दिला. माध्वानीं यज्ञातील हिंसा सोडून दिली व पिष्ट पशूचा बळी देण्याची प्रथा रूढ केली.

जैन धर्माप्रमाणे महानुभाव संप्रदायावर नाथ पंथाचा परिणामहि विशेष झालेला आहे. दक्षिणापथातील नाथ संप्रदायाचें कालमानाप्रमाणें बदललेलें हे एक नवें रूपच होय, असे म्हणणें काही फारसें वावगे नाही. वीरशैव पंथाने नाथ संप्रदायातील शैव परंपरा थोड्याफार फरकानें पुढे चालविली, तशी महानुभावानी त्यातील वैष्णव परंपरा उचललेली दिसते. नाथ संप्रदायाच्या पायथ्याशीच महानुभाव संप्रदायाचा उगम झालेला आहे. लीळाचरित्राचे संपादक श्री नेने याच्या लक्षात ही गोष्ट आली नसावी, असें नाही; पण, त्याच्या त्याच ग्रंथाच्या प्रस्तावनेवरून, त्यानी तसे स्पष्टपणे कबूल करण्याचें टाळल्यासारखें वाटते. महानुभाव सप्रदायातील पुष्कळ चालीरीति नाथ संप्रदायातील चाली–रीतींशी जुळतात; दोघानाहि वर्णाश्रमधर्म मान्य नाहीं. शिवाशीव व विटाळाचा विधिनिषेध नाहीं. स्त्री–विषयक खंती दोघातहि तितकीच आहे. 'स्त्रीचीहि स्त्री न देखावी' अशी चक्रधराची आज्ञा आहे. तरी पण नाथ योग्यांना

योगिनी शिष्या असत! महानुभावांत श्री चक्रधराच्या परिवारातच बऱ्याच स्त्रियाचा घोळका होता हें लीळाचरित्रावरून दिसून येतें. या दोन्ही पंथांचा आदर्श परिव्राजक वृत्तीचा संन्यास धर्म हाच आहे. श्री चक्रधरानीं आपल्या संन्यासी शिष्याना "जोगी" म्हटलें आहे. उदा : 'जोग्यानीं लिसपूस करू नये.'

वैदिक संप्रदायी लोकानीं लिहिलेल्या नवनाथभक्तिसार वगैरे ग्रंथातून मत्स्येंद्रगोरखादींना श्रीगुरुदत्तकृपा झाल्याचीं वर्णनें आहेत. महानुभावाचें दैवतहि श्री दत्तच आहे. श्री चागदेव राऊळ द्वारावतीकर याना श्री दत्तानीच व्याघ्ररूपानें दर्शन देऊन सिद्धि दिली, असे सागितलें जाते. श्री चागदेव हे योगी होते. 'राऊळ', 'गोसावी' ही पदवी नाथ सप्रदायी योग्याच्या नावापुढ आढळते. महानुभावाचे आदिगुरु असे मानलेल्या श्री गुडम प्रभूंना श्रीदत्तप्रासादिक श्री चागदेव राऊळाकडूनच दीक्षा मिळालेली आहे. श्री चक्रधराच्या देहात श्री चागदेव राऊळानीच (परकाया) प्रवेश केला अशी एक कथा आहे. ही कथा भाकड कथा म्हणून समजली तरी श्री चक्रधराना श्री गुंडम प्रभूंकडून "शक्ति प्राप्त झाली" याबद्दल वाद नाहीं. या सर्व हकिगतीवरून महानुभावाची गुरुपरंपरा श्री अवधूत निरंजन दत्तापासूनच सुरू होते हें कुणालाच अमान्य करणे शक्य नाही.

श्री चक्रधराना नाथ संप्रदायाच्या उधळीनाथ योग्याकडून "शिल्प विद्या" प्राप्त झाली असें लीला चरित्रात वर्णन आहे. हा उधळीनाथ योगी 'नाथ' संप्रदायातील आहे. चक्रधरानी श्रीपर्वतावर बारा वर्षे तपश्चर्या केली असें त्याच्या चरित्रावरून कळते. श्रीपर्वत हे मल्लिनाथ( ज्योतिर्लिंग )चें सुप्रसिद्ध क्षेत्र आहे आणि हें नाथ-सिद्ध पंथातील योग्याचे फार मोठें केंद्र समजले जातें. तेलगु भाषेतील 'नवनाथचरित्रमु' हा ग्रंथ त्या परंपरेतील श्रीशैलामधील एका योग्याच्या आदेशावरूनच लिहिला गेला आहे. सिद्ध-योगी, गुहाप्रवेशा-( देह विसर्जना ) करितां श्रीशैलाकडे धाव घेत असत. श्रीगुरुचरित्रात नृसिंह सरस्वतींनीं श्रीशैल पर्वतावर जाऊन "कदळीबनीं" प्रवेश केला असे वर्णन आलें आहे. त्यापूर्वी १००-१५० वर्षे अल्लमप्रभूंनीहि श्रीशैलावरच "कदळी बनीं" प्रवेश केल्याचा उल्लेख मागे आला आहे. 'गुरुदत्त' मार्गातील सिद्धांचा

श्रीशैल पर्वताशी असा हा घनिष्ठ संबंध आहे. क्रिस्ताब्दापूर्वीपासूनच सुविख्यात असलेलें नागार्जुन कोंडा हें ठिकाण श्रीशैल पर्वताच्या परिसरांतच आहे. नागार्जुन हा बौद्ध धर्मातील एक नांवाजलेला महायोगी, सिद्धपुरुष होता. मंजुश्री मूलकल्प नांवाच्या बौद्ध ग्रंथात श्रीशैलाचा उल्लेख येतो. त्या काळी श्रीशैल बौद्धभिक्षूंचें मोठे केंद्र असणे शक्य आहे. आणि तीच परंपरा पुढील सिद्ध गोसाव्यानींहि चालविली असे दिसते. श्री चक्रधराच्या परिवारात नाथोबासारखे योगसाधक होते. स्वतः चक्रधराची राहाणी व करणी नाथ संप्रदायी योग्याहून फारशी निराळी नव्हती हे लीळाचरित्रावरून दिसून येण्याजोगे आहे.

श्री चक्रधराच्या गुरूंचे नाव गुंडम प्रभू किंवा गुंडम राऊळ असे होते. "नाथ" या शब्दाऐवजी अल्लमानी आपल्या नावापुढें प्रभु असे लावले. तो प्रभु शब्द गुंडमानी स्वीकारलेला दिसतो. गोस्वामी (गोसावी) म्हणजे इंद्रियावर प्रभुत्व मिळविलेला असा अर्थ या ठिकाणी होतो. 'नाथ' हा 'गोसावी' याचाच प्रतिशब्द आहे. नाथ म्हणजे स्वयंनाथ. स्वयं हा आधीचा शब्द रूढ बोलीत लुप्त होऊन नाथ एवढेच व्यवहारात राहिले. नाथ शब्दहि मागे पडून त्याच अर्थी प्रभु शब्द वापरात आला. नंतर देव किंवा ईश्वर शब्द प्रचारात आला. ज्ञानदेव किंवा ज्ञानेश्वर हें याचे उदाहरण आहे. गुरुमार्गांतील नवनव्या प्रकरणाचा आरंभ सुचविणारे हे शब्द ऐतिहासिक दृष्ट्या आपल्या संस्कृतीचे आकलन करण्यास महत्त्वाचे साहाय्यक आहेत.

गुंडम राऊळ या नावावरून आपणास काही गोष्टी कळण्याजोग्या आहेत. गुंडू, गुंडप्पा, गुंडेराव अशा तऱ्हेची नावें कर्णाटकातच आजहि विशेष रूढ आहेत. गुंड म्हणजे (वाटोळा) दगड. मुलाचा अपमृत्यु टळून कशीं तरी तीं जगोत या उद्देशाने, मुले न जगणाऱ्याच्या घरीं अशीं नावे ठेवण्याचा कर्णाटकात प्रघात आहे. गुंडम राउळाना गुंड हें नाव ठेवण्यास त्याच्या घरात असेच काहीं कारण असावे असे वाटते. गुंडमातील अम हा शब्द विचारणीय आहे. राव, पंत वगैरेप्रमाणें हा एक सन्मानार्थी शब्द आहे. अम्म, अण्ण, अप्प, अक्क वगैरे शब्द अंकित नावापुढे लावून संबोधण्याचा प्रघात एके काळी विशेष होता. नवव्या–दहाव्या शतकातील कानडी काव्यांत अम्म हा शब्द आर्य किंवा तात अशा अर्थानें वापरलेला आहे. शिलालेखातूनहि

अशीं नावे आढळतात. आधीं पुं-स्त्रीलिंगी असलेला अम्म शब्द अर्वाचीन काळी त्यातील अर्थ संकुचित होऊन केवळ स्त्रीलिंगी बनला आहे. अल्लम ( इ. स. ११६० ) यातील सन्मानार्थी अम शब्द गुंडम ( इ. स. १२५० ) या नावातहि आढळतो. अल्लमप्रभु आणि गुंडमप्रभु या दोन्हींतील साहश्य महत्त्वाचे आहे.

अवधूत् गुंडम राउळ, शबरी मनु अजगिरी
जिराबाई खेचरी, देमादेवी ॥ तत्त्वसार-८७७

वरील श्लोकात दिलेल्या अवधूत पंथातील योग्यांच्या आणि योगिनींच्या यादींत श्री गुडम प्रभूंचे नाव आलेले आहे. यावरून महानुभाव संप्रदायाचा उगम नाथपंथातून झाल्याबद्दल शंका रहात नाही. "तथापि गुंडम राउळ उर्फ गोविंदप्रभू हे नाथपंथीय म्हणून त्यावेळी व त्यानंतरहि कधी प्रसिद्ध नव्हते" असा प्रा कोलते यानी आपला अभिप्राय व्यक्त केला आहे. पण दुसरी कोणी "गुंडम राऊळ" अशी व्यक्ति महानुभाव पंथाबाहेर त्या काळी असलेली अद्यापि निदर्शनास आलेली नाही. श्री गुडमप्रभु तर नाथयोग्याप्रमाणे "बालवत्, पिशाचवत्" आचरण करीत असत. अशा प्रकारचे आचरण योग-साधनातील एका विशिष्ट अवस्थेचे आहे. अशा योग्याकडूनच चक्रधरानी दीक्षा मिळविली आहे आणि मत्स्येंद्र-गोरखादिकाची परंपरा ज्या गुरुदत्ता-पासून सुरू झाली असे नवनाथभक्तिसारात वर्णिले आहे, तो श्रीदत्तच गुंडमाचा परम गुरु होय. यामुळे नाथसंप्रदाय व महानुभाव सप्रदाय ह्या एकाच मुळीच्या दोन शाखा आहेत किंवा महानुभाव सप्रदाय हा नाथ पंथाचाच आणखी एक पर्याय होय असे म्हणणे भाग आहे.

श्री चक्रधर हे "गुरुदत्त मार्गा"तील एका नव्या प्रकरणाचे निर्माते होते असे म्हणणें अधिक योग्य होईल. याजपासून "गुरुदत्त-मार्ग" पुढें चालू राहिला तरी काहीं नवीन प्रथाहि त्यानीं आरंभिल्या. "पंचकृष्ण" हे आराध्य दैवत मानलें. या पंथाचें दत्त हें मूळ कुलदैवत असलें तरी, चक्रधरांनी श्रीकृष्ण हें आपलें इष्ट दैवत पुढीलांचें कुल-दैवत केलें. सूक्ष्मपणें पाहिल्यास श्रीकृष्णाचा संबंध नंतरचा आहे, हें कळण्याजोगें आहे. चागदेवाना श्रीदत्तापासून सिद्धि मिळाली; पण ते द्वारावतींत

राहिले व त्यांनीं "चक्रपाणि" असें नांव स्वीकारलें. चांगदेवाचे शिष्य अवधूत, निरंजन, अवलिया वृत्तीचे गुंडम राऊळ; याना "गोविंद" असें दुसरे एक नांव असलेलें प्रसिद्ध आहे. पण त्याचें मूळ नांव 'गुंडू'; त्याचें संस्कृतीकरण होऊन गोविंद झालें. त्याचे शिष्य "चक्रधर"; हे त्या पंथाचे खरे पुरस्कर्ते झाले. पण चक्रधरांची तपश्चर्या श्रीशैलास; सिद्धि मिळाल्या त्या श्रीदत्त प्रासादिकाकडून ! यामुळे श्रीकृष्णाचा संबंध या पंथाशी नावापुरता येतो, असेच म्हणणें भाग नाहीं काय ? सर्व महानुभावाचे आचार व विचार अवधूत निरंजन पद्धतीस अनुसरून होते व आहेत. योग–भोगाच्या समन्वयाचा धडा घालून देणारा आणि निष्काम कर्मयोगाचा उपदेश करणारा द्वारकाधीश श्रीकृष्ण हा त्याचा कित्ता होता असे म्हणण्यापेक्षा, सर्व–संग–परित्यागी केवळ विरक्तपंथी श्रीदत्त हाच याचा आदर्श होता असे म्हणणें समंजसपणाचे होणार नाहीं काय ?

## विठ्ठल संप्रदाय

विठ्ठल वारकरी संप्रदायाचे आद्य प्रवर्तक ज्ञानेश्वर. त्याना त्याचे वडील बंधु निवृत्तिनाथ याचेकडून दीक्षा मिळाली. त्याची गुरुपरंपरा मत्स्येंद्र-गोरखापर्यंत जाऊन भिडते. श्री ज्ञानेश्वर महाराजानी स्पष्ट शब्दात आपली गुरु–परंपरा उघडपणें सागून टाकल्यामुळे, वारकरी संप्रदायाचा उगम नाथ पंथापासूनच झाला हें वीरशैव व महानुभावाच्या उगमाप्रमाणे निराळे आधार देऊन स्पष्ट करण्याची जरूरी राहात नाही; वरील तीन्ही पथ नाथ सप्रदायाचे दक्षिणापथातील पडसादच होते. महानुभावानंतर सुमारे एक–दोन पिढ्याच्या अंतरानें श्री ज्ञानेश्वराच्या लोकोत्तर कार्यास आरंभ होतो. श्री ज्ञानेश्वरानी आरभिलेल्या वारकरी पथाची पूर्वपीठिका नाथ संप्रदायाच्या विचार–प्रणालीवरच आधारलेली आहे हे कोणासहि नाकबूल करणे शक्य नाहीं. नाथ संप्रदायात वर्णाश्रम धर्माला जागा नाही हे या पूर्वी स्पष्ट केलेंच आहे. आणि अशा या वर्णाश्रम न मानणाऱ्या नाथ संप्रदायापासून गुरुदीक्षा मिळालेल्या वारकरी पथास, वर्णाश्रमाभिमान्यानी वैदिक पंथाचाच पर्याय म्हणणे धाडसाचें होणार नाहीं काय ? पण हे धाडस श्री सोनोपंत दांडेकरासारख्या विद्वान संताकडूनहि व्हावें याचें आश्चर्य वाटतें !

महाराष्ट्र ज्ञानकोशातील आपल्या लेखात प्रा. दाडेकरांनीं वारकरी संप्रदाय वैदिक मार्गाला अनुसरून आहे, असें मोठ्या आवेशानें प्रतिपादन केलें आहे. श्री. दाडेकर प्रभृतीना आपला पंथ वैदिक परंपरेचा आहे, असें मोठ्या ईर्ष्येनें सिद्ध करण्याची आवश्यकता वाटावी, ह्यातच त्यांची बाजू लंगडी असल्याचें व्यक्त होत आहे.

नाथपंथ वर्णाश्रम पाळीत नाहीं म्हणूनच "अत्याश्रमी" पित्याचे पुत्र श्री ज्ञानेश्वरादिकाना त्या पंथात थारा मिळाला. सर्व मताना व जातीना आपल्या पोटात घेऊन अखंड भारतांत एक प्रचंड नवा पंथ निर्माण करण्याचा अचाट प्रयत्न या नाथ संप्रदायाकडून झाला. सर्व अठरापगड जाती एका मुशीत वितळवून एकजात हिंदूंचा अभेद्य समाज निर्माण व्हावा अशी जी कल्पना आज प्रसृत होत आहे, तिची मुहूर्तमेढ यापूर्वीच मत्स्येंद्र-गोरखा-दिकाच्याकडून, अभावितपणें का होईना दहाव्या-अकराव्या शतकाच्या सुमारास रोविली गेली असें म्हणणे गैर होणार नाही.

गोरखाच्या शिष्यपरंपरेत हिंदुस्थानच्या बाहेरील अहिंदूंचा भरणाहि पुष्कळ झालेला आहे. दत्तभक्त मुसलमान आजहि आपणास मिळतात. श्रीकृष्णाच्या प्रेमाने वेडे बनून त्याची गीतें रात्रंदिवस गाणारे मुसलमान काही थोडे नाहीत. रामनामाचा महिमा जगास जाहीर करणारा कबीर हा मुसलमानच होता. वारकरी संप्रदायातहि मुसलमान संत कोणीच झाले नाहीत असे नाही. देवीदासकृत सतमालिका स्तोत्रात बऱ्याच मुसलमान संताचीं नावें आलेली आहेत. मुतोजी महायोगी हा संत, बहामनी राजवंशीय मुसलमान होता. गहिनी-नाथाच्या समाधीस हिंदु आणि मुसलमान सारखेच भजतात.

काही कारणाने मुसलमान झालेल्या जातवेद भैरंभटाला पुनः हिंदु धर्माची दीक्षा देणारा वरद नागेश उर्फ वडवाळ सिद्ध हा वीरशैव असावा. वीरशैवात "फकीरप्पा" असे नाव बऱ्याच लोकात आढळतें. फकीर स्वामीचे मठ कर्णाटकात आहेत. मुसलमानाना दीक्षा देऊन लिगायत करून घेण्याचे काही प्रयत्न झालेले आहेत. मळेय मल्लेश नामक एका साधूने मक्का-यात्रा केल्याचे सागितले जातें. त्याच्या समाधीला लिंगायत आणि मुसलमान दोघेहि भजतात. एकनाथाचे गुरु श्री जनार्दन स्वामी याना एका अवलियाच्या रूपाने दत्ताचे

दर्शन झालें असें सांगितले जातें. शहाअलम प्रभूनें श्रीदत्त रूपाने जनार्दन स्वामींना दर्शन दिलें असे महाराष्ट्र सारस्वतांत (टीपेंत) लिहिलें आहे. वीरशैव किंवा नाथ संप्रदायी अल्लमप्रभूचा काळ इ. स. ११६०; जनार्दनस्वामींना अल्लम पुढें २०० वर्षानीं भेटले हें आश्चर्य वाटण्याजोगें आहे. पण गुरुमार्गांत अशी एक सर्वसाधारण श्रद्धा आहे की आपल्या मार्गाचे प्रवर्तक गुरु हे अमर असतात. ते केव्हाहि—शेकडो वर्षांनंतरहि त्या मार्गातील भक्ताना दर्शन देत असल्याची उदाहरणे जगातील सर्व गुरुमार्गांत नमूद आहेत. बौद्ध संप्रदायांतहि अशी श्रद्धा आहे. मेल्यानंतर येशूचे दर्शन झाल्याचे सागणारे ख्रिस्ती संत आहेत. मुसलमान सूफीतहि अशी श्रद्धा आहे. दत्तपंथातहि अशा प्रकारचा अनुभव आल्याचें सागणारे आजहि आहेत. देहावसानानंतर ज्या अर्थी दर्शन घडते, त्या अर्थी या पुरुषाना ' अमर ' म्हणणे जरूर होतें. मरण हें मर्त्याचें लक्षण, मर्त्य हे योनिज आहेत यामुळें हे ' अमर ' गुरु अयोनिज असे गृहीत धरावे लागते अशा विचारानेच महापुरुषाच्या चरित्रात जन्माचे चमत्कार सागण्याचा, त्याचे अजात, अयोनिज असें वर्णन करण्याचा संकेत पुराणातून टरलेला दिसतो.

अल्ल—अल्लम हे नाव मुसलमानाचें असावे, असें काहीना वाटते. पण श्रीअल्लमप्रभूंचें जन्मस्थान वगैरे निश्चितपणे माहीत असल्यामुळें लिंगायत मतप्रवर्तक अल्लम ही व्यक्ति मुसलमान नव्हे हे निश्चित आहे. पण फकीरप्पा-सारखे अल्ल हे नाव मुसलमानाकडून आले असल्यास माहीत नाहीं. एका ब्राह्मणाने अल्लमगुरूंचें मराठींत लिहिलेले हस्तलिखित चरित्र ( गुरुचरित्र ) मिळाले आहे.

हिंदु धर्माच्या कक्षेंत येण्यास मुसलमानाना त्यावेळीं गुरुदत्त मार्गामध्यें एक वाट होती. तेराव्या—चौदाव्या शतकापासून भारताची राजधानी समजल्या जाणाऱ्या दिल्लीचें तख्त मुसलमानाच्या हातीं शेकडों वर्षे राहिले नसतें तर हिंदु मुसलमानांच्या एकोप्यात बिघाड आलाच नसता. मागें हूण, सिथियन वगैरे लोकाच्या धाडी हिंदुस्थानवर आल्या. येथें त्यांनीं काहीं भागावर राज्यहि केले; तरी पण हे परकीय जन हिंदुस्थानांत आल्यानंतर एक दोन पिढ्याच्या आंतच परम भागवत किंवा परम शैव बनून हिंदु धर्माभिमानी झाल्याचे दाखले इतिहासांत आहेत. पण ग्रीक आदि परकीयांना पचवून

आत्मसात् करून घेतलेल्या हिंदु धर्मास मुसलमानाना जिरविणें अशक्य कां व्हावें ? अशक्य झालें नसतेंहि, जर भारताचे सम्राट् मुसलमान झाले नसते तर ! सम्राट् राज्यकर्त्यांचा पाठिंबा मिळाल्याने मुसलमानाच्या वागणुकीत स्वाभाविकपणें चढेलपणा दिसून येऊं लागला. हिंदु-मुसलमानातील आध्यात्मिक संबंध गौण होऊन त्याला राजकारणाचें स्वरूप अनिवार्यपणें प्राप्त झालें. शिवाय वैभव शिखरापासून घसरत चाललेल्या हिंदु समाजाचें पाऊलच कोठें टरेनासें झाल्यावेळी मुसलमानासारख्या कडव्या समाजाला आपल्यात घेऊन समरस करून घेणें शक्य नव्हतें. मुसलमानाचा लोंढा हिंदुस्थानावर एकसारखा धडकतच होता. आपला एकजिनसी समाज एकजिनसी न राहाता जातिभेदाच्या श्रेष्ठ-कनिष्ठ या विषारी भावनाच्या भोवऱ्यात जास्त जास्तच दुबळा होत गेल्या-नेहि मुसलमानाना आत घेऊन पचविणे अशक्य झाले. त्या प्रयोगात संपूर्णपणें मुसलमानाच्या आहारी जाण्याची भीति उत्पन्न झाली. अशा परिस्थितींत मुसलमानापासून आपलें स्वत्व रक्षण करण्याकरिता मुसलमानाना दूर ठेवणें हिंदूंना जरूर झालें; पण राजकीय-सामाजिक रंगभूमीवर अशाप्रकारें हिंदु-मुसलमानाच्या कितीहि तेढी चालल्या असल्या तरी हिंदुमुसलमानातील खऱ्या आध्यात्मिक ओलाव्याच्या मंडळीतील सामरस्यास किंवा एकोप्यास त्याने बाध आला नाहीं.

महानुभाव मुसलमानधार्जिणे झाल्यानें महाराष्ट्रातून त्यांना बाहेर पाय काढावा लागला, असें काहींचें म्हणणें आहे. वरील विवेचन वाचलें असतां, या प्रकारच्या आक्षेपास ऐतिहासिक आधार नाहीं असें दिसून येईल. गुरुदत्तमार्गींतील सर्व शाखोपशाखामध्यें मुसलमानाना अवकाश असल्याचे पुरावे आहेत. तसेंच महानुभाव पंथालाहि आध्यात्मिक वृत्तीचा मुसलमान परका वाटला नसल्यास नवल नाही. श्री चक्रधरानीं उत्तर हिंदुस्थानांत शिष्य मिळविले. "आतां हे ( चक्रधर ) म्लेंच्छामध्यें असैल; उत्तरपंथे गमन :" असें चक्रधरांचें वचन आहे. "गोसावियातें म्लेंच्छामध्यें राज्य करितां ( शिष्य मिळवून आपल्या मताचा प्रसार करीत असता ) देखिले" अशी एक लीळा उत्तरार्धाच्या शेवटीं दिलेली आहे; उज्जयिनीहून आलेल्या एकाकडून मिळालेली वरील वार्ता तेथें नमूद आहे. काबूलकडेसुद्धां महानुभाव पंथीय

चांगला आसरा मिळवून राहातात. याचें रहस्य काय तें निराळे सागण्याचं आता जरूरी दिसत नाहीं. राजकीय रणरंगातील रागद्वेषानें कलुषित झालेल्य दृष्टीनें पाहाणाऱ्याना याचा खरा अर्थ समजणे शक्य नाहीं. गुरुमार्गातील हिंदु-मुसलमान संगम त्याना विचित्र वाटणें स्वाभाविक आहे. हा सर्व मुसलमान धार्जिणेपणा किंवा ही सर्व मुसलमानाळलेली मनोवृत्ति असा सर्रास आरोप करण्यास ते प्रवृत्त होतात. अशा तऱ्हेच्या मनोवृत्तीमुळें आपल्या संस्कृतीतील या कोड्याचा उमज पडत नाहीं.

या प्रकारचाच श्रीज्ञानेश्वराचा गुरुदत्तमार्गानुसारी वारकरी पंथ ह वर्णाश्रमधर्मप्रतिपादक वैदिक पंथाहून निराळा नव्हे असे सिद्ध करण्याच प्रयत्न ऐतिहासिक दृष्ट्या सयुक्तिक म्हणतां येईल काय ?

पुढच्यास ठेच व मागचा शहाणा या न्यायानें श्री ज्ञानेश्वरानी आपल्य पूर्वी होऊन गेलेल्या धार्मिक चळवळीपासून चागलाच धडा घेतला असल पाहिजे. सब्रुगोलंकार करण्यास निघालेले कानफाटे असा ठपका नाथपंथाल मिळाला. वीरशैवानाहि समाजाकडून चागलाच विरोध झाला. महाराष्ट्रात त्याचे मोठें स्वागत झालें नसावें. महाराष्ट्रात वीरशैवमत प्रसार पावले नाहीं अस याचा अर्थ नाहीं. वऱ्हाडात आजहि लिंगायत घराणी आहेत. उज्जयिनीस वीरशैवाचा मठ होता. सौराष्ट्र सोमनाथाचे भक्त काहीं वीरशैव "शरण" होऊन गेले. मुसलमानाच्या लुटालुटीस आरंभ झाल्यावर सोरटी सोमनाथ वीरशैव शरणाबरोबर दक्षिणेस कर्णाटकात पुलिगेरे ( लक्ष्मेश्वर ) येथें स्थिर झाला सोमनाथाचीं प्रतीकें कर्णाटकात अत्यंत लोकप्रिय असून होयसळ यादवानीं त्य नावाचें एक नवे गांवसुद्धा वसविलें. उज्जयिनीचा काळेश्वरहि दक्षिणेस येतो बल्लारी जिल्ह्यात काळउज्जयिनी नामक क्षेत्र असून तेथें एक वीरशैव शाखेच मठ आजहि सुप्रसिद्ध आहे. हीं दोन्ही क्षेत्रें घसरत दक्षिणेस जशीं आलीं, तसें वीरशैव पंथालाहि महाराष्ट्रातून पुढे आपलें ठाणें उठवावें लागले. वारकरी पंथाच्या कार्याची महती वर्णितेवेळीं श्री. वि. ल. भावे यानीं काढलेले उद्गा पाहाण्याजोगे आहेत. वारकरी व रामदासी संप्रदाय पुढें आले नसते त वीरशैवांच्या कचाट्यांतून महाराष्ट्राची सुटका झाली नसती, असें श्री. भावे यानी आपलें मत नमूद केलें आहे. महानुभावांना वीरशैवांच्याप्रमाणेंच अत्यंत उ

सामाजिक विरोध सोसावा लागला, याचें कारण वरील सर्व पंथानीं कांहीं आडपडदा न ठेवतां वर्णाश्रमाचा पाया उखडून टाकण्याचा प्रयत्न केला याशिवाय दुसरें काहीं नव्हे.

स्वतः ज्ञानेश्वर आणि त्यांची भावंडें यांना अत्याश्रमी संन्यासी बापाचीं मुलें म्हणून सामाजिक बहिष्काराच्या दिव्यातून प्रायश्चित्त घ्यावें लागलेंच. अशाच प्रकारच्या सामाजिक प्रकोपामुळें त्याच्या आईबापांना प्रयागात जिवंत समाधि घेऊन आपली सुटका करून घ्यावी लागली. श्री ज्ञानेश्वर हें सर्व जाणत होते. आधीच सतावलेल्या समाजाला आणखी डिवचून आपलें कार्य बिघडवून घेण्याचा अविचारी मार्ग अनुसरणें त्या विचारी व दूरदर्शी महात्म्याला शक्य नव्हतें. समाज त्यांच्याशी मूर्खांप्रमाणें खुनशी रीतीनें वागला तरी त्यानीं त्याच्याशीं फटकून न वागता आपल्या चातुर्यानें व प्रेमळ उदार बुद्धीने त्याला गोंजारून आपल्या जवळ केलें. आजच्या मनोविश्लेषण शास्त्रज्ञाना बुचकळ्यात पाडणारे असें तें अतुल अनुपम उदाहरण आहे. ज्ञानेश्वरासारख्याच्या परिस्थितीत व्यंग्य विडंबन, वक्रोक्ति याकडे मन अनिवार्यपणें धाव घेत असतें. सरळ उघड बोलणे, अशक्य झालें असता विरोधकाच्याकडून झालेल्या जाचाने प्रक्षुब्ध झालेले मन या ना त्या रीतीनें, व्यक्त किंवा अव्यक्त उपरोधानें, श्लेषाने बोलून विरोधकाचा सूड घेऊं पाहातें. पण श्री ज्ञानेश्वरा-सारख्या असामान्य चारित्र्यवान् पुरुषाचे काही निराळेच असतें. महाराष्ट्र संत मंडळी श्री ज्ञानेश्वराना माउली म्हणतात तें यथार्थ आहे. श्री ज्ञानेश्वरानी आपल्या उदात्त चारित्रानें समाजालाच लाजविलें. चातुर्वर्ण्याला प्रत्यक्ष विरोध करणें हें समंजसपणाचे नव्हे; त्यापासून कार्यहानि मात्र होते, हे त्यांना मागील घडामोडीवरून प्रत्यक्ष दिसत होते. म्हणून त्यांनीं या बाबतींत मौन स्वीकारलेलें दिसतें. रूढ विचारास विशेष धक्का न देता गुरुदत्त मार्गाचा प्रसार करण्याचें आपलें कार्य त्यानीं मोठ्या चातुर्यानें चालू ठेवलें.

श्री ज्ञानेश्वराचा स्वभाव सर्वसंग्रही व सारग्राही असा होता. दुराग्रह, एककल्लीपणा, हटवाद याचा वासहि त्यांच्या विवरणांत कोठें आढळून येत नाहीं. आपला मार्ग वैदिक की अवैदिक या विवंचनेंत ते कधीच पडले नाहींत. जेथें जें चागलें असेल तें न सोडणे हा त्यांचा बाणा होता. त्यामुळें

वैदिक पद्धतींत जें आपल्या मार्गास पोषक आहे, ते राहूं देण्यास श्री ज्ञानेश्वर केव्हांहि सिद्ध होते. ज्यांनीं त्यांनी आपले आश्रमधर्म पाळावेत पण मुख्य गोष्ट आत्मानुभूति, परमेश्वर–प्राप्ति असल्यामुळें तिला जें जें विरोधी होईल त्याकडे कानाडोळा करणें हें संत मार्गाचे वैशिष्ट्य आहे. "क्षीर–सिंधु–परिसरी श्री त्रिपुरारी" होते असें ज्ञानेश्वर म्हणतात. यावरून शिव आणि विष्णु या नावां-विषयीं त्याचा यत्किंचितहि हट्ट नव्हता हें स्पष्ट आहे. ज्याने त्याने आपणांस रुचेल व पचेल आणि अनुभूतीस उपयोगी होईल असे नाम घ्यावें व आपला उद्धार करावा. एकंदरीत आत्मोद्धार हे त्याचें मुख्य लक्ष्य आहे. अशा या उदार भावाच्या बैठकीमुळेंच या वारकरी संप्रदायात एकोबासारखे दत्तभक्त बहिरापिशासारखे अन्य मतात शिरून पुनः परत आलेले व शैवदीक्षा मिळालेले, अशा निरनिराळ्या मताच्या लोकाचाहि त्यात समावेश झाला. श्री ज्ञानेश्वराच्या तत्त्वविचारात शून्याची परिभाषा येते.

चहूं शून्या आरुतें । महाशून्या परुते ।
सर्वांसी पाहते । तेचि गा ॥

तसेंच लिगजंगमाची भाषा त्याच्या विवरणांत दिसून येते.

गुरुलिंग जंगम । त्याने दाविला आगम ॥

महानुभाव व महंत–महात्मे असे प्रयोग सुद्धा मिळतात व "कोकिळे ज्ञान" या सारख्या महानुभावी परिभाषेचाहि संपर्क होतो. श्री ज्ञानेश्वराना द्वैत, अद्वैत याचाहि आग्रह नव्हता. ज्ञानेश्वरीत शाकर अद्वैतच आहे का अशी अनेकाना शंका येते. ह्याचें कारण हेंच आहे. भक्तीच्या संदर्भात द्वैतभाव, व सगुण साकार रूप हेंच परम साध्य, तर तन्मयावस्थेंत अद्वयानंदाचा अनुभव अशारीतीनें त्यानीं द्वैताद्वैताचा मेळ घातलेला आहे. विठ्ठलाने डोक्यावर शिवलिंग धारण केलें आहे अशी श्रद्धा ज्ञानेश्वरप्रणीत संत मार्गात चालत आली आहे. हरिहर अशी संयुक्त देवता विशेष प्रचारात येण्यास श्री ज्ञानेश्वराचा प्रभावच कारणीभूत झाला. जातिपंथांमधील भेदाच्या भिंती त्यामुळेंच जमीनदोस्त झाल्या. परमात्मसिद्धीकरिता तळमळणाऱ्या सर्व जातीच्या व सर्व पंथांच्या आर्त भक्तांना पंढरीची वाट ज्ञानोबांच्या प्रभावानें मोकळी झाली. अशा रीतीनें श्री

ज्ञानेश्वरानीं वर्णाश्रम धर्माभिमान्याविरुद्ध एक चकार शब्दहि न उच्चारतां आपणास जें मुख्य साधावयाचें तें साधलें. वर्णाश्रमाला ज्ञानेश्वरानीं प्रत्यक्ष विरोध केला नाहीं खरा, परंतु वर्णाश्रमाचा पाया त्याच्या शिकवणीने हादरला. यामुळेंच खडबडून जागे होऊन पुष्कळ ब्राह्मणानीं वारकरी पंथाच्या विरुद्ध आरंभिलेला विरोध तुकारामादिसंतचरित्रात आपल्या दृष्टोत्पत्तीस येतो. ब्राह्मण वर्गाला आपले स्वत्व राखण्याकरिता एखाद्या स्वतंत्र पक्षाची आवश्यकता तीव्रपणें भासूं लागली.

श्री ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकारामादि संत–मंडळींच्या सोज्वळ चारित्र्यामुळे वारकरी सप्रदाय महाराष्ट्रात झपाट्याने वाढला. इतकेंच नव्हे तर दुसऱ्या प्रातानाहि त्याच्या अति प्रेमळ भजनानी आपल्याकडे वेधून घेतलें. पंजाबातील गुरु नानक याच्या ग्रंथसाहेबात नामदेवाच्या वचनामृताना जागा मिळाली श्री ज्ञानेश्वरीनें कर्णाटकातील बऱ्याच मुमुक्षूंना मोहून टाकलें. या महाराष्ट्र छापाच्या विठ्ठल भक्तीचा प्रसार कर्णाटकाच्या गाभ्यापर्यंतहि झाला. संत मंडळीच्या या कृतीने आश्रमधर्मास प्रत्यक्ष न जुमानणाऱ्या वीरशैव महानुभाव पंथांना महाराष्ट्रातून आपले चंबुगवाळे हालवावे लागलें हें खरें असलें तरी चातुर्वर्ण्याचा पाया खिळखिळा झाला हें काही खोटें नाही.

वारकरी संप्रदायानें वर्णाश्रमाला प्रत्यक्ष कोठे विरोध केला नाही, एवढ्यावरून हा पंथ वैदिक मार्गावलबी आहे असें म्हणणें योग्य होणार नाहीं. क्षणभर, वारकरी संप्रदाय वैदिक पंथानुकूल आहे, असे मानलें तर, त्या काळच्या वैदिक वृंदाकडून वेळोवेळी वारकरी संत मंडळींचा नाना प्रकारचा विरोध, छळ होण्याची कारणे काय असतील? श्री ज्ञानेश्वरानीं जातिभद काढून टाकण्याचा प्रत्यक्ष चंग बाधला नाही, तरी गुरुदत्त मार्गातील महत्त्वाच्या दुसऱ्या काही गोष्टी विशेष फरक न करिता चालू ठेवल्या. त्या गोष्टी वैदिकाना–कट्टर वैदिकाना मान्य नव्हत्या. आजहि मान्य आहेत असे वाटत नाहीं.

(१) संस्कृत मत्राचे महत्त्व यत्किंचित्हि कमी झालेलें अस्सल वैदिकाला कधीहि खपणे शक्य नाही. वैदिक मंत्रातील कानामात्रात बदल न होता त्याचें पटण व्हावे; गायत्री मंत्र ब्राह्मणानें कधींहि सोडता कामा नये;

(संस्कृत) मंत्र-जपानेच ज्ञान प्राप्त होतें; संस्कृताव्यतिरिक्त इतर भाषेंत मंत्रशक्ति नाहीं, अशी वैदिक वृंदाची ठाम समजूत तर संतमंडळीची दृढ श्रद्धा ही की "नामापरतें श्रेष्ठ नाहीं." नाम-धारकाना आपण घेतलेलें नाम गायत्री मंत्राहूनहि जास्त पवित्र वाटते. नाम जपता "नामापरतें तत्त्व नाही रे अन्यथा वाया आणिका पंथा जासि झणी", "हरिपाठ कीर्ती मुखी जरी काय, परिच तो होय देह त्याचा." नाम-स्मरणानें तपाचें सामर्थ्य येतें; तीर्थाटन घडते. तुकोबांनीं एके ठिकाणी असें स्पष्ट म्हटले आहे की, "ब्राह्मणा न कळे आपलें तें वर्म, गवसे परब्रह्म नामें एका...तेंचि संध्या ध्यान कर्मक्रिया, ब्रह्म-कर्म ध्यान याचें पायी", "नामें स्नानसंध्या केलें क्रियाकर्म", "नाम धारकासी नाहीं वर्णावर्ण", "वर्णावर्ण नाहीं नामी", "आनंदे वैष्णव जाती लोटागणीं, एक एकाहुनी भद्रजाती", "समर्थासी नाही वर्णाश्रम" अशा प्रकारची दृढ भावना संत मंडळींत दिसते.

हे दोन्ही पंथ जुळवून तडजोडीचा मध्यम मार्ग काढणे ही गोष्ट निराळी. पण मुळांत हे दोन्ही पंथ अभिन्न-एकच असें म्हणणें मला धाष्टर्याचें वाटतें.

(२) संस्कृतातूनच मंत्र जपले पाहिजेत, वैदिक मंत्रच तारक मंत्र होऊं शकतील असा एक भेद. दुसरा एक महत्त्वाचा भेद या दोन्ही पंथांत आहे. गुरुविषयक दृष्टिकोन या दोघाचा निराळा आहे हें या पूर्वी दाखविलेच आहे. गुरूहून श्रेष्ठ अन्य दैवत नाहीं. गुरूला शरण जाऊन त्याची कृपा भाकण्याची या गुरुमार्गाची तऱ्हा काही विशेष आहे: श्री ज्ञानेश्वरानीं आपल्या पूर्वीच्या रूढींत ओंगळ वाटणाऱ्या काहीं गोष्टी सोडून दिल्या तरी काहीं भाग राहिला तो राहिलाच.

गुरूस सर्व समर्पण करून त्याची करुणा भाकावी, कृपा संपादन करावी असे सागितलें जातें. यातील "सर्व समर्पण" चा अर्थ कोठपर्यंत न्यावयाचा हा एक महत्त्वाचा मुद्दा आहे. तन-मन-धन सर्वच गुरूच्या चरणीं अर्पण करावयाचें असतें. श्री अरविंदाश्रमात (पाडिचेरि) येथें आश्रमस्थ (आश्रमातील एक) होण्यास त्यानीं आपलें असें कांहीं ठेवावयाचें नाहीं असा दंडक आहे. भक्ताला "योगक्षेमं वहाम्यहं" असें श्री भगवंतानीं गीतेंत आश्वासन दिलें आहे. गुरु-

मार्गात हा एक श्रद्धेचा महत्त्वाचा भाग आहे. गुरुमाउलीवर सर्व सोपवून त्यास शरण जाणे एवढेच शिष्याचें काम आहे.

श्री ज्ञानेश्वरानी आपल्या मार्गात नाम देणाऱ्या गुरूनें अशाप्रकारें "सर्वस्वाची" अपेक्षा करूं नये असें सागून मानवगुरूपेक्षां विठ्ठलापायींच आपले सर्वस्व अर्पण करण्याची प्रथा रूढ केली आणि गुरु नाम देण्यापुरता निमित्तमात्र ठेवला. पण गुरूशिवाय नाम सार्थ होत नाही, यात काहीं बदल झाला नाही.

गुरुप्रसाद मिळाल्याशिवाय शिष्य हा खरा शिष्यच होऊं शकत नाही. प्रसाद याचा अर्थ स्थूलपणें बराच शिष्ट, सभ्य प्रकारचा वाटतो. पण याच्या मागील खरा भाव काय ते पहाण्याजोगे आहे. शिष्यानें समर्पण केलेलें गुरूनें स्वीकारावे. गुरूनें आपण घेऊन (उपभोगून) शेष (प्रसाद) द्यावें. देवास आपण नैवेद्य दाखवितो. नतर तो प्रसाद होतो. स्पष्ट भाषेत बोलावयाचें म्हणजे गुरूचे उच्छिष्ट हाच गुरूचा प्रसाद.

सर्वस्व अर्पण करणें यात तन–मनाबरोबर धन तर येतेच. धन म्हणजे पैसा–अडका असा आजचा अर्थ आहे. पण बायको ही सुद्धा धनातच येत असे. पाडव द्यूतात हरले त्यावेळीं त्याच्या सपत्तीबरोबर द्रौपदीचाहि ताबा कौरवाना मिळाला. चक्रधराच्या लीळेत एका शिष्यानें गुरूस आपली भार्या विधिपूर्वक अर्पण केल्याचे वर्णन आहे. आणि गुरूनें तेव्हाच्या तेव्हाच ती शिष्यास परत दिल्याचा उल्लेख आहे. "सकळै गुरूसी अर्पावें. चित्त, वित्त, काया तीन्ही ईश्वरासी अर्पावी, ऐसे म्हणोनी (पाठक) गोसाविया जवळीं आपुली ब्राह्मणी जवळी बैसविली. जवळी कंठाळ ठेविली बैल् बाधला. गोसावियातें दंडवतें घातलीं. चरणा लागली" नंतर गोसावियांनी अर्पिलेले परत केले, (प्रसाद दिला.) बाराव्या शतकातील कानडी कवि हरिहर यानें लिहिलेल्या 'बसवदेव राज रगळे' नामक चरित्रग्रंथात बसवानें जंगमरूपी परमेश्वरास अशाच प्रकारे आपली भार्या देऊन तुष्ट केल्याचें वर्णन येते.

पण श्री ज्ञानेश्वरांनी आपल्या गुरु–पंथांत हा प्रकार अजिबात काढून टाकला. नाथ पंथाचे योगी आणि योगिनी हे विरागी, सर्वसंग–परित्यागी संन्यासी असत तरी प्रसंगविशेषी त्याच्यात काय प्रकार चालत असत यावर

श्री. चक्रधरांनीं सांगितलेल्या कानीफ योगी आणि बहुडि योगिनी याच्या कथेवरून चागलाच प्रकाश पडतो. काही एका क्षुल्लक गोष्टीवरून कानीफ आणि बहुडी याच्यात आपल्यांतील योगशक्तीच्या प्रभावाबद्दल अहमहमिका, ईर्षा सुरू झाली आणि ब्रह्मचर्याच्या परीक्षेंत आधी कोण हरतो हें पाहाण्याची पैज लागली. या पैजेने रतिक्रीडेस आरंभ झाला. आणि त्यात बहुडी हरली, वगैरे कथा चक्रधरानी सागितली आहे. नाथपंथातील हा किळसवाणा प्रकार पुढील धर्मपंथात कमी कमी होत गेला. श्री ज्ञानेश्वरानी तर अशा प्रकारास पूर्ण आळा घातला इतकेंच नव्हे तर विठ्ठलपथीय प्रेमळ भक्तिमार्गात "मधुर" प्रकारहि संपूर्णपणे वर्ज्य मानला. चैतन्यपंथीय मधुरा कृष्णभक्ति महाराष्ट्राला रुचली नाहीं. कृष्णभक्ति केली खरी, पण त्याचेंहि नाव बदलून घेतलें. कृष्ण शब्दाबरोबर गोपीलीलाहि अनुषंगाने आठवतील म्हणूनच की काय, महाराष्ट्रानें विठ्ठलभक्तीच्या नव्या अध्यायास आरंभ केला. संताच्या भजनावलीत "गोपी–कुच–मर्दन कृष्णा" चें ध्यान चुकूनसुद्धा आढळणार नाही. इतका सर्व सोवळेपणा राखला तरी एक बाब राहिली ती राहिलीच.

श्री ज्ञानेश्वरांच्या विठ्ठलभक्तीपूर्वी श्री मध्वाचार्यांनीं विष्णुभक्तीचा प्रसार केला. माध्वाना वैष्णव असेंहि म्हणण्याचा इकडे प्रघात आहे. पण थोडे सूक्ष्मपणें पहाता श्री मध्वाचार्यांनी विष्णुभक्ति जरी सागितली, तरी प्रत्यक्ष रामपूजा रूढ केली. माध्वात हनुमानाची पूजा मुख्य असून देवाना करावयाचा नैवेद्य वगैरे "श्री मद्धनुमदंतर्गत..." अशा तऱ्हेच्या संकल्पानें केले जातात. श्री वैष्णवात गरुडाला स्थान आहे तें माध्वांत नाही. हनुमाना (भीमा) इतकी अर्जुनालासुद्धा मान्यता नाहीं. माध्व उत्तरादि मठाधीशाच्या नित्यार्चनेंतील श्रीरामाच्या मूर्ति श्री नरहरितीर्थांनी कलिंग देशाहून आणल्या, असा त्याचा इतिहास आहे. श्री नरहरितीर्थांचे वडील व ते स्वतः दोघेहि कलिंग देशाच्या राजाजवळ मुख्य प्रधान होते. श्री नरहरितीर्थांनीं तेथून राममूर्ती आणल्या.

अशा रीतीनें तेराव्या शतकात उत्तरेकडून कर्णाटात आलेल्या या राम-भक्तीच्या मागे थोडा इतिहास आहे. बाराव्या शतकात श्री निंबार्कानें राधाकृष्ण भक्तीला चालना दिली. या राधाकृष्ण भक्तीचें शृंगारविलासात कसें पर्यवसान झालें याचें प्रत्यंतर इ. स. ११७२ च्या सुमारास जयदेव कवीनें लिहिलेल्या

गीतगोविंद काव्यात उत्तम तऱ्हेने पहावयास मिळतें. पुढें चैतन्य पंथीयात तरी "गोपी परकीया" साधनेकरिता जरूर आहे असे मानणारे निघाले! आपल्या पत्नीशिवाय अन्य स्त्रीशीं प्रेम करणे आवश्यक अंग मानलें जाऊं लागलें. शाक्त व नाथपंथातील या सारख्या थोड्या साधनेच्या इतिहासाची ही पुनरुक्ति दिसते.

राधाकृष्ण भक्तीचें हें विकृत रूप पाहून उत्तरेत श्री रामानंदानें तेराव्या शतकांत रामोपासना प्रचारांत आणली. ती सोवळी रामोपासना माध्वानीं दक्षिणेंत आणली. रामदासानी सतराव्या शतकात तिचा महाराष्ट्रात प्रचार केला.

माध्व मठाधीश हे श्रीरामरूपात विष्णु पूजीत असले तरी माध्वपंथी संतानी ( दासानी ) विष्णुला विठ्ठलरूपात आळवलेलें आहे. पंढरीचा विठ्ठल हे या दास–संताचें आराध्यदैवत होतें.

भाषेंतील शब्द वाक्संप्रदाय, म्हणी वगैरेतून आपल्या मागील संस्कृतीचें प्रतिबिंब उमटलेलें पाहावयास मिळते. जिथे शिलालेख वगैरे लिखित आधार मिळत नाहीत अशा ठिकाणीहि भाषेतील हे अवशेष संस्कृतीचा इतिहास जाणण्यास पुष्कळच साहाय्य देतात. प्रस्तुत प्रकरणी "थुंकी झेलणे" हा वाक् संप्रदाय बरीच माहिती पुरवीत आहे. थुंकी झेलणे याचा आज शब्दशः अर्थ करणें आचरटपणाचें होईल. पण आज जरी हा वाक्प्रचार लक्षणार्थानें रूढ असला तरी एकेकाळी अक्षरशः अशी रूढि होती म्हणूनच हा वाक्संप्रदाय रूढ झाला असला पाहिजे. आणि याला सुदैवाने जुने लिखित आधारहि मिळतात. कानडींत "बाय तंबुलके कैयानु" असा एक प्राचीन वाक्संप्रदाय आहे. तोंडातील ताबूलास हात पसरणे असा याचा अर्थ आहे. कुमारव्यासानें बऱ्याच ठिकाणी हा वाक्संप्रदाय कृष्णकुंजी वगैरे पात्रांच्या तोंडी घातलेला आहे. थुंकी किंवा पिकेंस हात पसरणे म्हणजे हाजी हाजी करणें, दास्यभाव दाखविणे असा त्याचा लक्षणार्थ आहे. पण आपले कोण परकीय कोण याचा निर्णय एका पात्रात जेवण्यानेच होत होता असें मागील रूढीवरून दिसून येते. पाठलाग करून आलेल्या यवनाना श्री शिवाजी महाराज आपलेच आहेत हें दाखविण्याकरिता, एका ब्राह्मणाने त्याना आपल्या पानात जेवावयास घेतले अशी एक कथा आहे. आपल्या कुळाविषयी शंकित असलेल्या कर्णाला तो आपला

आप्त बाधव आहे, सूतपुत्र नव्हे, याची खात्री पटवून देण्याकरिता कृष्णानें त्यास आपली पिक दिली, असें कुमारव्यासानें एके ठिकाणीं वर्णिलें आहे. पंप भारतात (इ. स. ९३२) अशाच प्रकारचे एक वर्णन आलें आहे. कर्णाव-सानानंतर युधिष्ठिराला तो आपला थोरला भाऊ होता हें कळून तो विलाप करूं लागला. त्यावेळी युधिष्ठिर आपल्या विलापात असे उद्गार काढतो कीं, ‘तूं माझा थोरला भाऊ हे मला आधींच कळलें असते-तर किती बरें झालें असतें ! मी आज तुझ्या उच्छिष्टाला (जेवणाला) आणि तोडच्या ताबूलाला पारखा झालो.’ मोरोपंताच्या भारतात कर्णाला आपल्या पक्षात येण्यास विनवीत असता कृष्ण असें म्हणतो : “तूं जर पाडवाकडे येशील तर ‘राज्याभिषेक करतिल नर... किंबहुना घेइल तव ताम्रोळ क्षिप्र भूमिप दराने” (उद्योग १०-७८) येथें शेवटच्या वाक्यातील श्लेषातील अर्थाची संदिग्धता कुमारव्यास भारता-वरून (भूमिप म्हणजे धर्मराजा) दूर होऊं शकते.

कर्णाट–महाराष्ट्रातील कवींनी वर्णन केलेल्या या प्रकाराला ऐतिहासिक आधारहि मिळतात. श्री. बसवण्णाचें (इ. स. ११६०) असे एक वचन आहे : “देवा ! तुझ्या शरणाचे ताबूल मी चाखेन, त्याचें शेष वस्त्र मी लेईन.” श्री चक्रधराच्या लीळेंत अशी वर्णनें बऱ्याच ठिकाणी आली आहेत. “श्री मुखाचीया ताबूळा अंजुळि ओडविली, गोसावी ताबूळ दिधले, ते तोडी घातले, आणि दंडवत करूनी निगाली.” शिष्य अशाप्रकारें गुरुप्रसाद घेऊन धन्यता मानीत असत.

## पण जातिवादानें बंड उभारलें !

वारकरी संप्रदायातहि (नाथसंप्रदायातील बाकीच्या बाबी सोडल्या तरी) गुरुप्रसाद स्वीकारण्याचा हा प्रकार मात्र जसाच्या तसा चालू राहिला, असें दिसतें. वारकरी संप्रदाय पसंत नसलेल्या श्री रामदासांनाहि गुरुमहिमा मान्य आहे.

सद्गुरू कृपाविरहित,
सर्वथा न घडे स्वहित
यमपुरीचा अनर्थ चुकेना

(दा. बो. १, ३, ४५.)

म्हणोनी सद्गुरू पूर्णपणें
देवाहुनि अधिक कोटि गुणें
जयासी वर्णिता भाडणें वेदशास्त्रा लागलीं.

(दा. बो. ५, ३, ४५.)

शरण सद्गुरूशीं गेले पाहिजे ॥

पण श्री समर्थ रामदासानी या विषयींचा काही मतभेद अगदीं स्पष्ट शब्दात नमूद करून ठेवला आहे. श्री रामदासाचा गुरुपादोदक घेण्यासहि विरोध नाहीं. इतकेंच काय ह्या गोष्टी शिष्यानीं केल्याच पाहिजेत असें रामदासाचे मत आहे, तर मग विरोध आहे कुठें ?

चातुर्वर्ण्यात ब्राह्मण अग्रज व तें अग्रजत्व ब्राह्मणानें कधीहि घालवितां कामा नये, असें श्री रामादासाचे मत आहे. एवढेच नव्हे तर "जरी ब्राह्मण झाला भ्रष्ट। तरी तो तीन्ही लोकी श्रेष्ठ।" असें रामदासाना वाटते. "जरी ब्राह्मण मूढमती। तरी तो जगद्वंद्य॥" असे रामदास सागतात. ब्राह्मणानें खालच्या कोणत्याहि जातीचा गुरु करिता कामा नये असा वैदिकाचा बाणा. त्यांच्या पूर्वपरंपरारक्षणास हा त्यांचा अभिमान उपयुक्त झाला. ब्राह्मणच गुरु असावा हा हट्ट याकरिता होता, पण नाथ संप्रदायात तर जातगोत काही नसून सिद्ध पुरुष कोणत्याहि जातीचा असला तरी तो गुरु होऊं शकतो. वर्णाश्रम राखण्यास ज्या श्री शंकराचार्यांनी साहाय्य केलें असें समजले जातें, त्यानींहि 'चाडालोऽपि स गुरुः' असे जाहीर केले आहे! श्री ज्ञानेश्वरानी नाथपंथातील ही परंपरा पुढें चालू ठेविली. संत मार्गात कोणत्याहि जातीचा गुरु करण्यास आडकाठी नाहीं. तुकारामाच्या सोळा शिष्यात नऊ ब्राह्मण होते. अशा तऱ्हेचीं पुष्कळ उदाहरणें देता येतील. यामुळें वैदिक मार्गातील अस्सल सोवळेपणाचा नक्षा उतरला!

नीच यातीचा गुरू। तोहि कान कोडा विचारू। ब्रह्म सभेसी जैसा चोरू। तैसा दडे॥ ब्रह्मसभा देखता। त्याचे तीर्थ नये घेता। अथवा प्रसाद सेविता। प्रायश्चित्त घडे॥ तीर्थ प्रसादाची सांडी केली। तेथे नीचता दिसोन आली। गुरूभक्ति ते सटवली। एकाएकी॥ गुरूची मर्यादा राखता।

ब्राह्मण क्षोभती तत्वता । तेथें ब्राह्मण्य रक्षूं जाता । गुरू क्षोभ घडे ॥ ऐसी सांकडी दोहिकडे । तेथें प्रस्ताव घडे । नीच यातीस गुरुत्व न घडे । या कारणे ॥ तथापी आवडी घेतली जीवें । तरी आपणची भ्रष्टावें । बहुत जनास भ्रष्टवावें । हें तो दूषणच कीं ॥ स्वयातीचा पाहिजे गुरू । नाही तरी भ्रष्टाकारू । ......नेमस्त (खचितचि) घडे ॥ (जुना दासबोध. समास ५,५८–६४; दासबोध ५–५८–६४.)

अब्राह्मण गुरू केला असता ब्राह्मण्य नष्ट होतें, असा श्री रामदासानीं निःसंदिग्ध शब्दात आपला निर्णय दिला आहे. ब्राह्मण्य नष्ट होणें म्हणजे वैदिक परंपरा बिघडणें, हाच याचा अर्थ खरा असेल तर श्री सोनोपंत दाडेकर प्रभृति प्रतिपादतात त्याप्रमाणे वारकरी संप्रदाय हा वैदिक मार्गाला अविरोधी असें म्हणता येत नाहीं. वैदिक संस्कार कोणत्याहि कारणाने सोडता येत नाहींत. संस्कार लोप झाले असता ब्राह्मण्य नष्ट होऊन तो "व्रात्य" गणला जातो. ब्राह्मणानें अग्रजत्व कधीहि घालविता कामा नये, अशा तऱ्हेचा स्वाभिमान नाथ 'गुरुदत्त' मार्गात राहू शकत नाहीं.

हो का वर्णांमाजीं अग्रणी
जो विमुख हरिचरणीं
त्याहुनि श्वपच श्रेष्ठ मानी
जो भगवद्भजनीं प्रेमळू ॥

असे एकनाथ सागतात (भागवत अ. ५, ओ. ६०). काहीहि होवो, ब्राह्मण हा शूद्रापेक्षा, अंत्यजापेक्षाहि कमी लेखलेला सनातनी वैदिकाना कधींहि मान्य होणें शक्य नाहीं. अग्रज तो अग्रजच असाच त्याचा आग्रह. ब्राह्मणानीं इतर वर्णीयाना नमस्कार कसा करावा येथपर्यंत जेथें पंक्तिप्रपंच केलेला आहे, त्या वैदिक पंथाला, विप्राशिवाय दुसऱ्या जातीची पादधूलि मस्तकीं धारण करणें मान्य होईल का ? चरणतीर्थ आवडेल का ? गुरूच्या पानातील प्रसाद गळीं उतरेल का ? सबब कोणत्याहि जातीचा गुरु करण्यास मुभा असलेला वारकरी संतमार्ग वैदिक पंथाचाच एक पर्याय असे कसे म्हणतां येईल ?

गुरुसंप्रदाय धर्म । तेंचि जया वर्णाश्रम ।
गुरुपरिचर्या नित्य कर्म । जयाचेया ॥

गुरूचे नाममात्र । तेचि आम्हां वेदशास्त्र ।
गुरूसी मानी माणुसपण । तो पापिष्ट जाण सर्वथा ॥

अग्निहोत्राचा सुकाळ । वड पिंपळाशीं काळ ।
तीन्ही देव पिंपळात । अग्निहोत्री केला घात ॥

म्हणती सोमयाग करा । मुख धरोनि मेंढा मारा ॥

अशाप्रकारें यज्ञयागाची टर उडविणारा वारकरी संप्रदाय वैदिक म्हणता येईल ?

साडूं जातीचा अभिमान ।
उंचनीच नाही नामाचियापुढे ।
यवनादी नीच असोत भलते ।
परि नाम सर्वदा मुखी वसो ॥

कोण भक्ती केली गोपाळी ।
काय ती सोवळी की ओवळी ॥
त्याचे उच्छिष्ट कवळ मी गिळी ।
प्रेम सम्मेळी डुल्लत ॥

श्री समर्थ रामदासानीं यामुळेंच वारकरी संप्रदायाविरुद्ध बंड उभारलें. गुरुमार्गांतील पादोदक, तीर्थ, प्रसाद तेवढा राखला तरी हव्या त्या जातीचा गुरु करणे त्याना आवडलें नाहीं. या चालीचा त्यानी निषेध केला. त्याच्या पंथात, यवन तर राहोच, अब्राह्मण सुद्धा फारसे आत घेतलेले नाहीत. पायरी राखून काम करणें हें व्यावहारिक तत्त्वज्ञान रामदासानीं कधीहि दुर्लक्षिलें नाहीं. श्री ज्ञानेश्वराच्या शिकवणींत वर्णाश्रम धर्माभिमानाविरुद्ध एक चकार शब्दहि कोठें मिळणार नाहीं. तरी पण वारकरी पथाच्या सर्वसमभावाच्या शिकवणीने आणि हव्या त्या जातीचा गुरु करण्यास मुभा ठेवल्यानें वर्णाश्रम धर्माचा पाया बराच हादरला. यामुळे खडबडून जागे होऊन पुष्कळ ब्राह्मणानीं वारकरी पंथाच्या विरुद्ध उठविलेलें काहूर तुकारामादि-संत-चरित्रात आपल्या दृष्टोत्पत्तीस येतें. ब्राम्हण वर्गाला आपलें स्वत्त्व राखण्याकरिता एखाद्या स्वतंत्र पंथाची आवश्यकता तीव्रपणें भासूं लागली. अशा सामाजिक मनःस्थितींत श्री समर्थ

रामदासांचा पंथ उदयास आला. ब्राह्मणानें आपल्या जातीबाहेरचा गुरु करिता कामा नये, असा श्री रामदासाचा कटाक्ष होता.

गुरू तो सकळासी ब्राह्मण ।
जरी तो जाहला क्रियाहीन ।।
तरी तयासी शरण ।
अनन्य भावें असावे ।। ( ५०५ )

असें दासबोधांत स्पष्ट बजाविलें आहे. श्री रामदासापूर्वी पंधराव्या शतकांतच श्री नृसिंह सरस्वतींनीं वैदिक परंपरा रक्षण करण्याकरिता गुरुदत्त मार्गातून आपला एक निराळा सोवळा पंथ काढला. श्री जनार्दनस्वामींचा दत्तमार्ग नृसिंह सरस्वतींच्या इतका कडकडीत सोवळा, वैदिक पंथाभिमानी नव्हे. श्री जनार्दनस्वामीचे शिष्य एकनाथ महाराज वारकरी संप्रदायात जातात. खुद्द जनार्दनस्वामींना दत्तगुरुनें अवलिया रूपात दर्शन दिले. पण श्री नृसिंह सरस्वतीच्या परंपरेंतील यति पंढरीच्या घोळक्याच्या वाऱ्यासहि उभा राहाणार नाहीं. मूळ गुरुपंथ वेदास अनुसरणारा नसून वेदच त्याना अनुसरतो. गुरुदत्ताच्या चित्रात कुत्र्याच्या संकेतानें ही गोष्ट ध्वनित केली आहे. " गुरुवाक्यावाचोनी शास्त्र " कोणते नव्हे. गुरूचे तोंडून येईल तेंच वेदवचन असा बाणा असलेला हा गुरुमार्ग वैदिक पंथीयानी सोवळा करून घेण्याचा प्रयत्न केला. श्रीपाद श्रीवल्लभ व नृसिंह सरस्वतींच्या परंपरेनें हा कडकडीत सोवळेपणा बराचसा राखलाहि आहे. श्री वासुदेवानंद सरस्वती ( टेंब्ये ) महाराजांत तो पराकाष्ठेला गेला. आधुनिक काळातील दत्ताचा एक अवतार मानले गेलेले श्री अक्कलकोटकरस्वामी कोणत्याहि जातीच्या घरी भोजन करीत; मशिदींतून प्रार्थनेलाहि जात; शिवाशिवीचा विधिनिषेधहि त्यांना नव्हता. निरंजन अवलिया म्हणून त्याचा नावलौकिक होता. त्याच्या पुढील पिढींतील दत्त प्रासादिक, दत्तावतारी मानले गेलेल्या श्री टेंब्येस्वामीचें सर्वच याच्या उलट. त्रिकालस्नान. शूद्राची सावलीहि सोवळयाला चालत नसे. त्याचा कडक सोवळेपणा कट्टर सनातन्यानाहि थक्क करण्याइतका होता. भजनीपंथ हा टाळकुट्याचा असें त्यांना वाटे. वर्णाश्रमाविषयीं त्यांचा कटाक्ष विशेष असे. अशा प्रकारें सोवळ्या बनलेल्या या दत्तपंथाच्या चरित्रातहि मुसलमान शिष्य

डोकावतातच. नृसिंह सरस्वतींनीं वादाकरितां आलेल्या ब्राह्मणास एका नागाकडून हरविलें. मुसलमान बादशहास त्याचा रोग बरा करून आपल्या शिष्यात गणलें.

## कर्णाटकांतील प्रतिक्रिया

कर्णाटकातील संप्रदायप्रियता आणि सोवळेपणा हा काहीं विशेषच आहे. येथील धार्मिक चळवळीतील कांही गोष्टींचा महाराष्ट्रातील धार्मिक चळवळींशीं संबंध पोचतो. वारकरी संप्रदायाविषयीं कर्णाटाची प्रतिक्रिया काय हें जाणणेहि तुलनात्मक-अभ्यासाच्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. सत भानुदासानीं विजयनगरहून विठ्ठलाच्या मूर्ति पंढरीला परत नेल्या, असें महाराष्ट्र संत-चरित्रा-वरून कळतें. पण त्या मूर्ति विजयनगराला का आल्या याचा उलगडा तेथे होत नाहीं.

कर्णाटकातील पुरंदरादि वैष्णवदास मंडळी विठ्ठलभक्त होती, हे सुविख्यात आहे. त्यातील बहुतेकाची गाणीं "पुरदर विठ्ठल", "जगन्नाथ विठ्ठल" वगैरे विठ्ठलमुद्रिकेनें पूर्ण होतात. पढरी हे सर्व विठ्ठल भक्ताना आपल्याकडे वेधणारे महाक्षेत्र होतें. कर्णाटाप्रमाणें महाराष्ट्राची संत मंडळीहि ज्ञानेश्वरापासून पंढरी क्षेत्राकडे विशेष ओढली गेली. ज्ञानेश्वरादि संत मंडळीच्या वर्णनावरून हे क्षेत्र त्यावेळीं कर्णाटातील होतें असे दिसून येते.

काशीये कनोजु, द्वारका गुजरू ।
कानडा विठ्ठलु पंढरीये ।
कानडा हो विठ्ठलु कर्नाट कु ।
येणें मज लाविलासे वेधु ॥

विठ्ठलु कानडी बोलूं जाणे ।
त्याची भाषा पुंडलीक नेणें ॥

वरील अभंगांत विठ्ठल ही देवता कानडी व पंढरपूर हें क्षेत्र कर्णाटकातील आहे हे स्पष्ट शब्दांत नमूद आहे. याच अभिप्रायाचे दुसरे बरेच अभंगहि प्रसिद्ध आहेत. "कानडा" हा शब्द अगम्य, न कळणारा अशा अर्थी काहीं ठिकाणीं उपयोजिलेला आहे हें खरें. 'कानडा हो विठ्ठलु' म्हणजे विठ्ठल

अगम्य, बुद्धीच्या पलीकडचा असा अर्थ होऊं शकेल. पण काशी, द्वारका या स्थळनामाप्रमाणें कर्णाटकाचे नाव देऊन पंढरी क्षेत्र त्या प्रातातील आहे, असे वरील अभंगात सागितले आहे.

एकेकाळीं पंढरीचा विठ्ठल कर्णाटकातील हरिभक्तांचें जिवाभावाचें दैवत होतें. विठ्ठलमुद्रिकायुक्त हजारो "दासर पदगळु" कर्णाटकातील हरिभक्तांच्या जिभेवर नाचत आहेत. पण आज तोच विठ्ठल मागें बाराव्या शतकापर्यंत कर्णाटकातील दैवत असें गणला जात होता, याची दोन्ही प्राताना आठवण देण्याची पाळी यावी याचें कारण काय? कानडी वैष्णवभक्त विठ्ठलाला परके वाटले नाहीत तरी ते पढरीला पारखे का झाले? आज उडुपी व तिरुपति येथें कानडी वैष्णवाचा मेळावा जितका जमतो तितका पंढरीस खचित जमत नाहीं. उडुपीचा देव श्रीकृष्ण, तिरुपतीच्या देवाचे नाव व्यंकटेश किंवा श्रीनिवास, पण कानडी हरिभक्त विठ्ठलाचीं गाणीं गात उडुपी व तिरुपतीची यात्रा करतात. याचें कारण काय असेल? याचें कारण श्री ज्ञानोबारायाचा वारकरी संप्रदायच होय.

पंढरीहून विठ्ठलाच्या मूर्ति विजयनगराला आल्या. भानुदासाचे समकालीन श्री वादिराज स्वामीच्या तीर्थप्रबंध नामक संस्कृत ग्रंथांत विठ्ठल विजयनगराकडे आल्याचा पुरावा मिळतो. "तुंगातीरगतोऽसि विठ्ठल" असें वादिराज स्वामींनीं म्हटलें आहे. याचा अर्थ चंद्रभागेहून निघून हे विठ्ठला तूं तुंगातीरीं गेलास असा होत आहे. श्री विठ्ठलाच्या मूर्ति विजयनगराला आणल्या गेल्याचें वरील पुराव्यावरून सिद्ध होतें. पण मूर्ति विजयनगराला का नेल्या त्याच्या मागची मनोभूमिका काय याचा उलगडा अजून झालेला नाहीं. मुसलमानांच्या टोळधाडीनें पंढरी विठ्ठलाच्या मूर्ति अपवित्र होऊ नयेत अशा करतां हिंदुत्वाचे अभिमानी "हिंदूराय सुरत्राण" अशी बिरुदावली धारण करणाऱ्या विजयनगराच्या राजानीं मुसलमानी राज्याच्या कचाट्यांत अडकलेल्या पंढरीहून त्या मूर्ति आणल्या अशी काहींची समजूत असलेली दिसते. पण यात कांहीं तथ्य आहे असे म्हणवत नाहीं. कारण संत भानुदासानीं विजयनगरहून परत मूर्ति नेल्या त्यावेळीं किंवा पुढें बरीच वर्षे सुद्धा पंढरी क्षेत्र मुसलमानांच्या तावडींतून थोडेंच बाहेर आलें होतें! यास्तव कानडी हरिदासानीं विठ्ठल मूर्ति पंढरीहून विजयनगरला आणल्याचें कारण निराळेंच आहे असें वाटतें. एका

कानडी विठ्ठलभक्ताच्या गाण्यात, विठ्ठल पंढरीहून इकडे पळून आला असें वर्णिलेले आहे. या गाण्याचा कर्ता अर्वाचीन म्हणजे सुमारें दोनशें वर्षांपूर्वीचा असला तरी त्याच्या गाण्यात पूर्वपरपरेनें त्याला मिळालेल्या हकिगतीचें यथातथ्य वर्णन आहे.

### कानडी पद

येनिदु कौतुकवु, विठ्ठला ! येनिदु कौतुकवु ।
नीनिल्लिगेके बंदे, विठ्ठला ! येनिदु कौतुकवु ॥ ध्रु ॥

मध्वद्वेषिगळु माडुव पद्धतियनु कंडु ।
हृद्य वागदे कद्दकळ्ळनंते, यद्दिल्लिगे बंद्या ॥ १ ॥

मिथ्यावादिगळु निरंतर सुत्तिमुत्तिकोडु ।
अत्तु करेदु कुगुतिरे बहळ बेसत्तु होरटु बंद्या ॥ २ ॥

श्री विठ्ठल निन्न सद्गुण वेदशास्त्रगळली ।
शोधिसी नोडलु भूदेवरिगोलिदादरिस बद्या ॥ ३ ॥

विठ्ठला ! येनिदु कौतुकवु ॥

**अर्थ :** " किती कौतुकास्पद आहे बरें ही गोष्ट ! विठ्ठला, तूं इथें का बरें आलास ? मध्वद्वेषी मिथ्यावादी लोकानी तुझ्याभोवती गराडा घालून, आणि रडून कढून तुझ्यापुढें चालविलेले ते चाळे पाहाणे असह्य होऊन तूं चोराप्रमाणे इकडे निसटून पळून आलास ! ब्राह्मणावर कृपा करण्याकरिताच तूं इकडे धांवून आलास नव्हे का ? "

ब्राह्मणावर कृपा करण्यास ( भूदेवरिगे वोलिदु आदरिसलु ) विठ्ठला तू इकडे धावून आलास असें म्हणण्यातील खोच विचाराई आहे. अब्राह्मण गुरु करण्यासहि मुभा देणाऱ्या वारकरी संप्रदायात शिरणाऱ्या ब्राह्मणाचें ब्राह्मण्य नष्ट होण्याची भीति आहे. असा इशारा श्री. रामदासानीं दासबोधात दिलाच आहे. विठ्ठल संप्रदायी वारकरी ब्राह्मणाना, ब्राह्मण म्हणण्यासहि कर्णाटकातील माध्व ब्राह्मण तयार नसल्याचें येथें ध्वनित होतें. बिनसोवळ्या जातिभेदातीत भक्तीला कंटाळून श्री विठ्ठल पंढरीहून उठून इकडे पवित्र वातावरणात आला

असें वरील गाण्यांत सूचित आहे. यावरून कानडी वैष्णव भक्तानीं पंढरी कां सोडली याचा उलगडा होण्याजोगा आहे. अशा रीतीनें कानडा विठ्ठल मऱ्हाटा झाला.

कर्णाटकावर महाराष्ट्रानें अशा रीतीनें मात केली आणि लोण परत दिले. पण तत्पूर्वी देवगिरी यादवाच्या राजवटीत शेवटीं मराठीला राजाश्रय मिळे-पर्यंत म्हणजे तेराव्या शतकाच्या मध्यापर्यंतहि कर्णाटक–"मातु" चा प्रभाव मऱ्हाटीवर होता. यापुढील काळात सर्व डाव उलटला. वारकरी संप्रदायाचा कर्णाटकीयांवर बराच परिणाम झाला. भागवत (विठ्ठल) पंथाकडे कानडी लोक आकर्षिले गेले. हरिहरात भेद मानू नये, अशा विचाराची समत्ववादी मंडळी वारकरी संप्रदायाकडे खेंचली गेली. अद्वैतपंथांतील कट्टर सनातनी, वारकरी पंथापासून दूर राहिले; नृसिंह–सरस्वतींच्या आत्यंतिक सोवळ्या दत्तपंथाचा प्रभाव त्याच्यावर पडला. काहीं रामदासीहि झाले. महाराष्ट्राच्या या धार्मिक संप्रदायाबरोबर त्याचीं मराठीं भजने, आरत्या वगैरेंचा प्रसार कर्णाटकात त्या त्या पंथीयात झाला. कर्णाटकीयाकडून महाराष्ट्राला शिवभक्ति, मल्हारी मार्तंड, यल्लाई, तुकाई वगैरे संप्रदाय एकेकाळीं दिले गेले, त्याचे हें सव्याज (सांस्कृतिक) ऋण फिटलें!






# उपसंहार

आजच्या समस्या केवळ आजच निर्माण होत नसतात; तर त्याचीं पाळेंमुळे भूतकाळाच्या गाभ्यात दूरवर गेलेली असतात. काळ हा अखंड आहे. काल, आज आणि उद्या असे व्यवहाराच्या सोईकरिता त्याचे विभाग पाडलेले आहेत. ‘ काल ’ च्या पोटातूनच ‘ आज ’ निघालेला असतो. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे म्हणजे, ‘ आज ’ हा थोड्या फार फरकानें कालचाच नवा अवतार असतो.

आजच्या रोगाचें निदान व्हावयास कालच्या आपल्या करणीचा आढावा घेणें जरूर आहे. पण मनुष्यमात्राचा अभिमान, अहंकार आडवा येत असल्यानें कालच्या कृतीचे जितक्या त्रयस्थपणें, शांतपणें व निर्विकारपणें विश्लेषण व्हावयास पाहिजे तितके ते होऊं शकत नाही. यामुळें सामान्यतः आपल्या समस्याचा सत्यार्थ कळणें कठिण होते.

## कानडी–मऱ्हाटीची गुंतागुंत

कानडी आणि मऱ्हाटीच्या गुंतागुंतीचीहि अशीच स्थिति आहे. ही गुंतागुंत अलीकडची आहे अशी बऱ्याच लोकांची समजूत आहे. पण आमच्या मतें, ती अति प्राचीन आहेत. आतापर्यंतच्या विवेचनावरून, कर्णाट-महाराष्ट्राचे पूर्वज एकच होते आणि तेथील जन हीं जुळीं भावंडेंच होत

असा निष्कर्ष काढला तर ते चुकीचे होईल काय ? आज कानडी आणि मराठी अशा वेगवेगळ्या नावानी ओळखल्या जाणाऱ्या लोकांचा व्यवहार हजारों वर्षांपासून इतका एकमेकांत गुंतलेला आहे, त्याचा प्रभाव एकमेकांवर इतक्या विलक्षण रीतीने पडलेला आहे कीं, दोघांचें हें खरे स्वरूप लक्षात यावयास एकेकट्याचा स्वतंत्रपणें अभ्यास करून भागणार नाही. दोन्ही भाषांतील म्हणी, शब्द वगैरेंचें मर्म व औचित्य कळण्यास परस्परांचे साहित्य आणि परंपरा याच्या अभ्यासाचीच जरुरी आहे. उदाहरणार्थ : ' गंगेत घोडें न्हाले ' ही मराठी म्हण पुष्कळांच्या मते पेशवाईत उत्तरेकडील स्वाऱ्यांचे वेळी प्रचारात आली. पण वस्तुस्थिति पाहाता कर्णाट आणि महाराष्ट्राचे चालुक्य व राष्ट्रकूट राजे याच्या अमदानींत ही म्हण लोकांचे तोंडीं असल्याचा पुरावा मिळतो. पंप महाकवीच्या कानडी भारतात ( इ. स. ९३२ ) अरिकेसरीचे घोडे गंगेत न्हाले, असे वर्णन पहिल्या आश्वासात आलेलें आहे. ( गंगावार्धियोळ् आत्म तुरगमम् मियिसिदन् ) मराठींतील 'अतिशहाणा त्याचा बैल रिकामा' ही म्हण आजच्या कानडी बोलींत रूढ नाही. पण इ. स. ११३५च्या सुमारास धारवाड जिल्ह्यात (मुळगुंद) होऊन गेलेल्या नयसेन याच्या ' धर्मामृत ' काव्यात " अतिजाणन गोणि बरिदु " ही म्हण नमूद आहे. कानडींतील लुप्त परंपरांचे अवशेष मराठीत मिळतात तर मराठी भाषा व संप्रदायातील कोड्यांचे खुलासे कानडींत मिळतात. 'कैवारी' हा शब्द जुन्या कानडी साहित्यात तेराव्या चौदाव्या शतकापर्यंत सर्रास आढळतो; पण पुढें तो मागें पडला. ' पत्करणे ' याचा अर्थबोध आजच्या या स्वरूपात होत नाही. पण कुमारव्यासानीं ठिकठिकाणीं उपयोजिलेल्या ' पतिकरिसिदनु ' (म्हणजे स्वीकारलें) हा प्रयोग लक्षात घेता पत्करण्याचा उमग पडतो. इसु प्रत्ययामुळे हा धातु मूळ कानडी नव्हे हें सिद्ध आहे. ज्ञानेश्वरीत ' पतिकरा ' चा प्रयोग येतो. मराठीतील हा शब्द कुमारव्यासाने इसु लावून कानडीत घेतला आहे. ' पोवाडा ' या शब्दाचा अर्थ कळण्यास ' पवाड ' चा कानडीतील प्राचीन प्रयोग साहाय्यक होणार आहे. ' पवाड ' ला चमत्कार, दिव्य, अतिमानुषी कृति असे अर्थ संभवतात. यावरून कोण्या व्यक्तीचा महिमा गाण्याला पवाडे–पोवाडे हा अर्थ रूढ झालेला आहे. ही परंपरा माहीत नसल्याने मराठींत या शब्दाचें औचित्य

कळेनासें झाले आहे. कानडीतील वोली ( ओल्हि ) शब्द महानुभाव साहित्यात आल्याचा उल्लेख मागे केलाच आहे. हा शब्द कानडींत प्रौढ साहित्यिक भाषेंत आढळणार नाहीं. याचा जुना प्रयोग पाहावयाचा असल्यास कानडी साहित्यिकाना चक्रधर लीळाचरित्र व रुक्मिणी स्वयंवराकडेच धाव घेणें जरूर आहे. मुद्दल शब्दाविषयीहि असाच प्रकार आहे. कानडी भाषेतील आजच्या साहित्यिक ग्रंथात किंवा गणित पुस्तकात मुदल् शब्द (मोदलु) चुकूनहि आढळणार नाही. पण बाराव्या शतकातील 'धर्मामृत' नामक ग्रंथात "मोदलं कोंडु पत्रमं सीळ्वंते" (मुद्दल स्वीकारून कागद फाडून देण्याप्रमाणे) असा प्रयोग आला आहे. मुद्दल हा शब्द मराठीत ज्ञानेश्वरापासून आजपावेतो लोकाच्या बोलींत जिवंत राहिला आहे. कानडी मात्र आपल्या या सुंदर शब्दाला पारखी होऊन 'अस्सल' अशा परकी शब्दावर आपली गरज भागवीत आहे, हें कानडीचें मुदलात चुकले! मुदल् किंवा मोदल् म्हणजे प्रारंभ असा अर्थ असून व्यापार–व्यवहारात या शब्दाला लक्षणार्थाने मूळ रक्कम असा दुसरा अर्थ प्राप्त झाला. नयसेनाच्या वरील अवतरणात, कर्जव्यवहार संपल्यावर रोखा फाडून देण्याची आजची रीत त्यावेळीहि प्रचलित असल्याचे वर्णन आले आहे. असे हे उल्लेख प्राचीन काळी कर्णाट–महाराष्ट्रात रूढ असलेल्या सामाजिक चालीरीतीवर महत्त्वाचा प्रकाश टाकतात.

म्हणी, वाक्संप्रदाय, शब्द वगैरे भाषाविषयक गुंतागुंतीप्रमाणेच या दोन्ही देशाच्या सीमा व नावे याविषयीहि 'ही की, ती' अशा प्रकारची असलेली भ्राति आरंभापासून आजपर्यंत चालू असल्याचे दिसून येतें. 'दक्षिण महाराष्ट्र' म्हणून महाराष्ट्रानें संबोधिलेल्या भागास 'उत्तर कर्नाटक' असे कानडी लोकानी संबोधावयाचे हा आजचा प्रकार काही नवीन नाही. प्राचीन काळातहि हचें दिसून येतें.

कर्णाटकचे सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक श्री गोविंद पै हे प्राचीन भारतीय इतिहासाचे तज्ज्ञ म्हणून हिंदुस्थातील मोठ्या विद्वानात गणले जातात. कर्णाट–महाराष्ट्राच्या पुरातन इतिहासाचे आलोडन केलेल्या श्री गोविंद पै याना हे दोन्ही प्रात अभिन्न असून कर्णाटक म्हणजे महाराष्ट्र, आणि महाराष्ट्र म्हणजे कर्णाटक असें आढळून आले. 'कर्णाट' शब्दाची व्युत्पत्ति त्यानी याच दृष्टीनें बसविली आहे.

करं किंवा करु म्हणजे मोठा, महा, नाडु म्हणजे देश असा अर्थ लावून कर्णाट–महाराष्ट्र असा निर्णय श्री. गोविंद पै यानीं घेतला आहे. आणि तारातंत्र नामक प्राचीन ग्रंथात महाराष्ट्र देशाचे नांव कर्णाट असें दिले असल्याचें व कर्णाट आणि महाराष्ट्र देश एकच होत असे उल्लेखिलें असल्याचे श्री गोविंद पै सागतात.

या दृष्टीनें श्री. ए. मास्टर आय्. सी. एस्. याचे पुढील वाक्य उल्लेखनीय आहे. 'Karu means not only tall but great and it seems highly probable that the Prakrit speaking inhabitants of the North of Deccan high lands, simply translated the word 'Karunadu' into 'Maharashtra' to designate the area from which they come ( Indian Antiquery Vol LVII p 175 )

महाराष्ट्राचे अद्वितीय विद्वान आणि संशोधक कीर्तिशेष डॉ. भाडारकर ( थोरले ) हे सुद्धा या प्रदेशाचा इतिहास लिहितेवेळी त्याला काय नाव द्यावें यासंबंधीं घोटाळ्यात पडले असावेत. महाराष्ट्राचा इतिहास म्हणावें तर बादामी, मळखेड, कल्याण यासारख्या आजहि कानडी प्रदेशात असलेल्या त्याच्या राजांच्या राजधान्या, आणि कर्णाटचा इतिहास म्हणावे तर पुलकेशीचे राज्य पाहून हुएनत्साग तेथील लोकाना महाराष्ट्रीय ( महोलोच ) असें म्हणतो. चालुक्य राष्ट्रकूटादि राजाचे सोयरीकसंबध उत्तरेस विशेष, म्हणून या गोधळांतून मुक्त होण्यास त्यानीं आपल्या ग्रंथाला "History of Deccan" "दक्षिणापथाचा इतिहास" असें नाव दिलेले दिसते.

श्री पै, मास्टर, भाडारकर आदि आधुनिक ग्रंथकाराची जी स्थिति तोच प्रकार प्राचीम काळातहि दिसतो. उपर्युक्त 'तारातंत्र' ग्रंथात महाराष्ट्र-कर्णाटक अभिन्न असें लिहिल्याचा उलेख केला आहेच. श्री नंदलाल डे यांच्या प्राचीन स्थलनामाच्या कोशात कर्णाटक म्हणजे कुंतल असें दिलें आहे. 'विक्रमाकदेव चरित' नामक काव्याला जोडलेल्या प्रस्तावनेत बुल्हरनी कुंतल म्हणजे कर्णाटक असें लिहिलें आहे. डॉ. बी. सी. लॉ याचेंहि मत तसेंच आहे. बादामी चालुक्याना कुंतलाधिपति म्हणावयाची परंपरा तमिळ देशात होती ( Tamil Lexicon कुंतल पहा.) बिल्हणाने 'विक्रमाकदेव चरिता' त कल्याणी चालुक्यांना 'कुंतलेन्दु' असें म्हटले आहे. सातकर्णी राजाचा कुंतलाधीश

असा उल्लेख वात्स्यायनाच्या कामसूत्रात एके ठिकाणीं आला आहे. या सातकर्णी राजाची राजधानी तर पैठण ! बुल्हरसारख्या मोठ्या दक्ष संशोधकाच्या मतें कुंतल म्हणजे कर्णाटक हें खरें असेल तर पैठण कर्णाटकांत आलें ! कर्पूर-मंजरी नाटकात विदर्भाला कुंतल म्हटलें असल्याचें दिसते. या ग्रंथाचे संपादन करताना लिहिलेल्या टीकेंत डॉ. स्टेन कोनो यानीं नर्मदा ते कृष्णा–तुंगभद्रेपर्यंत कुंतल देश असें म्हटलें आहे. ( कर्पूरमंजरी नाटक, अंक १·१·२५, हॉवर्ड युनिव्हर्सिटी प्रकाशन, पृष्ठ १६०). 'वाचस्पत्य' नामक महाकोशात शक्तिसंगम तंत्रातील एक श्लोक उद्धृत करून कुंतल देशाची व्यप्ति सांगितली आहे. 'कामगिरीम् समारभ्य द्वारकान्तम् महेश्वरी । श्रीकुंतलाभिधो देशः कथितः पूर्व-सूरिभिः ॥ कुंतल द्वारकेपर्यंत येऊन भिडलें ! विदर्भ हा, निःसंशय मूळ महाराष्ट्र असल्यानें विदर्भ जर कुंतल, तर नर्मदेपासून तुंगेपर्यंत महाराष्ट्रच ठरतो. म्हैसूरचा काहीं भागहि कुंतलात मोडत असल्याचे कानडी जैमिनीभारतावरून दिसते. यामुळे कर्णाटाला स्वतंत्र अस्तित्व कोठें राहिलें ? एवढेंच नव्हे तर द्वारकेपर्यंत कुंतल म्हटल्यानें लाड, लाटकर हेहि निःसंशय महाराष्ट्रीय ठरतात.

बृहन्महाराष्ट्राची कल्पना अलीकडची आहे. पंचवीस तीस वर्षांमागें काहींना हा शब्द सुचला. पण बृहत्कर्णाटक शब्द जुन्या एका शिलालेखात आला आहे. ( Epigraphica Indica Vol III p 87 ) या बृहत्कर्णाटात महाराष्ट्रहि समाविष्ट झालेला दिसतो. आता लाट-कर्णाटाचे जुने उल्लेख पहाः— " जित्वा चोळ कलिंग सेउण बृहत् कर्णाट-लाटाधिपान् ॥ " 'लाट–कर्णाट-कर्‍हाट-कलिंग-कोंग वंगवेंगि' (Ep I. Vol IV p 261.) 'जित्वा वंग-तिलंग-गुर्जर-लसत्-कर्णाट-गौडाधिपान्'; 'कर्णाट—लाटोद्भटक्षोणीपालविडंबनः' (Ep. I Vol. XII p. 24 ) या प्राचीन लेखातून आलेले हे उल्लेख कर्णाट आणि महाराष्ट्र एकच होत असे दर्शविणारे आहेत. एवढेंच काय, खिस्ती शकाच्या आरंभी लिहिल्या गेलेल्या एका कथेंत अशाच प्रकारचा समज रूढ असलेला दिसून येतो. शूद्रक राजानें वीरवर नांवाच्या आपल्या सेवकास लाट–कर्णाट असा संयुक्त देश दिल्याचें वर्णन आहे. " लाटदेशे ततो राज्यं सकर्णाटयुते नृपः " ( १२–११–१०९. )

वरील लाट-कर्णाट या जोड शब्दानें दोन तर्‍हेचे अर्थ निघूं शकतातः—

(१) महाराष्ट्र व कर्णाटक त्याकाळी अभिन्न होते; महाराष्ट्र हा कर्णाटकातच अंतर्भूत होत होता; किंवा (२) महाराष्ट्र त्यावेळीं वऱ्हाटातच सामावलेला होता. वऱ्हाडाबाहेर अजून तो पसरूं लागला नव्हता. असा अर्थ केला नाही तर लाट–कर्णाट हा जोड शब्द अर्थविहीन ठरतो. लाट–कर्णाट हा शब्द काहीं एका-दोघांनीं वापरलेला नव्हे. ताम्रपट व शिलालेख लिहविणाऱ्या जबाबदार परराष्ट्र मंत्री, (संधिविग्रही) राजमंत्र्याकडून ही परिभाषा शेंकडो वर्षे उपयोगात आलेली दिसते. लाट देशाची सीमा संपल्यानंतर आजच्यासारखा महाराष्ट्राच्या प्रदेशास आरंभ होत असता तर लाट शब्दापुढें एकदम कर्णाट शब्दाचा उपयोग करणें योग्य झाले नसतें. राजाराजाच्या देवघेवीमध्यें राज्याच्या सीमा जाणणाऱ्या जबाबदार व्यक्तीकडून हे शब्द वापरले गेले आहेत. हें जर खरं, तर लाट देश संपताच कर्णाट देशाची सीमा सुरू होते असें म्हणणे क्रमप्राप्त आहे. पण आज तर तेथें कर्णाटाचा मागमूसहि दिसत नाही हे कसे? एकेकाळी तेथें कर्णाट असल्याचे काही अवशेष तरी आपणास आज पाहावयास मिळतात काय? थोड्या बारकाईनें व सरळ तर्कशुद्ध बुद्धीनें पाहिले असता त्या भागात प्राचीनकाळी कर्णाटकाचे अस्तित्व असल्याचे बरेच पुरावे मिळतात आणि त्याचे विवरण यापूर्वी ‘जुळी भावंड’ या प्रकरणात व अन्यत्र आलेले आहे.

वाल्मीकि रामायणात या प्रदेशाचें “विदर्भान् ऋचिकान् चैव” असें वर्णन आलें आहे. महाभारतात व हरिवंशांतहि ऋचिक किंवा ऋषिक देशाचें नाव येते. हे ऋचिक (ऋषिक) म्हणजेच अशोकाच्या लेखात आलेले रिष्टिक होत. रिष्टिक–रठ–राठ–रट्ट हे कानडे असावेत अशा प्रकारचा निर्णय डॉ. आळतेकर यानी राष्ट्रकूटावरील आपल्या ग्रंथात निरनिराळीं कारणे देऊन दिलेला आहे. अशोकाच्या लेखात रिष्टिकाबरोबर भोजकाचा उल्लेख येतो. रामायणांत ऋचिकाच्या समवेत विदर्भान् असे वर्णन आहे. भोजक राजे विदर्भाचे होत. यावरून खारवेलाच्या व अशोकाच्या लेखातील भोजक म्हणजे विदर्भ देशाचे जन हें निर्विवाद सिद्ध होते.

प्रथम–महाराष्ट्र म्हणजे वऱ्हाट असें सिद्ध झालेलें आहे. वऱ्हाटचे जन भोजक तर भोजकाच्याजवळ कोठेतरी रिष्टिकाची वसाहत किंवा दे[illegible] असला पाहिजे. अशोकाच्या शासनातील भोजक–रिष्टिकादि उल्लेखावरून डॉ. बी. सी.

लॉ यानीं या दोघांहि जनाचे देश जवळजवळच असले पाहिजेत असा निर्वाळा दिला आहे.

खानदेशाला एकेकाळी ऋचिक–ऋषिक असें नाव होतें. आणि हे ऋचिक किंवा ऋषिक लोक म्हणजे भोजकाचे आप्तबांधव रिस्टिक किंवा राष्ट्रिक हेच असावेत असें म्हणावें लागतें. कारण विदर्भाच्या भोजकांचे शेजारी खानदेशा-शिवाय दुसरीकडे या नावाचे लोक असल्याचें दिसून येत नाही. ऋचिकदेश, गोपदेश, अश्मकादि तात्पुरती आलेली नावे मागे पडून मूळ जनवाचक कन्नदेश–खानदेश या नावानेंच पुन्हा डोकें वर उचलले. वऱ्हाट–मऱ्हाट हे नाव या वरील तर्कास दुजोरा देणारें आहे. विदर्भासारखे दुसरे नाव थोडा काळ रूढ केलें गेले. पण नवीन रूढ होऊं पातलेलें नाव मागे पडून मूळ मऱ्हाट (वऱ्हाट) हें नावच आजपर्यंत तगून राहिलेले आहे. त्याचें भाषांतर 'झाडि-मंडळ' हे सुद्धा ग्रंथांतरींच राहिलें!

अशा रीतीनें ज्याच्यामुळें या प्रदेशाला ही नावे आली ते, कर्णाट–मऱ्हाटचे पूर्वज, वेद व भारतकालीन यदु-तुर्वसु, अशोककालीन रिष्टिक भोजक, रामायणातील ऋषिक भोजक व मूळ हट्टिकार (कण्णजन व मरहट्टे)–हे अतिप्राचीन काळापासून अतिशय जवळच्या नातलगासारखे–जुळ्या भावंडा-प्रमाणे राहिले आणि वाढले हे स्पष्ट होत आहे.

## आतां हें चित्र पहा

ज्या इतिहासानें या दोन्ही जनातील जिव्हाळ्याचे घनिष्ठ संबंध वरील-प्रमाणे प्रत्ययास आणले व दोहोंची एकरूपता सिद्ध केली त्याच इतिहासानें दाख-विलेल्या पुढील घटना अभ्यसनीय आहेत. त्याच घटना आजच्या निकृष्टतेस कारणीभूत होऊन बसल्या आहेत. कालाच्या पोटात अनेक परस्परविरुद्ध गोष्टी गडप झालेल्या असतात. काल त्याचा निरपेक्ष साक्षी आहे. पण मानव मात्र त्याना आपल्या सद्यःकालीन स्वार्थासाठी राबवूं पाहात असतो. माणूसहि अशा घटनाकडे जर कालाप्रमाणे तटस्थ, निरपेक्ष बुद्धीने, 'गुणा गुणेषु वर्तन्ते' दृष्टीने पाहील तर त्यातून जें विशाल सत्याचें दर्शन त्याला होईल तेच त्याला माणुसकीच्या उच्च पायरीवर नेण्यास उपयुक्त ठरेल. यासाठीं आता मऱ्हाट–कर्णाटच्या मूळ

जनातील जिव्हाळा आटून आजची यूयम् यूयम्–वयम् वयम् अशी वृत्ति का निर्माण झाली याच्या कारणाकडे वळूं.

ऐतिहासिक दृष्ट्या देवगिरी आणि हळेबीडु यादवांच्या यादवीपासून या वितुष्टाला ऊत येऊं लागला असें दिसून येतें. पुढील काळीं दोन्ही प्रातातील राज्याभिमानाच्या व प्राताभिमानाच्या राजकारणास रंग चढूं लागला तसतसें या वितुष्टतेचें स्वरूप जास्तच उग्र होत गेलें; पण अशा मनोवृत्तीमुळें दोन्ही प्रांत आपला खरा इतिहास आकलन करण्यास कसे असमर्थ झाले आहेत तें यापूर्वी प्रत्येक प्रकरणात दिग्दर्शित केलेंच आहे. अर्थात् त्या सर्वांचें सागोपाग विवेचन होणे जरूर आहे. पण तें केवळ एका व्यक्तीला झेपणारे काम नव्हे. अर्थात् या सर्वांचा आमूलाग्र अभ्यास होऊन तशा प्रकारचा महाग्रंथ तयार होण्यास सर्व तऱ्हेची अनुकूलता असलेल्या (धन, जन आणि ग्रंथसंग्रह) विश्वविद्यालया-सारख्या संस्थानीचपुढें येणें जरूर आहे. असो.

## मरहट्टाचा महाराष्ट्र कसा झाला ?

रिष्टिक भोजक हे खानदेश आणि वऱ्हाडात होते आणि हेच प्राचीन कर्णाट–मऱ्हाटाचे ऐतिहासिक काळातील पूर्वज. हें जर खरें असेल तर खान-देशापासून कर्णाटक घसरत घसरत कृष्णेपर्यंत कसा मागें हटला किंवा मऱ्हाटचें (वऱ्हाटचें) महाराष्ट्र कसे झाले ?

याचें सरळ उत्तर असें कीं आर्यीकरणाच्या जबरदस्त ऐतिहासिक रेट्यात मऱ्हाट–महाराष्ट्र झालें. महाराष्ट्राचा विस्तार होत होत कर्णाटहि महाराष्ट्राच्या म्हणजे आर्यीकरणाच्या कक्षेंत येत गेलें. ऐतिहासिक काळातील काहीं उल्लेखा-वरून सामान्यपणें दर २००–२५० वर्षांनीं महाराष्ट्राच्या सीमा दक्षिणेकडे एकेक नदी ओलाडीत असलेल्या दिसतील :–

(१) आर्यावर्त नर्मदेला संपतो असे मनुस्मृति वगैरेवरून निश्चित-पणें समजतें. तरीपण वैदिक ऋषींचा संबंध वेदकाळापासूनच दक्षिणा-पथाशीं होता असे अगस्ति ऋषीच्या कथा दर्शवीत आहेत. अगस्तीनें तमिळ देशापर्यंत आर्य संस्कृतीचा प्रसार केल्याचें, त्या देशातील रूढ कथा व प्राचीन परंपरा सुचवीत आहेत. वऱ्हाटाचा विदर्भ या नांवानें

महाभारतापूर्वीपासून उल्लेख आढळतो. दक्षिणापथात नर्मदेच्या दक्षिणेस आर्यांची प्रथम वसाहत वऱ्हाटात झाली असे सर्व संशोधकाचें मत आहे. नर्मदा नदी एकेकाळीं आर्यावर्ताची दक्षिण सीमा गणली जात असावी यात शंका नाही. पण " गोदावर्याः दक्षिणे तीरे " या संकल्पमंत्रात नर्मदा नदीचें नाव खरोखर असावयास पाहिजे होतें. यावरून या मंत्ररचनाकाली, आर्यावर्त गोदेपर्यंत येऊन भिडला होता असें दिसतें.

( २ ) दुसऱ्या पुलकेशीच्या वेळीं, हुएनत्साग हा चिनी प्रवासी या देशात आला होता. फ्लीटच्या मतें ' मोहोलोचाची ' एक राजधानी नाशिक असावी. यावरून सातव्या शतकापर्यंत महाराष्ट्राचा विस्तार गोदपर्यंत झाला होता असें म्हणावें लागते.

( ३ ) अमोघवर्ष–नृपतुंग या राष्ट्रकूट राजाच्या नावानें प्रसिद्ध असलेल्या कविराजमार्ग नामक ग्रंथात कर्णाटाची मर्यादा गोदेपर्यंत होती असें सागितलें आहे. ' कावेरियिंदमा गोदावरि वरं इर्द नाडदा कन्नड ' या आधाराबरोबर नाशीक जिल्ह्यातील कानडगौळी व वीरगल्लुहि हिशेबात धरावे म्हणजे ' गोदेपर्यंत कर्णाट होता ' हें विधान काव्यातील अतिशयोक्तीचें नव्हे याची खात्री पटेल.

( ४ ) यादव काळापर्यंत कर्णाटकाची उत्तर सीमा गोदा होती असें म्हणावयास काही आधार मिळतात. तरीपण आतल्या आत कर्णाटकाचे अभावितपणें महाराष्ट्रीकरण चाललेच होतें हेंहि तितकेंच खरे.

( अ ) महानुभाव लीळा चरित्रात पुढील उल्लेख आहे :

साठि लक्ष महाराष्ट्र । तेही वसविले गंगातीरु । त्र्यंबकूवेऱ्ही ॥

आर्यांना गोदा नदी गंगा नदीच वाटावी हे स्वाभाविकच आहे !

( ब ) ऐसे युगीं परी कळी । आणि महाराष्ट्र मंडळी । श्री गोदावरीच्या कूलीं ॥ — ज्ञानेश्वरी ( १८–१८–३ )

( ५ ) ( अ ) मुसलमानी अमदानींत बहामनी राजे वऱ्हाडी ( मराठी ) लोकांनाच नोकऱ्या अधिक देत. कारण विजयनगरच्या कानडी राज्याशीं

झगडण्यास कानडी लोकाचा उपयोग होणार नाही हें स्पष्टच होतें. (मराठी ज्ञानकोश पहा. महाराष्ट्र सारस्वत वगैरे ग्रंथातूनहि या काळी पुढे आलेल्या महाराष्ट्रीयाची माहिती मिळते.)

(ब) कै. पांगारकरांनी आपल्या एका छापील व्याख्यानात पुढील माहिती दिली आहे: विजापूरच्या अदिलशहाच्या दरबारी मुकुदराव नामक एक सरदार होता. या मराठा सरदाराच्या बहिणीवर फिदा होऊन अदिलशहानें तिला आपल्या झनानखान्यात आणलें. पुढे तिच्यामुळे विजापूर दरबारीं मराठीला महत्त्व आलें.

विजापुरापर्यंत मराठी भाषा आली या श्री पागारकराच्या माहितीला दुजोरा देणारा उल्लेख एका जुन्या कानडी कैफियतीत मिळतो. या कैफियतीचें नांव 'आर्काड संस्थानद कैफियत्तु' (कर्णाटक साहित्य परिषद् पत्रिका Vol. IX पृ. १३३–१३७)

## पेनुगोंडे कर्णाट राज्य; विजापूर महाराष्ट्र राज्य!

राक्षसतागडी युद्धात पराभव पावून विजयनगरच्या राजानीं दक्षिणेस पेनुगोंड्यास आपली राजधानी नेली. विजयनगरच्या राजाना "कर्णाट सिंहासनाधीश्वर" असे बिरुद होतें. त्यामुळे त्याची राजधानी असेल तेथें कर्णाट राज्य! पण पेनुगोंडे हें तेलगु प्रातात येतें. अशा रीतीनें कर्णाट परागदा झालें, 'कर्णे अटति' हें खरें ठरलें, विजापुरापर्यंत महाराष्ट्र आला!!

महाकवि मुक्तेश्वरांची समाधि तेरवाडला कुरुंदवाडाजवळ आहे. 'मुद्गल' हें जर त्याचें आडनाव ठरेल तर हें कानडी घराणे म्हणावें लागेल. त्याचे कुलदैवत सोनारीचा भैरव. सोलापुराचे पूर्वीचे नाव सोन्नलापूर असे असल्याचे जुन्या कानडी साहित्यावरून दिसून येतें. सोन्नलापूर सोनारपूर असणे शक्य आहे. श्री एकनाथाची भार्या विजापूरची होती अशी माहिती श्री. पागारकर देतात.

(क) कर्णाटातील ग्रामनामात मिळणारा पुरावाहि विचारार्ह आहे. धारवाड जिल्हाच काय, म्हैसूरपर्यंतहि "आरे" जन असल्याचें आढळून येतें. उदा: आरे कुरहट्टी; आरे होसूर; आरे मल्लापूर, आरे लकमापूर वगैरे!

(ड) सोरब तालुक्यातील (म्हैसूर) वीरगळावरील लेख "आरिय

नायकर् मुनिदु ..तुरुवं कोंबुवल्ली ( एदुरिसि ) मल्लिशेट्टी माडिद. ” (इ. स १२२५)

तुरुवं म्हणजे गोसमुदाय पळवून नेत असता त्या युद्धात आरियाच्या बरोबर लढून वीर-स्वर्ग पावलेल्या वीराचे अशा प्रकारचे पुष्कळ लेख त्या भागात मिळतात. (E Carnatica, VIII 86 174; IX Bn, 53, XI Dg 125, XII pg 48 )

तेराव्या शतकारंभीच मराठे कर्णाटात कोठपर्यंत पसरले होते हे वरील गोष्टीवरून चागले ध्यानात येणार आहे.

याचेच प्रत्यंतर आणखी दुसऱ्या एका रीतीनेहि मिळणार आहे.

आपला देश तो पवित्र, दुसऱ्याचा तो भ्रष्ट, पतित ही मानवाची मनोवृत्ति जगात सर्वत्र सारखीच प्रकट झालेली आहे :

(१) पंचनद देश पवित्र असे एके काळी वाटत असे. पण पुढे आर्यावर्ताच्या सीमा विंध्य पर्वतापर्यंत आल्या. पारियात्र असे त्या पर्वताचे नाव आहे. दक्षिणापद–दक्षिणापथ ही “ अयज्ञीय भूमि ” ठरली होती, अपवित्र, बहिष्कृताची भूमि टरली होती.

येथील लोकाना “ संकीर्णाचारधर्माः, पशुधर्माः, पापाः, म्लेच्छाः ” वगैरे शेलक्या विशेषणानी वर्णिलेलें आहे. महाभारत, मनुस्मृति वगैरे ग्रंथातून असे उतारे मिळतील.

(२) ‘ भारतीय भूघटना ’ नामक एका ग्रंथात या देशाच्या भूमीची सात्त्विक, राजस, तामस, अशी विभागणी केली आहे ती पहा ( महाराष्ट्र साहित्य पत्रिका. Vol. II पृ. ८५ ).

हिमवद्विंध्ययोर्मध्ये सात्त्विकं भूतलं स्मृतम् ।
नागरस्तु स्मृतो देशो हिमवद्विंध्यमध्यगः ॥

विंध्यशैलादि कृष्णान्तं राजसं परिकीर्तितम् ।
तुंगकृष्णादि कन्यान्तं तामसं भूतलं स्मृतम् ॥

कृष्णाया दक्षिणो भागः तामसः परिकीर्तितः ।

आपला तो सात्त्विक, फारच झालें तर राजस, नागरदेश; आणि कृष्णेच्या–फार तर तुंगेच्या दक्षिणेस तामस असंस्कृताचा देश !

या ग्रंथरचनेचा काळ कोणता असावा हे येथे कळण्याजोगे आहे. कृष्णेपर्यंत महाराष्ट्रसीमा आल्या आहेत. त्या तुंगेपर्यंत पसरूं पाहात आहेत–अशा वेळीं हा ग्रंथ झाला असावा. कारण तुंगेपर्यंत एकदा राजस भूमि ठरते, तर पुन्हां कृष्णानदीच राजस भूमीची दक्षिण सीमा असें सांगितलें जातें.

पण १२००–१३०० च्या सुमारास झालेल्या हरदत्तानें भारताची सीमा निःसंदिग्ध शब्दात सांगितली आहे ती अशीः–

"लोकोऽयं भारतं वर्षं शरावत्यास्तु योऽवधेः ।" म्हणजे या सुमारास आर्यावर्ताची सीमा शरावती नदी (गेरसप्पा) पर्यंत येऊन भिडली. याचा अर्थ असा कीं, महाराष्ट्र येथपर्यंत पसरला.

## महाराष्ट्रीकरण कसें झालें ?

हे महाराष्ट्रीकरण कसें घडले याचें रहस्य पुढील घटनावरून कळून येणार आहे.

(१) वेदकालीन संस्कृतांत संस्कृतेतर शब्द, काहीं द्राविड भाषावर्गीय शब्द घुसले आहेत, त्यावरून त्या काळीं संस्कृतेतर भाषा बोलणारे लोक असावेत हे उघडच आहे. वेदातून आणि उपनिषदातून 'चंद्र', 'मटची', 'अलर्क' सारखे शब्द आहेत. हे परभाषेंतील असतील तर या शब्दानी युक्त असे ग्रंथ ज्या ठिकाणीं रचले गेले त्या पंचनद देशातच या जनाची वस्ती असली पाहिजे; आणि आर्यांचा या जनाशीं संपर्क तेथेच पहिल्यानें आला असला पाहिजे. चंद्र-मस्, तुर्-वसु सारखे दोन भिन्न भाषांतील शब्दानीं बनलेले जोडशब्द त्या काळी रूढ झाले हें खरे असेल तर त्या तथाकथित द्राविड वर्गाच्या अर्यीकरणास ऋग्वेदकाळीच सुरवात झाली हें निश्चित ठरतें.

(२) दोन भिन्नभाषिकांचा संबंध येऊन मिश्रणास आरंभ झाल्यावर परस्परांच्या भाषेचे एकमेकांवर कसे व किती परिणाम होतात याचा तज्ज्ञाकडून सूक्ष्म व सांगोपांग तुलनात्मक अभ्यास झालेला आहे. त्याच्या साहाय्यानें आपलें

हें कोडें बरेंच उलगडतें. भाषिक पुरावा या प्रकरणात याचें थोडें विवेचन आलें आहे.

(३) ऐतिहासिक काळातील काहीं गोष्टी विचारार्ह आहेत :

(I) वैवाहिक संबंधामुळें दक्षिणेंत महाराष्ट्रीकरण झपाट्यानें झाले. अगस्तीनें विदर्भकन्या लोपामुद्रेशी विवाह केला. शुक्राची मुलगी देवयानी ययातीची बायको झाली. या प्रकारच्या इतिहासपूर्व कालीन अनुलोम–प्रतिलोम विवाहाच्या कथा विशेष जमेस न धरता अलीकडील काही घटनाचाच आपण विचार करूं.

(II) वैवाहिक संबंधामुळें कानडी घराणी आधी प्राकृत व नंतर मऱ्हाटी बनली. शातवाहनाचें असे हें एकच उदाहरण नव्हे. चालुक्य, कदब वगैरे राजघराण्याच्या नावाशीं सादृश्य असलेली आडनावे मऱ्हाट्यात आहेत, पण कानडी जनांत तीं राहिलीं नाहीत. राष्ट्रकूट राजघराण्यांत मध्यहिंदुस्थानातील त्रिपुरीच्या चेदी वंशातील मुलींशीं लग्नें करण्याची रूढि दोन तीन पिढ्यापर्यंत चालत आलेली होती. याप्रकारे चालुक्यादि राजघराण्यात उत्तरेकडील राण्याबरोबर आलेल्या प्राकृत भाषेनें कर्णाटाच्या राजधान्यात येऊन आधी अर्धे व पुढे पूर्ण सिंहासन काबीज केलें.

(III) शातकर्णी राजाच्या अंतःपुरात प्राकृत भाषा बोलणाऱ्या स्त्रिया असत. 'श्रूयते च कुंतलेषु सातवाहनो नाम राजा, तेन प्राकृतभाषात्मकं अंतःपुरमेवं वर्तितो नियमः' अशी राजशेखर कवि माहिती देतो. 'शातकर्णींना संस्कृत माहीत नव्हते, त्यानीं प्राकृताला आश्रय दिला' असें डॉ. इरावतीबाई लिहितात. आर्यमिश्रण असलेल्या मंगोल शातवाहनात हाल, पुलिमायीसारखीं कानडी नांवें कशी? आणि त्यानीं कर्णाटकात आपलें मूळ माहेरघर असें कसें नमूद करून ठेवलें? डॉ. आर्. डी. बानर्जी यानीं हें घराणें कानडी आहे असें आपल्या ग्रंथातून स्पष्ट निर्देशिलें आहे ( Pre-historic, Ancient and Hindu India ). डॉ. सुकथनकर आणि डॉ. बानर्जी या बड्या संशोधकानी पुढें माडलेल्या ताम्रपटासारख्या पुराव्याशिवाय पुढील कांही आंतरिक गोष्टीहि महत्त्वाच्या आहेत.

(iv) "वासिष्ठी-पुत्रस्य" यासारखे आईच्या नांवावरून वंश सागणारे याचे लेख आहेत. हे "मातृप्रधान कुटुंब–पद्धतीचे द्योतक आहे" असे डॉ. इरावतीबाई कर्वे म्हणतात. स्त्रियाच्या नावावरून कूळ सागण्याची रूढि आजहि कानडी लोकात आहे. अशा प्रकारचे काहीं शिलालेख मिळतात. प्रा. कुंदणगार यानीं सपादिलेल्या संग्रहात याचे विवरण दिले आहे. पण डॉ. इरावतीबाई याच्या मते शातवाहन आर्यमंगोल मिश्र वंशाचे असावेत आणि ते मध्य आशियातून आलेले उपरे लोक आहेत. डॉ. इरावतीबाईनी आपले मत सिद्ध करण्यासासाठीं दोन गोष्टी करणें जरूर आहे. (१) डॉ. सुकथनकराना मिळालेला ताम्रपट खोटा आहे किंवा त्याचा अर्थ निराळा आहे हे दाखवावे. आणि (२) आर्यांत किंवा मंगोलांत मातृप्रधान कुटुंब-पद्धति होती असें सिद्ध करावें.

(v) शातकर्णी किंवा शातवाहन या नावाचा अर्थ अजून अनिर्णित आहे. तरीपण प्राचीन तमिळ ग्रंथातून येणारा एक उल्लेख निःसंदिग्ध निर्णायक नसला तरी किंचित् अर्थसूचक आहे. शातकर्णींना "नूरुवर् कण्णर्" असे संबोधले आहे. शंभर कण्ण (जन) असा याचा अर्थ होतो.

(vi) हा संदिग्ध उल्लेख सोडला तरी शातकर्णींचीं काही नावे अर्थपूर्ण आहेत. या घराण्यात "हाल" नामक प्रसिद्ध राजा झाला. हालप्पा आदि नावें कानडी लोकात प्रचलित आहेत. याच्या वंशी पुलिमायी नावाचे राजे होते. वाघाला कानडीत पुलि असे नाव आहे. शूर पराक्रमी या अर्थी पुलि हा वाक्प्रचार (Idiom) कानडींत आहे. 'पुलि'वरून नावें घेतलेले राजे कर्णाट इतिहासात बरेच आहेत. महाराष्ट्राला चालुक्य पुलिकेशी या नावाचा विसर पडणें शक्य नाही.

(vii) महाराष्ट्रीकरणात राजे तर खरेच पण त्याजबरोबर त्यांचे सामंतहि सावंत झाले. कानडी काव्यातून वगैरे वर्णिलेले 'मन्नेयरु' माने बनले.

हळेबीडु होयसळांच्या दरबारीं रचलेल्या कानडी काव्यांत प्रतिहारीच्या तोंडीं मराठी वाक्य कसें याचा उलगडा येथें होत आहे. हस्तिशिक्षक राऊत, मराठी बोलत. राजकुमारांचे शिक्षक तर संस्कृत–प्राकृत जाणणारे उभय भाषाविशारद असणें हें जरूरच होतें.

आधीं 'प्राकृत' म्हणून पोसली गेलेली भाषाच पुढें मराठी भाषा-निर्मितीस व तिच्या वाढीस आवश्यक अशी पार्श्वभूमि निर्माण करण्यास कारण झाली.

वरील विवरण, मुख्यतः राजघराण्याभोवतालचें वातावरण मराठीच्या उद्‌गमास व विकासास कसें कारण होत गेलें हे दाखविण्यासाठी केलेलें आहे. अर्थात् 'यद्यदाचरति श्रेष्ठः तत्तदेवेतरो जनः।' आज प्रतिष्ठित जें बोलतात तेंच उद्या सामान्य जनाच्या तोंडी होतें.

(४) याशिवाय लाट–कर्णाटात सामान्यजनापर्यंत प्राकृताला नेऊन पोचविणारी दुसरीच एक महत्त्वाची गोष्ट आहे तिकडे अद्याप कोणाचें फारसे लक्ष गेलेलें नाही असे दिसतें.

जैनानी येथें आपल्या मतप्रचारार्थ देशभाषेंतून ग्रंथ लिहिण्यास प्रारंभ केला. कर्णाटांत कानडी साहित्यात त्यानीच प्रथम उत्तमोत्तम ग्रंथ रचले. या देशभाषेबरोबर आपल्या पाठशाळा व तीर्थक्षेत्रातून प्राकृत भाषेतील जैन-धर्मग्रंथांच्या अध्ययन–अध्यापनाची सोय केली.

अशा रीतीनें प्राकृत भाषा खेड्यापाड्यापर्यंत जाऊन पोचली. कानडींत तद्‌भवांची रेलचेल झाली. प्राकृतात देशी नावाखाली कानडीतून पुष्कळ शब्द शिरले. हेमचंद्राच्या देशी नाममालेत आलेल्या कानडी शब्दाची यादी डॉ. उपाध्ये यानी तयार केली आहे.

हळूहळू याचा परिणाम आज असा झाला आहे की, लाटदेशात कधीं काळी मूळ भाषा दुसरी होती हे तज्ज्ञाचे म्हणणेसुद्धा काहींना खरें वाटत नाहीं! पण ही गोष्ट डॉ. स्टेन कोनो याना संशोधनाने सिद्ध करावी लागली आहे : "The substrata, over which, Gujarati and Marathi have spread was Dravidian" येथें द्रविडीयन म्हणजे कोण एवढाच आज प्रश्न आहे.

लाट देशातून मूळ देशभाषा संपूर्ण नष्ट होऊन प्राकृत भाषेनें ती जागा पटकाविली, कर्णाटाच्या उत्तर सीमाहि अशाच कारणानें कोलमडल्या व कानडी भाषा प्राकृत शब्दवैपुल्यानें, प्राकृतसम बनली.

( ५ ) कर्णाटाच्या जनतेने प्राकृत व संस्कृताचे प्रेमाने स्वागत केलें म्हणूनच भाषेंत येवढा मूलगामी बदल होऊं शकला. संस्कृत व प्राकृताकडील ओढीनें या कानडी लोकाना आपल्या भाषेंत आनंद वाटेना. ( याच्या उलट तमिळानीं मात्र मोठ्या हेव्यानें आपल्या वर्णमालेंत आमूलाग्र बदल होऊं दिला नाहीं. यामुळें संस्कृत–प्राकृत शब्दाना तमिळ वेष धारण करूनच त्या भाषेत जाणें भाग पडले. " दंत " शब्द तमिळ लिपीमुळें त्या भाषेंत ' तंद ' होतो ! तमिळाना आपल्या भाषेंत मूलगामी बदल होणें खपलें नाहीं. ) कानडीत संस्कृतची पूर्ण वर्णमाला आली. संस्कृत व प्राकृत शब्द मूळ स्वरूपातच कानडीत प्रतिष्ठित झाले.

संस्कृत व प्राकृत शब्द मिश्र करण्यानेच भाषेची गोडी जास्त वाढते या मताला अधिक मान्यता मिळाली. अभिजात जुन्या कानडीत लिहावें असे मानणारा पक्ष नामशेष झाला. कवींना आदर्श असा राजमार्ग घालून देण्याकरिता निर्माण झालेल्या ' कविराजमार्ग ' नामक ग्रंथातील याविषयींचें मत नमूद करण्यासारखे आहे. उच्चारास कठिण असे विशेष संयुक्ताक्षरी शब्द वगळून बाकीचे 'समसंस्कृत' शब्द घेतले पाहिजेत असें या ग्रंथकाराचें मत आहे. याला जुन्या कानडी-विषयी बिलकूल आदर नाही. त्या जुनाट भाषेत लिहिण्यात आनंद नाही असे सागतेवेळी या कवीनें दिलेल्या उपमेंत त्याच्या मनातील हा तिरस्कार संपूर्ण व्यक्त झाला आहे. त्या ' पळगन्नड ' मध्यें लिहिण्यात ' जरद्वधू-सुरत-सुखा ' तील रसिकता दिसून येते असे तो म्हणतो ! ( कविराज मार्ग १·५० )

कविराजमार्ग हा ग्रंथ राष्ट्रकूट राजाश्रयाखाली लिहिला गेला आहे. नवव्या शतकाच्या आरंभीं राष्ट्रकूटाच्या दरबारीच सुरू झालेल्या या भाषा-क्रांतीनें, एका रीतीने, मराठीच्या उदयाची गुढी उभारली असें म्हणावयास हरकत नाहीं. कानडी साहित्याच्या पुनरुज्जीवनाचे जैनाचे हे प्रयत्न परिणामतः मराठीच्या वाढीस अनुकूल ठरले.

( ६ ) जैनेतरात, ब्राह्मणाना कानडीविषयी आपुलकी उत्पन्न होईपर्यंत चौदावे शतक उजाडलें. कुमारव्यास, रुद्रभट्ट, लक्ष्मीश वगैरेंसारख्यानी उत्तम काव्यें लिहिलीं. पण तीहि संस्कृत–प्राकृत ( मराठी ) प्रचुर ! नवव्या शतकात कानडी भाषेचा नवा पाया घालतेवेळीं, ही भाषा संस्कृत–प्राकृतोद्भव आहे

अशा मुळातच झालेल्या चुकीच्या समजुतीचे हे परिणाम आहेत. कानडींतील मूळ जुने शब्द मागे पडून त्या जागी आर्यभाषेचे शब्द प्रतिष्ठा पावूं लागले.

( ७ ) ब्राम्हणात कानडीविषयी पुढील काळात काही थोडी आपुलकी, उत्पन्न झाली, ती प्रादेशिक अभिमानाची आवश्यकता भासूं लागल्यानंतरची आहे. वीरशैवानीं मतप्रसाराकरिता कानडींत मोठें साहित्य निर्माण केले. जैनानंतर वैदिकाना टक्कर देणारी ही परंपराहि, ब्राम्हणाना कानडीविषयीं अनास्था वाटण्यास कारण झाली. तरी पण पामरजनाना वैष्णव भक्तिमार्गाकडे वळविण्याकरिता माध्वदासवर्याना कानडींत ग्रंथरचना करणे जरूर झालें आणि त्यानी तशी खूप ग्रंथरचनाहि ( दासरपदगळु ) केली पण माध्वातील व्यास-कूटनामक गीर्वाणवाणीच्या अभिमान्याना हें पसंत नव्हते व नाही. हे दासपंथाला टाळकरी म्हणून कमी दर्जाचे लेखितात.

तेलंगणातील ब्राम्हणाना तेलगु भाषा सोवळ्यात चालते. देवाच्या पूजेचे मंत्र त्या भाषेतले असले तरी ते आह्निकाच्या वेळी म्हणण्यात तेथील ब्राह्मणाना काहीं गौण वाटत नाहीं. असे वाटूं नये याकरिताच तेलगु भाषा कण्वमुनिप्रणीत आहे अशी दंतकथाहि प्रचारात आणल्याचे दिसते. तमिळ भाषेचे प्रवर्तक अगस्ति ऋषि अशी समजूत असल्याने ती भाषाहि ब्राह्मणाना पूजेत चालते.

पण सोवळ्यात असताना कानडी भाषा बोलल्याने ओवळें होण्याची भीति कानडी ब्राह्मणाना वाटली ! अशी उदाहरणें दिवसेंदिवस कमी होत असली तरी आज मासल्याला मिळणारच नाहींत असें नाही. श्री पुरंदर-दासवर्यांनी कानडीत रचलेले भजन ग्रंथ पूजेसाठी संस्कृत मंत्राच्या पुस्तकाबरोबर टेवलेले न खपून व्यासरायस्वामीच्या काही शिष्यानी ते खालीं फेकले अशी एक आख्यायिका आहे !

माध्व उत्तरादि मठाच्या स्वामीचें पचाग कानडी भाषेंत पण बालबोध लिपींत छापण्याची वहिवाट होती. कानडी लिपीवर सुद्धा बहिष्कार असल्याचें हें निदर्शक आहे.

कानडी भाषा ऋषिप्रणीत बनविण्याची येथील ब्राह्मणाना आवश्यकता भासलेली नाही; आधीं संस्कृत, नंतर ती आत्मसात् करणें अशक्य झाल्यावर

प्राकृत व पुढील काळी मराठीकडे येथील ब्राह्मणाचा ओढा असलेला दिसतो.

यामुळे महाराष्ट्राजवळील कर्णाटात मराठीच्या प्रवेशाला मुभा मिळाली. तेलंगणाकडोल कर्णाटात तेथील ब्राह्मणानी तेलगूस जवळ केलें. तेलगु भाषेतील आदि कवि नन्नय भट्ट यास कर्णाट पंडित नारायण भट्टानेच 'तेलगु' भाषेत भारत रचण्यास उत्तेजन देऊन ते लिहविल्याचे प्रसिद्ध आहे. जैनाचे ग्रंथ कानडींत असल्याने जर ब्राह्मण कानडी शिकतील, कानडीप्रेमी बनतील तर त्याचा वैदिक (हिंदु) धर्माभिमान शिथिल होईल अशी ब्राह्मण वर्गाला साधार भीति होती. जैनभारताच्या प्रचारानें व्यासभारत कर्णाटांत मागे पडले कुमारव्यासासारखा सुद्धा पंप भारताच्या आहारी गेला आहे. व्यासभारताहून निराळ्या कथा पंपाकडून त्याने उचलल्या आहेत. या आपत्तींतून सुटण्याकरिता ब्राह्मणवर्ग कानडी भाषा शिकण्यास विरोध करीत असावा. कानडी नारायणभट्टानें कानडी भारताचे दुष्परिणाम घालवण्याकरिता नन्नय भट्टास तेलगूंत लिहिण्यास आज्ञा केली.

(८) हिंदुधर्माभिमानी वातापीच्या चालुक्यराजाच्या गुजरात व तेलंगणातील शाखानीं त्या त्या प्रातात तेथील भाषेसच राजाश्रय देऊन ग्रंथ लिहविले, परंतु वातापी घराण्याची कानडी भाषा त्या प्रातात टिकविण्याचा प्रयत्न त्यानीं केला नाही.

कोल्हापूर, सागली, सातारा भागात कानडी बोलणाऱ्यांना "तुम्ही जैन काय?" असे विचारलें जाते याचा अनुभव प्रस्तुत लेखकास आहे. साताऱ्याकडील सुप्रसिद्ध जैन पाटील घराण्यात म्हाताऱ्या बायाच्या तोंडी आजहि कानडी भाषा आहे पण पुढील पिढींत मात्र कानडीचा गंधहि दिसत नाहीं.

कानडीत "देशिक" शब्दाला अनाथ असा अर्थ प्राप्त झाला! 'देशी' म्हणजे जाडेभरडें; 'विलायती' म्हणजे उंची ही आजची मनोवृत्ति येथें आठवावी. मराठीतील 'राठ' (रट्ट, राष्ट्रिक) शब्दातील व्यंग्यध्वनि वरील कानडी वाक्प्रचाराला दुजोरा देत आहे.

कर्णाटातील हिंदूंची विशेषतः ब्राह्मणवर्गाची ही आतील मनोवृत्ति हिशेबात धरल्याशिवाय सबंध कर्णाट प्रात द्विभाषिक कसा याचा उलगडा होणार

नाहीं. कर्णाटात तेलगू, तमीळ, अथवा मराठी यापैकी एक तरी भाषा समजत नाही असा, केवळ कानडीच कळत असलेला भाग फारच छोटा असा आहे. महाराष्ट्रालगतचे मराठी झाले. तेलगूलगतचे राष्ट्रिक रट्ट–रड्डी, आंध्र झालेले दिसतील; दक्षिणेंत रामानुज–मताचा विशेष प्रसार झाला; दत्त व विठ्ठल परंपरे-बरोबर कर्णाटात जसे मराठी आले तसा रामानुजमताबरोबर तेलगु किंवा तमिळ भाषेला प्रवेश मिळाला. अशाच कारणानी '**कर्नाटकराज्यलक्ष्मीरमारमण**' नरपति कृष्णरायाच्या वेळी विजयनगरात राजाश्रय मिळून तेलगु साहित्यिकाचे तें मोठे केंद्र बनले! मराठी संस्थानिकाच्या मराठी–अभिमानी वृत्तीची याच्याशी तुलना केली असता कानडी आणि मराठी या दोन जनाच्या मनोवृत्तीमधील अंतर स्पष्टपणे लक्षात येईल. मराठी सरदार व संस्थानिकानीं जेथें ठाण माडले तेथे आपली भाषा रुजविली व पोसली! या वृत्तातावरून नर्मदेपासून कर्णाट सीमा कशा व का मागे हटत गेल्या याची थोडीतरी कल्पना येईल असें वाटतें.

आर्यीकरणाच्या प्रारभी कर्णाटीयानी सर्व प्रकारच्या फेरफारार्चे स्वागत केलें. तमिळाप्रमाणे ते तटून वागले नाहीत. पण नवीन सुधारणाच्या ओघात आपण स्वत्व संपूर्ण गमवून बसतो ही जाणीव उत्पन्न होण्यास बारावे शतक उजाडावे लागलें. मध्यंतरीं त्यानीं काहीच विरोध केला नसेल असा याचा अर्थ नव्हे. पण बाराव्या शतकानंतर मात्र कानडी लोकानी कोणत्याहि फेरफारास अवसर द्यावयाचा नाही असा जणूं काही चंग बाधला असे दिसते. कर्णाटाला प्रगतीचा कटु अनुभव आल्यासारखे वाटून, तेथील जनास सोलीव परंपराप्रेमास व रूढीस चिकटून राहाण्यात आनंद वाटूं लागला. प्रतिक्रियेची अशीच लाट वीरशैव व माध्वाच्या कट्टर मनोवृत्तीत दिसून येते.

पण या पार्श्वभूमीचें नीट आकलन न झाल्याने महाराष्ट्रभाषा व संस्कृति यातील समस्याची सरळ व समर्पक उत्तरें आजवर मिळालेली नाहींत. तुंगेपर्यंत, श्रवणबेळगोळपर्यंत महाराष्ट्राचा विस्तार होता अशी समजूत आहे. ही एकच समस्या घेतली तरी याचा खरा अर्थ काय हे न्यायमूर्ति रानडे किंवा लोकमान्य टिळक यासारखे एक दोन अपवाद वगळले तर किती जणाना समजले आहे याची शका आहे. लोकमान्यानी गुर्लेहोसूरच्या सुप्रसिद्ध व्याख्यानात

आपण सर्व एक आहोत असे कर्णाट बांधवास सागतेवेळीं, " आजचा महाराष्ट्र म्हणजे पूर्वीचा कर्णाट होय " असें म्हटल्याची आठवण कर्णाटकात अजून ताजी आहे. आतां, कानडी लोकाचा विश्वास संपादण्यासाठीं लोकमान्याचा हा एक राजकीय डाव होता असें विधान करून, लोकमान्यांवर आपण अन्यायानें अप्रामाणिकपणाचा आरोप लादीत आहोत याची चाड नसलेले व असे करण्यात आपलीच त्या प्रकारची मनोवृत्ति व्यक्त करणारे काही लोक निघतीलहि. पण न्यायमूर्ति रानडे याजवर तरी तशा प्रकारचे शितोडे उडविण्यास बिलकुल जागा नाही. ' The mixture of two elements ( Marathi & Dravidian ) is best illustrated by the peculiarities of the ( Marathi ) Language whose base is Dravidian but whose structure has been entirely fashioned by Aryan influence. " न्यायमूर्तीच्या या निर्णयावरहि काही मंडळी असा प्रश्न विचारूं शकतील की त्यानी भाषाशास्त्रात प्राविण्य कधी मिळविलें ? आपल्या नसलेल्या विषयात मत देण्याचा त्याना अधिकार काय ?

भारतीय भाषाचा उद्गम व विकास याचा अभ्यास व संशोधन करणें हाच ज्याचा मुख्य व्यवसाय होता त्या डॉ. ग्रियर्सन याचें मत तरी विचारार्ह होईल काय ? Linguistic Survey of India या नावाच्या प्रचंड ग्रंथाचे मुख्य संपादक या नात्याने त्यानी आर्य व द्रविडवर्गीय भाषाचे एकमेकावर झालेले परिणाम व त्याचा विस्तार वगैरेंविषयी आपल्या ग्रंथात विस्तृत चर्चा केली आहे. ते म्हणतात: When an Aryan tongue comes into contact with an uncivilised aboriginal one, it is invariably the latter which goes to the wall. The Aryan does not attempt to speak it, and the neccessities of intercourse compel the aboriginal to use broken pigeon form of the language of a superior civilisation As generations pass, this mixed jargon more and more approximates to its model and in process of time the old aboriginal language is forgotten end dies a natural death ..we can watch it in all stages of its progress

वरील उताऱ्यांतील ' aboriginal ' आणि ' uncivilised ' हे दोन शब्द सोडले तर बाकी सर्व विचार शास्त्रीय आहेत असे भाषाशास्त्राच्या

दृष्टीनें आजहि म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. डॉ. ग्रियर्सनाच्या वेळी सैंधव संस्कृतीचे उत्खनन झालेलें नव्हतें, शिवाय द्रविड संस्कृतीचा अभ्यासहि विशेष सुरू झाला नव्हता आणि म्हणूनच डॉ. ग्रियर्सनसारखे लोक वरीलप्रमाणे शब्दयोजना करीत असत.

आर्यवर्गीय भाषा प्रसरणशील आहेत. त्या जेथें जाऊन पाय रोवतात तेथून मागे हटत नाहीत. त्याची विशेष वाढ झाली नाही तरी शतकानुशतकें त्या तगून तरी राहतातच. नीलगिरी, त्रावणकोर, मद्राससारख्या, महाराष्ट्राचा संबंध सर्व तऱ्हेनें तुटलेल्या प्रातात कधी काळीं गेलेले मराठी भाषिक आजहि आपली भाषा मोडक्या तोडक्या स्वरूपात का होईना पण टिकवून आहेत.

द्राविड भाषाविषयी याच्या उलट प्रकार डॉ. ग्रियर्सन यांना सर्वत्र अनुभवास आलेला आहे. आर्यभाषावर्गीय प्रदेशात सापडलेल्या द्राविडवर्गीय भाषा कालातराने नाहीशा होतात याचा अर्थ द्राविडवर्गीयभाषिक लोक आर्यवर्गीय भाषा स्वीकारून आपली भाषा विसरतात असाच होतो ना? द्राविड भाषिकातहि कानडी बोलणाऱ्याविषयी तर हा नियम शेंकडा ९९ इतक्या हिश्श्यानी खरा आहे. सातारा-कोल्हापूरकडील जैनलिंगायत घराण्यात कानडी कसे लुप्त होत आहे हे या क्षणीहि पाहावयास मिळेल. बेवूर, मुधोळकर, गजेंद्रगडकर, बनहट्टी, विजापूरकर वगैरेसारखी अस्सल कानडी गावाची आडनावे घेतलेल्या घराण्याना महाराष्ट्रात गेल्यावर ‘ हे आम्हासी कानडे ’ असे म्हणण्याची लौकरच पाळी येते.

कर्णाटात हरिहर श्रवणबेळगोळपर्यंत मराठी भाषेचे पडसाद कानीं पडले तर त्याचा अर्थ काय करावयाचा? डॉ. ग्रियर्सन याच्या सूत्राप्रमाणे मराठी भाषिक तेथपर्यंत पसरले होते, महाराष्ट्राचा विस्तार तेथपर्यंत होऊं पहात होता असे म्हणावे लागते.

डॉ. ग्रियर्सन हे आपल्या संशोधनात ठाम अशा ठरलेल्या आपल्या सूत्राप्रमाणें, बलुचिस्तानकडील द्राविडवर्गीय अवशिष्ट ब्राहुई भाषेला ती तेथें उपरी आहे असे म्हणण्यास तयार नाहींत. द्राविडवर्गीय जन सिंध-पंजाबपर्यंतहि होते. आर्यांच्या प्रसारक वृत्तीमुळे द्राविडवर्गीय भाषा विदीर्ण होत. तळाशी बुडी घेत घेत त्या तेथें ब्राहुईच्या रूपाने अवशिष्ट राहिल्या आहेत.

यावरून वऱ्हाटकडील चादा भंडारा जिल्ह्यात अजून जिवंत राहिलेले कुरुंब व होलेय याची कानडी भाषा व नाशिक, खानदेशकडे नावाचे कानडी राहिलेले हटकार गौळी ( Kanadas ) हे सर्व उपरे नसून (ब्राहुईप्रमाणेंच) त्या भागातील मूळ जन असें म्हणणें क्रमप्राप्त ठरते. मराठीच्या प्रचारात तेथील कानडी विरून जाता जाता हे असे मागे राहिलेले अवशेष आहेत.

**एकूण काय ?**

जुन्या मराठी व कानडी भाषेचा तुलनात्मक अभ्यास केला तर त्यावरून या भाषा एके काळी एकत्र वाढल्या असल्या पाहिजेत अशा निर्णयाला आपण येऊन ठेपतो. कानडीतील प्राकृतरूपें, मराठीच्या जन्मापूर्वीपासूनच या दोघाचा (कानडी व प्राकृताचा) निकटवर्ती संबंध होता हे दर्शवितात. मराठीचे मूळ जन व कानडीभाषिक मूळ जन हे परस्पराचे आनुवंशिकसंबधी असावेत याचा निर्वाळा मराठींतील कानडी लकबी, नामपदे व धातु देतात.

कर्णाट व मरहट्टातील मल्हारी, विठ्ठल वगैरे देवता व लोकाच्या चालीरीती वगैरे गोष्टी वरील भाषिक निर्णयास पाठिंबा देतात. चालुक्य राष्ट्रकूटादि कर्णाट-मरहट्टाचीं राजघराणीं आपला वंशवृक्ष यदु–तुर्वसूंपासून वाढल्याचे सागतात. कानडे आणि मरहट्टे यात "आनुवंशिक संबंध असावा" असा निर्णय देणारा पुरावा लक्षात घेता आपण यदुतुर्वसुवंशीय अशी या राजघराण्यात असलेली श्रद्धा निराधार म्हणता येणार नाही.

शिवाय पाली ग्रंथावरून अंधकवृष्णि यादवाच्या कुळाची परंपरा आर्येतर असावी असें दिसून येतें. वेदातील काहीं भाग या तर्काला पोषक आहेत. याच अनुरोधाने इतिहासकाळातील रिष्टिक–भोजकाची परंपराहि फार उद्बोधक ठरते.

आजच्या ज्ञात गोष्टी जमेस धरून मागे शोध घेत गेले असता जुळया भावंडाप्रमाणें दिसणारे हे कानडे व मराठे याची पूर्वपरंपरा आपणास रिष्टिक–भोजक व यदु-तुर्वसु अशा जोडनावाच्या जनापर्यंत नेऊन भिडविते.

वेदकाळी आर्येतर द्रविडवर्गीय जन हे पंचनद देशात होते या आधुनिक संशोधकाच्या निर्णयाच्या अनुसंधानात, वेदातील यदु-तुर्वशाच्या हालचाली,

मोहेंजोदारोसारखीं मोठीं शहरें वसवून वैभवांत असलेल्या पूरूंचें दर्शन घडवितात. महाभारतातील यदुजनांची कुटुंबपद्धति व रीतिरिवाज यावरून ते आर्येतर असावेत असा दृढ तर्क करता येईल. पाली ग्रंथातील उल्लेख हा तर्क दृढतर करतात. प्राकृत भाषेतील लकबीचा सरळ अर्थ लावण्यास त्या भाषेचे मूळ लोक आर्येतर असावेत असे समजल्याशिवाय गत्यंतर राहात नाहीं; आणि दक्षिणापथातील राजघराणीं आपला संबंध यदुतुर्वसूंशी जोडतात या घटनेमुळे वरील तर्क दृढतम होतो.

यात्रमाणें कोणत्याहि अंगाने विचार केला असता तोच निर्णय ठाम होत असेल आणि महत्त्वाच्या बाबतींत एकमेकाचा ताळापडताळा एकमेकाना मिळत असेल तर त्या तर्कात पुष्कळच तथ्यांश आहे असें म्हणणे फारसे वावगें होईल काय ?



# सूचि

